महाराष्ट्राचे शिल्पकार

# स्वामी रामानंद तीर्थ

डॉ. प्रकाश मेदककर



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

महाराष्ट्राचे शिल्पकार

# स्वामी रामानंद तीर्थ

प्रकाश मेदककर




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

प्रथमावृत्ती : सप्टेंबर २००३
महाराष्ट्राचे शिल्पकार : क्र. १६

प्रकाशक :
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत,
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग,
दादर, मुंबई ४०० ०१४



मुद्रक :
प्रमोद भोगटे,
स्नेहेश प्रिंटर्स,
३२०-ए, शाह अँड नाहर इंड. इस्टेट अ-१,
धनराज मिल आवार, सीताराम जाधव मार्ग,
लोअर परळ, मुंबई-१३. (दूरध्वनी : २४९४५६१५)

मुखपृष्ठ : राजा बडसल

किंमत : रु. ४५/-



# निवेदन

महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, आर्थिक व वैचारिक जडणघडणीत ज्या दिवंगत महनीय व्यक्तींचा महत्त्वपूर्ण सहभाग आहे अशा व्यक्तींची साधारणत: शंभर ते सव्वाशे पानांची सुबोध मराठी भाषेत चरित्रे लिहून ती ''महाराष्ट्राचे शिल्पकार'' या योजनेअंतर्गत पुस्तकरुपाने प्रकाशित करण्याची मंडळाने योजना आखली असून या चरित्रग्रंथमालेतील ''स्वामी रामानंद तीर्थ'' हा सोळावा चरित्रग्रंथ आहे.

या चरित्रग्रंथमालेअंतर्गत डॉ. प्रकाश मेदककर यांनी लिहिलेला स्वामी रामानंद तीर्थ हा चरित्रग्रंथ प्रसिद्ध करताना मंडळाला विशेष आनंद होत आहे. या आनंदाचे कारण काहीसे वेगळे आहे.

स्वामीजींचे हे जन्मशताब्दी वर्ष. त्यांचे जन्मशताब्दी वर्ष साजरे होत असतानाच हा चरित्रग्रंथ प्रकाशित होत आहे. हे जाणीवपूर्वक केलेले नियोजन नसून योगायोग आहे. हा योगायोग घडून आला याचा मंडळाला आनंद होत आहे.

१५ ऑगस्ट, १९४७ रोजी भारताला स्वातंत्र्य मिळाले खरे; पण काही संस्थानिकांनी भारतात सामील न होता स्वतंत्र राहण्याचे ठरविले. ज्या संस्थानिकांनी असा निर्णय घेतला त्यामध्ये हैद्राबाद संस्थानचा समावेश होता. त्यामुळे भारताला स्वातंत्र्य मिळूनही हैद्राबाद संस्थानची जनता स्वातंत्र्यापासून वंचित राहिली. इतकेच नव्हे तर निजामाच्या धर्मांध, जुलमी राजवटीखाली भरडत, चिरडत राहिली. ही राजवट नष्ट करण्यासाठी हैद्राबादचा जो स्वातंत्र्यलढा झाला त्या लढ्याचे नेतृत्व स्वामी रामानंद तीर्थ यांनी केले. या स्वातंत्र्य लढ्यामुळेच हैद्राबाद संस्थान निजामी राजवटीतून मुक्त होऊन भारतात विलीन झाले. मराठवाडा महाराष्ट्राचा अविभाज्य

भाग झाला. त्याचे श्रेय अग्रक्रमाने स्वामी रामानंद तीर्थ यांना द्यावे लागेल.

स्वामीजींचे हे कार्य केवळ राजकीय स्वरूपाचे होते काय? एखाद्या भूप्रदेशाला स्वातंत्र्य मिळवून देणे एवढ्या पुरताच हैद्राबादस्वातंत्र्यलढा मर्यादित होता काय?

''हैद्राबादचा मुक्ती संग्राम हा फक्त हिंदूचा स्वातंत्र्य संग्राम झालेला नाही तर जे जे शोषित, पीडित, अन्यायग्रस्त, गुलामीत पिचलेले आहेत- मग ते हिंदू असोत वा मुस्लिम असोत, या सर्वांसाठी दिलेला हा मुक्तीलढा झाला.'' अशा समर्पक शब्दात डॉ. मेदककर यांनी या लढ्याचे फलीत स्पष्ट केले आहे.

डॉ. मेदककर यांना स्वामीजींविषयी, त्यांच्या कार्यकर्तृत्वाविषयी आदर आहे, पण भाबडी भावूकता नाही. स्वामीजींचा जीवनपट मांडताना त्यांनी जो कालपट उभा केला आहे तो विलक्षण बोलका व प्रत्ययकारी आहे. व्यक्ती कितीही मोठी असो, कर्तृत्वसंपन्न असो, त्याचे काळाशी अतूट नातं असतं. किंबहुना त्या काळानेच त्या व्यक्तीला जन्म दिलेला असतो, असे म्हटले तरी चालेल. त्या स्वातंत्र्यलढ्याचे नेतृत्व स्वामीजींनी केले असले तरी हे नेतृत्व उदयाला येण्यास तत्कालीन परिस्थिती कारणीभूत झाली.

''स्वामीजींच्या नेतृत्वाने आकार घेण्यापूर्वीच संस्थानातील जनतेच्या मनात असंतोषाचा अग्नि सुप्तावस्थेत धुमसत होता.... त्यातूनच जनजागृतीच्या चळवळी जन्म घेत होत्या. या चळवळीतूनच स्वामीजींचं नेतृत्व उदयाला आले.'' असे डॉ. प्रकाश मेदककर यांनी या चरित्रग्रंथात नमूद केले आहे.

''निजामाने हैद्राबाद संस्थान हे स्वतंत्र सार्वभौम इस्लामिक राष्ट्र व्हावे या दृष्टीकोनातून मुत्सद्दीपणाने पावले टाकली. निजामाचे हे स्वप्न जर प्रत्यक्षात उतरले असते तर काश्मीरसारखा एक ज्वलंत प्रश्न स्वतंत्र भारतासाठी कायमचा डोकेदुखी झाला असता.'' असा एक उल्लेख या चरित्रग्रंथात आलेला आहे. अर्थात डॉ.मेदककर यांचे हे मत मान्य होण्यासारखे नाही. कारण काश्मीरची व हैद्राबाद संस्थानची भौगोलिक रचना तसेच या दोन प्रदेशातील जनतेची मानसिकता यामध्ये विलक्षण तफावत आहे. ही तफावत डॉ. मेदककर यांनी लक्षात घेतलेली दिसत नाही.

चरित्र ग्रंथ म्हटला की, ज्या व्यक्तीच्या जीवनावर तो चरित्रग्रंथ लिहिला जातो त्या व्यक्तीचं व्यक्तिगत जीवन त्या ग्रंथात चित्रित व्हावे, असे अपेक्षित असते. पण स्वामीजींवरच्या या ग्रंथातून तशी अपेक्षा ठेवणे गैर आहे. कारण स्वामीजींना व्यक्तिगत जीवन नव्हते. स्वामीजी स्वत:साठी कधीच जगले नाहीत. स्वामीजी

संन्यासी होते, विरक्त होते. काळाची एक अपरिहार्य गरज म्हणून ते हैद्राबादच्या स्वातंत्र्यसंग्रामात उतरले होते. डॉ. प्रकाश मेदककर यांनी लिहिलेला हा चरित्रग्रंथ वाचताना आपण हे विशेषत्वाने लक्षात घ्यावयास हवे.

रा. रं. बोराडे
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

मुंबई
दिनांक: ५ ऑगस्ट, २००३

हैदराबाद मुक्तिसंग्रामातील
सर्व ज्ञात-अज्ञात स्वातंत्र्यसैनिकांना
कृतज्ञतापूर्वक

# दोन शब्द

हैदराबाद मुक्तिसंग्राम हा मराठवाड्यातील जनतेच्या आस्थेचा आणि अभिमानाचा दैदिप्यमान इतिहास आहे. या लढ्याचे सेनानी स्वामी रामानंद तीर्थ वंदनीय आहेत.

या मुक्तिसंग्रामाची सर्वाधिक झळ पोहचलेल्या बीदर-उदगीर परिसरात माझे बालपण गेले. रझाकारांच्या अत्याचाराचे व्रण अंगावर कायम असलेल्या अनेकांच्या तोंडून छळाच्या करूण कहाण्या बालपणापासून कानावर पडत होत्या. त्यामुळे मुक्तिसंग्राम आणि स्वामीजी यांच्याबद्दल बालसुलभ कुतूहल मनात होते.

पुढे विद्यार्थिदशेत 'मराठवाडा' दैनिकात काम करताना कै. अनंतराव भालेराव यांच्यासारख्या थोर स्वातंत्र्यसैनिकांपासून मुक्तिलढ्यात खारीचा वाटा उचलणारे अनेक स्वातंत्र्यसैनिक पाहण्यात आले. या सर्वांबद्दल आदर, कृतज्ञताभाव मनात होता. परंतु त्याला अभ्यासाची जोड नव्हती.

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष प्राचार्य श्री. रा. रं. बोराडे यांनी महाराष्ट्राचे शिल्पकार योजनेअंतर्गत स्वामी रामानंद तीर्थ यांचे चरित्र लिहिण्याची संधी देऊन मला हैदराबाद मुक्तिसंग्राम, स्वामीजींसारख्या थोर स्वातंत्र्यसेनानींचे जीवनकार्य यांचा अभ्यास करण्याचा योग प्राप्त करून दिला. त्याबद्दल प्राचार्य श्री. बोराडे यांचे मानावेत तितके आभार कमीच ठरतील.

स्वामीजींचे चरित्र मोजक्या शब्दांत लिहिणे माझ्यासाठी एक आव्हानच होते. राजकीय, सामाजिक, घटनाप्रसंग आणि या घटनांमागची वैचारिक गुंतागुंत तपशिलासह समजावून घेणे माझ्यासाठी कठीण होते. अशा प्रसंगांमध्ये स्वामीजींनी

घेतलेले निर्णय, या निर्णयांमागे असणारे नैतिक राजकारणाचे स्वरूप यांचे आकलन माझ्यासाठी शिवधनुष्य पेलण्यासारखे कठीणप्रद होते. या कामी न्या. नरेंद्र चपळगावकर यांचे मार्गदर्शन मला लाभले.

न्या. नरेंद्र चपळगावकर हैदराबाद मुक्तिलढ्याचे साक्षेपी अभ्यासक म्हणून सर्वज्ञात आहेत. त्यांचा माझ्यावर माझ्या विद्यार्थिदशेपासून लोभ आहे. माझ्या विनंतीवरून त्यांनी केवळ माझ्यावरील लोभापोटी, त्यांच्याकडे वेळ नसतानाही मी लिहिलेल्या स्वामीजींच्या चरित्राचे हस्तलिखित बारकाईने वाचून मौलिक सूचना केल्या. त्याचा मला उपयोग झाला.

मी आज ज्या भाषिक, सांस्कृतिक स्वातंत्र्याच्या पर्यावरणात जगतो आहे, लोकशाहीतील स्वतंत्र नागरिक म्हणून श्वास घेतो आहे, ते सर्व नंतरच्या पिढ्यांना मिळावे म्हणून जीवावर उदार होऊन हैदराबाद मुक्तिलढ्यात उतरलेल्या असंख्य ज्ञात-अज्ञात स्वातंत्र्यसैनिकांबद्दल मन आदराने आणि कृतज्ञतेने भरून येते. त्या सर्व थोरांचा ऋणानिर्देश करण्यासाठी, कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी मी स्वामीजींचे चरित्र सर्व ज्ञात-अज्ञात स्वातंत्र्य सैनिकांना अर्पण करीत आहे.

ही अमोल संधी उपलब्ध करून दिल्याबद्दल आणि स्वामीजींचे चरित्र लिहिण्याची जबाबदारी माझ्यावर सोपवल्याबद्दल मी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे मन:पूर्वक आभार मानतो.

**-प्रकाश मेदककर**

# अनुक्रमणिका

# सरंजामशाहीत गुदमरणारे संस्थान

१५ ऑगस्ट १९४७ रोजी भारताला स्वातंत्र्य मिळाले. १५० वर्षे भारतावर राज्य करणाऱ्या ब्रिटिशांची सत्ता संपुष्टात आली. देश गुलामगिरीतून मुक्त झाला. भारत स्वतंत्र झाला तेव्हा देशात लहानमोठी अशी ६९९ संस्थाने होती. या संस्थानात निजामाची राजवट होती. या राजवटीने १७२४ पासून हैदराबाद संस्थानावर राज्य केले.

भारत स्वतंत्र झाला तेव्हा हिंदुस्थान आणि पाकिस्तान अशा दोन राष्ट्रांमध्ये भारताचे विभाजन झाले. देश स्वतंत्र होताना ब्रिटिशांनी असे ठरविले की, देशातील संस्थानांना त्या त्या संस्थानांच्या इच्छेनुसार हिंदुस्थानात किंवा पाकिस्तानात विलीन होता येईल. किंवा त्यांची इच्छा असल्यास ते स्वतंत्रही राहू शकतील.

संस्थाने भारत देशात विलीन झाल्याशिवाय भारतीय स्वातंत्र्याला परिपूर्णता येणे शक्य नव्हते. ब्रिटिशांची सत्ता भारतातून गेल्यानंतर आपले स्वतंत्र अस्तित्व टिकवता येणे अशक्य आहे, हे काही संस्थानिकांच्या लक्षात आले होते. त्यांनी काळाची पावले ओळखली होती. अशी संस्थाने फारशी खळखळ न करता हळूहळू भारतात विलीन झाली होती. परंतु काही मोजक्या, थोड्या संस्थानांनी दुराग्रहाने स्वतंत्र राहण्याचा विचार केला. अशा संस्थानांपैकी हैदराबाद हे एक संस्थान होते.

हैदराबाद संस्थान भारतात विलीन झाले पाहिजे, या भूमिकेतून हैदराबाद संस्थानातील जनतेने निजाम राजवटीविरुद्ध अभूतपूर्व असा लढा दिला. या लढ्यामुळे भारतीय स्वातंत्र्यलढ्याच्या इतिहासाला पराक्रम, असीम त्याग यांचे

अजून एक दैदिप्यमान असे सोनेरी पान जोडले गेले. नियतीने या लढ्याचे नेतृत्व करण्याची जबाबदारी कषायवस्त्रधारी, कृश देहयष्टीच्या एक संन्याशावर सोपवली होती. या संन्याशाचे नाव होते स्वामी रामानंद तीर्थ! बलाढ्य, धर्मांध, सरंजामशाही राजवट नष्ट करून संस्थानातील जनतेला मुक्तता मिळवून देणाऱ्या चळवळीचे निग्रही, निस्पृही नेते म्हणून भारत देशात स्वामीजींना ओळखले जाते. गंमतीची गोष्ट अशी की, स्वामीजी जन्माने संस्थानाचे रहिवाशी नव्हते. संस्थानातील गुलबर्गा जिल्ह्यातील गाणगापूर या तीर्थक्षेत्री त्यांची बहीण होती. लहानपणी शाळेला सुट्या लागल्या की, ते अधूनमधून बहिणीकडे येऊन राहत. इतकाच काय तो स्वामीजींचा हैदराबाद संस्थानाशी संबंध होता. पण योगायोग असा की, काळाने हैदराबाद संस्थानाचे भवितव्य ठरविणाऱ्या चळवळीचे नेतृत्व स्वामीवर सोपवले.

या नेतृत्वाची जबाबदारी सामान्य नव्हती, सोपी तर मुळीच नव्हती. २२४ वर्षांच्या बलवान राजवटीचा जुनाट वटवृक्ष समूळ उपटून टाकण्याचे काम नियतीने त्यांच्यावर सोपवले होते. स्वामीजींच्या अंगिकृत कार्याचे जिकिरीचे, धोक्याचे स्वरूप लक्षात येण्यासाठी हैदराबाद संस्थानाचे स्वरूप व थोडाफार पूर्वेतिहास समजावून घेणे आवश्यक आहे.

भौगालिकदृष्ट्या दक्षिण भारताच्या मध्यभागी असणारे हैदराबाद संस्थान हे देशातील लोकसंख्येच्या दृष्टीने सर्वात मोठे संस्थान होते. तेलगू, मराठी आणि कन्नड भाषिकांचे मिळून बनलेल्या या संस्थानाचे क्षेत्रफळ ८२,३१३ चौ. मैलांचे होते. १९४१ च्या संस्थानातील शिरगणतीनुसार हिंदू जनसंख्या ८१.४ टक्के होती. तर मुस्लिम जनसंख्या १२.८ टक्के होती. या शिरगणतीमध्ये जनसंख्येची टक्केवारी ठरविताना हैदराबाद संस्थानातील हरिजनांचा हेतुत: समावेश करण्यात आलेला नव्हता.

हैदराबाद संस्थान तेलंगण, कर्नाटक, मराठवाडा या तीन विभागांनी बनले होते. तेलंगणचे ८ जिल्हे, मराठवाड्याचे ५ (आता सात जिल्हे), तर कर्नाटकाचे ३ जिल्हे मिळून निजामी राज्य अस्तित्वात आलेले होते. या तीनही भागांमध्ये हिंदू जनसंख्येचे प्रमाण जास्त होते. तरी नोकऱ्यांमध्ये मुस्लिमांचेच प्रमाण जास्त होते. १९४१ मध्ये सरकारी नोकऱ्यांमध्ये मुस्लिमांची संख्या १ लक्ष १२ हजार ७३७ होती. तर हिंदूंची संख्या २३ हजार ३६८ होती. सरकारी नोकऱ्यांमधील हिंदूंचे प्रमाण केवळ २० टक्के होते. या २० टक्क्यांमध्ये खेड्यापाड्यांतील पाटील, पटवारी, कुलकर्णी आणि जागले यांचा समावेश होता.

हैदराबाद संस्थानात निजामी राज्य स्थापन करणारा पहिला निजाम मीर कमरुद्दीन मोगल साम्राज्याचा दक्षिणेतील सुभेदार म्हणून १७१९ मध्ये दक्षिणेत आला. त्याने मोगल साम्राज्य खिळखिळे झाल्याचा फायदा घेऊन १७२४ मध्ये आपले स्वातंत्र्य घोषित केले. त्याला मोगलांचा सम्राट महंमदशहा याने 'आसिफजाह' हा किताब दिला होता. त्यामुळे हैदराबाद संस्थानाची निजामी राजवट आसिफजाही राजवट म्हणून ओळखली जाते. त्याच्यानंतर सहा निजाम झाले. कमरुद्दीन उर्फ पहिला निजामुल्मुल्क याची कारकीर्द १७२४ ते १७४८ अशी राहिली. त्याच्यानंतर १७६२ पर्यंत त्याच्या चार मुलांमध्ये भांडणे होत राहिली. नंतर मीर निजामअली गादीवर आला. त्याने १७६२ ते १८०३ राज्य केले. त्यानंतर निजाम सिकंदरजाह (१८०३-१८२९) नसिरुदौला (१८२९-१८५७) अफजलुद्दौल्ला (१८५७-१८६९) मीर महबूबअली (१८६९-१९११), मीर उस्मानअली (१९११-१९४८) हे निजाम सत्तेवर आले. १७२४ ते १९४८ अशी २२४ वर्षे निजामी सत्तेच्या अंमलाखाली हैदराबाद संस्थानातील जनता होती. १९४८ मध्ये मीर उस्मानअलीच्या कारकिर्दीत ही राजवट संपुष्टात आली.

मीर उस्मानअली १९११ मध्ये गादीवर आला. सत्ता आणि संपत्ती यांचा प्रचंड लोभ असणाऱ्या या निजामाच्या डोक्यात पुरेसे धर्मवेडही भिनलेले होते. अत्यंत धूर्त, चाणाक्ष, कपटकारस्थानात वाकबगार, राजकारणाचे सूक्ष्म ज्ञान असणारा हा माणूस होता. भारतातील ६९९ संस्थानांपैकी सर्वात सामर्थ्यवान संस्थानाचे आपण अधिपती आहोत याची त्याला सदैव जाणीव होती. सत्तेवर आल्यापासूनच आपले स्वतंत्र राज्य असले पाहिजे ही भावना त्याच्या मनात होती. आपल्या सत्ताकांक्षेच्या पूर्तीसाठी मीर उस्मानअलीने संस्थानामधील मुस्लिमांच्या अंध धर्मवेडाचा पुरेपूर फायदा करून घेतला. संस्थानातील प्रत्येक मुस्लिम हा राज्यकर्ता आहे. आणि मुस्लिमेतर जनता शासित, गुलाम आहे अशी भावना मुस्लिमांच्या मनात रुजविण्यात त्याने यश मिळवले. संस्थानातील हिंदु-मुस्लिम जनतेच्या आर्थिक सुधारणांकडे त्याने फारसे लक्ष दिले नाही.

हैदराबाद संस्थानचा निम्मा भाग तेलंगणने व्यापला होता. येथील शेतीत जमीनदारी पद्धत प्रबळ होती. हजारो एकर जमिनीची मालकी मूठभर जमीनदारांकडे होती. या शेतीत प्रत्यक्षात राबणारे मात्र वेठबिगार भूमिहीन होते. मराठवाडा आणि कर्नाटकात फार मोठे जमीनदार नव्हते. निजामाने जहागिरी निर्माण केल्या होत्या. या जहागिरी कमालीच्या बुरसटलेल्या, अन्याय्य,

शोषणपद्धतीचा अवलंब करणाऱ्या होत्या. जहागिरदारी असलेल्या भागातील प्रशासनव्यवस्था नाममात्र, जहागीरदारांच्या लहरीप्रमाणे चालत असे. याशिवाय संस्थानात देशमुखी, देशपांडेगिरीची वतनदारी निजामाने सुरू केली होती. त्यांना वर्षासने म्हणून रूसूम, यौमिये, माश, वजीफे, तहरीर, चांदरात अशी बक्षिसे व दाने मिळत. हा लाभधारक वर्ग निजामाशी एकनिष्ठ असे. जहागीरदार आणि वतनदार हेच निजामी राजवटीचे आधार होते.

निजाम राजाही होता आणि मोठा जहागीरदारही होता. सर्व सरंजामी व्यवस्थेप्रमाणे निजामाच्याही जहागिरी होत्या. संस्थानाच्या एकूण क्षेत्रफळापैकी ४२ टक्के क्षेत्रफळ सर्फेखास, पायगा, जहागीर अशा निरनिराळ्या जहागिरींनी व्यापले होते. त्यापैकी सर्फेखास ही ८१०९ चौरस मैल क्षेत्रफळाची जहागीर स्वत: निजामाचीच होती. या क्षेत्रातील जमीन अत्यंत सुपीक होती. यापासून निजामाला दरवर्षी सुमारे एक कोटी रु. उत्पन्न मिळे. या शिवाय निजामाने सरंजामी व्यवस्थेचा भाग असलेली नजराणा पद्धत संस्थानात सुरू केली. प्रजेने राजाला भेटण्याच्या वेळी अगर विशेष प्रसंगी भेट द्यावी लागे. या भेटीचा- नजराण्याचा वापर निजामाने आपल्या उत्पन्नात भर टाकण्यासाठी करून घेतला होता. हे नजराणे सामान्य माणसाप्रमाणेच जहागीरदारांनाही डोईजड असत.

संस्थानातील ८४ टक्के लोकांच्या उपजीविकेचे साधन शेतीव्यवसायच होता. बहुतेक शेती कोरडवाहू होती. तेलंगण विभागात पाणभरती जमीन अधिक प्रमाणात होती. कोरडवाहू जमिनीसाठी साधारण एकरी १ रु. व पाणभरती जमिनीसाठी साधारण एकरी ५ रु. ८ आणे शेतसारा वसूल केला जाई. या उत्पन्नातून ग्रामीण विकासासाठी फारच अल्प रक्कम खर्च केली जात असे. दुसऱ्या महायुद्धानंतर सरकारने लेव्ही वसुली सुरू केली. खूषखरेदी आणि सक्तीची खरेदी या नावाखाली शेतकऱ्यांकडून धान्यवसुली केली जाई. शेतीच्या उत्पन्नातील बराच मोठा भाग सरकारी अधिकारी जबरदस्तीने शेतकऱ्याच्या घरातून काढून नेत. कधी कधी तर शेतकऱ्याच्या कुटुंबाचे पोट भरण्याइतपतही धान्य शेतकऱ्यांच्या घरात शिल्लक ठेवले जात नसे. सरकारी अत्याचाराबरोबरच जहागीरदार, निजामाच्या आशीर्वादाने खेड्यापाड्यांत पसरलेले अरब, रोहिले, सावकार यांच्या सावकारी आणि तदनुषंगिक अत्याचारांनाही शेतकऱ्यांना बळी पडावे लागे. थोडक्यात संस्थानी राजवटीत सामान्य शेतकरी जुलूमजबरदस्ती, आर्थिक शोषण यांच्या वरवंट्याखाली भरडून निघत होता.

१९११ मध्ये सत्तेवर येताच निजामाने संस्थानातील नागरिकांच्या प्राथमिक हक्कांवर जुलमी निर्बंध घालण्यास प्रारंभ केला. नागरिक हक्क जितके दडपता येतील तेवढे दडपण्यास सुरुवात केली. १९२१ मध्ये निजामाने फर्मान काढून सभा-संमेलने, बैठकी, मिरवणुकी यावर निर्बंध टाकले. कोणतीही सभा मंत्रिमंडळाच्या परवानगीशिवाय घेता येत नसे. खाजगी शाळा, ग्रंथालये सुरू करण्यासाठी सरकारची परवानगी अनिवार्य करण्यात आली. या आदेशाचा भंग करणाऱ्यांसाठी कडक शिक्षेची तरतूद करण्यात आली होती.

निजामी राजवटीने केलेल्या मुस्कटदाबीविरुद्ध जनतेने आवाज उठवू नये, संस्थानातील परिस्थिती बाहेर कळू नये याची सरकार पुरेपूर काळजी घेत असे. नवे वृत्तपत्र काढायचे तर सरकारची परवानगी घ्यावी लागे. संस्थानाबाहेर प्रकाशित होणाऱ्या 'केसरी', 'मराठा', 'ज्ञानप्रकाश' इ. बऱ्याच वृत्तपत्रांना संस्थानात बंदी होती.

संस्थानात धार्मिक स्वातंत्र्याबाबत तर आनंदच होता! संस्थानातील हिंदू जनतेचे मनोधैर्य खचावे या दृष्टीने निजामाने काही उपाय योजले होते. संस्थानात नवी देऊळे बांधणे, वा जुन्या देऊळांची दुरुस्ती करणे यांना बंदी होती. दसरा आणि रामनवमी हे सण मोहरमच्या काळात येत असतील तर हे सण कुठल्याही प्रकारची वाद्ये न वाजवता साजरे करावेत असा सरकारी हुकूम काढण्यात आला होता. मशिदीसमोरून वाद्ये वाजवत नेण्यावर बंदी होती. निज़ामाच्या जातीय भूमिकेचा कडेलोट म्हणजे निजामाने 'तबलीग'साठी- म्हणजे धर्मशुद्धीच्या कार्यासाठी- संस्थानाच्या अर्थसंकल्पात २० लाख रू. ची वार्षिक तरतूद केली होती. अर्थात ही तथाकथित धर्मशुद्धी म्हणजे धर्मांतरच अपेक्षित होते.

स्वतःच्या कडव्या मुस्लिमधार्जिण्या भूमिकेशी सुसंगत ठरेल असाच आकार निजामाने संस्थानातील शिक्षणव्यवस्थेला दिला होता. प्राथमिक शाळेतील पहिले चार वर्ग वगळता वरच्या सर्व वर्गांतील शिक्षणाचे माध्यम उर्दू करण्यात आले होते. उर्दू विषयाचे अध्यापन करण्यासाठी ज्याची मातृभाषा उर्दू आहे असाच शिक्षक शाळेत नेमण्यासाठी शाळांवर सक्ती करण्यात आली होती. उर्दूखेरीज अन्य माध्यमांच्या शाळांना परवानगी देण्यात येत नसे. याशिवाय संस्थानातील खेड्यापाड्यांत चालणाऱ्या गावठी शाळांवर निर्बंध घालण्यात आले होते. त्यामुळे खेड्यापाड्यांतून मातृभाषेत शिक्षण घेणाऱ्या मुलांच्या संख्येत प्रचंड मोठी घट झाली. हाच दृष्टिकोन डोळ्यांपुढे ठेवून १९१८ मध्ये उर्दू माध्यमाचे स्वतंत्र उस्मानिया

विद्यापीठ स्थापन करण्यात आले. या विद्यापीठाचा उर्दू माध्यमाचा अभ्यासक्रम तयार करण्यात आला. विज्ञान आणि सामाजिक शास्त्रे यांचे अभ्यासक्रम उर्दू भाषेत आणण्यासाठी १४ ऑगस्ट १९१७ रोजी मोहम्मद अब्दुल हक यांच्या अध्यक्षतेखाली भाषांतर विभाग स्थापन करण्यात आला. प्रयत्नपूर्वक पारिभाषिक उर्दू शब्द तयार करण्यात आले. या सर्व प्रयत्नांमागे निजामाचा हेतू शालेय स्तरापासून विद्यापीठ स्तरापर्यंत मुस्लिम धर्मशिक्षण देऊन कडव्या धर्मनिष्ठ, बुद्धिमान तरुणांची फळी निर्माण करण्याचा होता. याचा परिणाम म्हणून अल्पावधीतच उस्मानिया विद्यापीठातून उर्दू जाणणारे पुरेसे प्रशासक या व्यवस्थेतून उदयाला आले. आपण राज्यकर्ते आहोत या अहंगडाने पछाडलेले मुस्लिम सुशिक्षित तरुण संस्थानात वेगवेगळ्या हुद्यांवर काम करू लागले. निजामाचा धर्मांध, सरंजामी विचारांचा राज्यशकट हाकू लागले. या तरुणांच्या अत्याचारी प्रशासनामुळे गोरगरीब जनता त्रस्त होऊ लागली. निजामाची उर्दूला प्राधान्य देण्याची भूमिका, मुस्लिमांना सर्वाधिक सोयीसवलती देण्याचा दृष्टिकोन यामुळे सामान्यातल्या सामान्य मुसलमानाला आपणच राज्यकर्ते आहोत असे वाटू लागले. आणि संस्थानातील हिंदू जनतेला हे राज्य परके वाटू लागले.

शेवटचा निजाम मीर उस्मानअलीखान याने सत्तेवर येताच स्वतंत्र मुस्लिम राष्ट्राचे स्वप्न प्रत्यक्षात आणण्याच्या दृष्टीने योजनाबद्ध पावले टाकण्यास प्रारंभ केला. आपला पूर्वज पहिला निजामुल्मुक मोगल सत्तेपासून वेगळा झाला त्या घटनेच्या स्मरणार्थ स्वतंत्र हैदराबादचा स्वातंत्र्य दिन साजरा करण्याची प्रथा उस्मानअलीने १९२२ पासून सुरू केली. १९२५ मध्ये निजामाने तेव्हाचे भारताचे व्हॉईसरॉय लॉर्ड रीडींग यांना पत्र पाठवून आपण इतर संस्थानांप्रमाणे ब्रिटिशांचे मांडलिक नसून ब्रिटिश राजसत्तेप्रमाणेच सार्वभौम सत्ताधीश आहोत असे सूचित केले. हैदराबाद संस्थान हे स्वतंत्र राष्ट्र आहे या भूमिकेला इंग्रजांची मान्यता मिळवण्याचा प्रयत्न निजाम सतत करीत होता हे लक्षात घेतले पाहिजे. लॉर्ड रीडींगने अर्थातच हा युक्तिवाद मान्य केला नाही.

ब्रिटिश सरकारशी डावपेच खेळत असतानाच दुसरीकडे पुढे-मागे हैदराबाद संस्थान स्वतंत्र राष्ट्र झाल्यास आपली सर्वसिद्धता असावी या दृष्टीने निजाम आपल्या संस्थानाचे नियोजन करीत होता. त्याने आपली स्वतंत्र नाणेव्यवस्था, पोस्ट, रेल्वे निर्माण केले. ब्रिटिश नोकरांच्या I.C.S. च्या तोडीची H.C.S. नावाची हैदराबाद सनदी नोकरशाही त्याने निर्माण केली. आंतरराष्ट्रीय स्तरांवर आपल्याला पाठिंबा

देणाऱ्या राष्ट्रांचा मतकक्ष त्याने तयार केला होता. मुस्लिम राष्ट्रांमध्ये खलिफाला असणाऱ्या आदराचे स्थान लक्षात घेऊन निजामाने इराणच्या राजकन्यांना आपल्या सूना म्हणून आणले. ही लग्नेसुद्धा निजामाच्या राजकीय उद्दिष्टांचाच भाग होती.

निजामाने हैदराबाद संस्थान हे स्वतंत्र सार्वभौम इस्लामिक राष्ट्र व्हावे, या दृष्टीतून मुत्सदीपणाने पावले टाकली होती. निजामाचे हे स्वप्न प्रत्यक्षात उतरले असते तर काश्मीरसारखा एक ज्वलंत प्रश्न स्वतंत्र भारतासाठी कायमची डोकेदुखी झाला असता.

संस्थानातील दडपशाहीविरुद्ध जनसामान्यांच्या मनात संघर्षाचे स्फुल्लिंग पेटवणाऱ्या स्वामी रामानंद तीर्थांनी निजामाचे स्वतंत्र राष्ट्राचे स्वप्न धुळीस मिळवले. स्वामीजींच्या नेतृत्वाने आकार घेण्यापूर्वीच संस्थानातील जनतेच्या मनात असंतोषाचा अग्नी सुप्तावस्थेत धुमसत होता. लोकांच्या मनात हळूहळू प्रतिकाराची भावना निर्माण होत होती. आपल्या हक्कांचे जागृत होत जाणारे भान हळूहळू संस्थानातील जनतेला सर्वकष संघर्षाला सन्मुख करीत होते. त्यातूनच जनजागृतीच्या चळवळी जन्म घेत होत्या.

✿

# जनजागृतीच्या चळवळी

हैदराबाद संस्थान चोहो बाजूंनी ब्रिटिश मुलखाने वेढलेले होते. त्यामुळे ब्रिटिश मुलखात होणाऱ्या राजकीय व सामाजिक घडामोडींचे परिणाम संस्थानातही होणे स्वाभाविक होते. ब्रिटिश मुलखात निजामी संस्थानाच्या तुलनेत थोडे जास्त स्वातंत्र्य होते. तेवढा मोकळेपणा हैदराबाद संस्थानात नव्हता. तरीही काही सार्वजनिक उपक्रम झिरपत झिरपत हैदराबादेतही येऊन पोहचले. विसाव्या शतकाच्या प्रारंभीच अशा लोकजागृतीची चिन्हे संस्थानात दिसू लागली. खाजगी शाळा, वाचनालये, व्यायामशाळा व गणेशोत्सव असे त्यांचे स्वरूप होते.

संस्थानात नोकरीनिमित्त पश्चिम महाराष्ट्रातील लोक आलेले होते. तसेच संस्थानातील काही समाजधुरीण पश्चिम महाराष्ट्रातील सामाजिक संस्था आणि नेते यांच्याशी थोडाफार संबंध राखून होते. अशा अनेक माध्यमांतून जनजागृतीचे दळणवळण सुरू होते. संस्थानात राजकीय चळवळींना बंदी असल्यामुळे धार्मिक आणि सामाजिक गोष्टींना प्रथम प्राधान्य मिळाले. लोकमान्य टिळकांनी सुरू केलेल्या गणेशोत्सवाचे लोण संस्थानात फार लवकर पोहचले. गणपतीच्या मेळ्यांमार्फत देशभक्तिपर वातावरण तयार होऊ लागले. विद्यार्थ्यांचे बरेच गट त्यात भाग घेत. हे गणेशोत्सव हैदराबाद शहरात आणि लगोलग औरंगाबाद येथे सुरू झाले. टिळकांच्यापासून प्रेरणा घेऊन प्रवचने आणि कथा कीर्तनाच्या रूपाने मराठवाड्यात स्वदेशीच्या प्रचारसभा झाल्या. गणेशोत्सवातील मेळे, या मेळ्यात होणारी व्याख्याने यांच्या माध्यमांतून लोकांना अभिव्यक्तीचे साधन मिळाले.

संस्थानामध्ये सरकारच्या धोरणामुळे खाजगी शिक्षणसंस्थांची वाढ वेगाने होऊ

शकली नाही. परंतु तरीही हैदराबाद, गुलबर्गा, औरंगाबाद इ. शहरात खाजगी शिक्षणसंस्था सुरू झाल्या. १९०७ मध्ये हैदराबादेत विवेकवर्धिनी विद्यालय निघाले. न्या. रानडे आणि नामदार गोखले यांचे अनुयायी समजले जाणारे केशवराव कोरटकर या शाळेचे अध्यक्ष होते. तर लोकमान्य टिळकांचे अनुयायी समजले जाणारे वामनराव नाईक चिटणीस होते. १९०८ मध्ये गुलबर्गा येथे विठ्ठलराव देऊळगावकर यांनी नूतन विद्यालयाची स्थापना केली. १९१६ मध्ये औरंगाबाद येथे सरस्वती भुवन शाळा निघाली. १९२१ मध्ये उस्मानाबाद जिल्ह्यातील हिप्परगा येथे निवासी माध्यमिक शाळा स्थापन झाली. सरकारी निर्बंधांची तमा न बाळगता १९३५ नंतर संस्थानात १५ ते २० खाजगी शाळा निघाल्या. या शाळांमधून विद्यार्थ्यांवर स्वातंत्र्यप्रेमाचे, राष्ट्रभक्तीचे संस्कार सातत्याने केले जात होते. या शाळांमधून राष्ट्र-प्रेमाने प्रेरित झालेले शेकडो तरुण नंतर हैदराबाद स्वातंत्र्यलढ्यात सहभागी झाले.

खाजगी शिक्षण संस्थांसोबतच संस्थानात वाचनालये स्थापन करण्याकडेही कार्यकर्त्यांनी लक्ष पुरवले. परभणी येथे १९०१ मध्ये गणेश वाचनालय स्थापन करण्यात आले. याच प्रेरणेतून औरंगाबादचे बलवंत वाचनालय सुरू झाले. अशा वाचनालयांतून राष्ट्रीय वृत्तीला प्रेरणादायी ठरणारे साहित्य उपलब्ध असे. संस्थानात बंदी असलेले ग्रंथ, क्रांतिकारकांची चरित्रे तरुणांना वाचनासाठी उपलब्ध असत. त्यामुळे संस्थानाबाहेरील ब्रिटिश मुलखात सुरू झालेल्या स्वातंत्र्य आंदोलनाची, राजकीय घडामोडीची माहिती तरुणांना होत असे. संस्थानातील तरुणांच्या मनात स्वातंत्र्याची आकांक्षा निर्माण होण्यासाठी या वाचनालयांची फार मोठी मदत झाली.

संस्थानातील स्वातंत्र्य लढ्यात आखाडे, व्यायामशाळा यांनी फार मोलाची कामगिरी बजावली. या कामी प्रथम आर्यसमाजाने पुढाकार घेतला. शरीरसंवर्धनाबरोबरच समाजरक्षणाचे काम या व्यायाम शाळांमधील प्रशिक्षित तरुणांनी केले. दिंडी, दसरा, गणेशोत्सव प्रसंगी मुस्लिमांचे जे हल्ले होत तेव्हा या हल्ल्यांचा प्रतिकार व्यायाम शाळेतून प्रशिक्षित झालेले तरुण स्वयंसेवक करीत असत. या व्यायामशाळा संघटित करण्याचे कार्य प्रल्हाद कृष्णाजी गरूड गुरुजी यांनी केले. औरंगाबादच्या समर्थ आणि गणेश व्यायामशाळा म्हणजे स्वातंत्र्य आंदोलनासाठी कार्यकर्ते तयार करण्याची प्रमुख केंद्रेच होती. या व इतर व्यायामशाळांशी संबंधित असलेले कित्येक तरुण नंतर हैदराबाद स्वातंत्र्य लढ्यात सहभागी झाले.

मराठवाड्यात खाजगी वाचनालयांची जशी स्थापना झाली तशीच आंध्रातही

तेलगू भाषिकांनी ग्रंथालय चळवळ सुरू केली. १९०६ मध्ये हैदराबाद येथे 'श्रीकृष्ण देवराय तेलगू भाषा निलयम' नावाचे ग्रंथालयं स्थापन करण्यात आले. पुढे माडपाटी हनुमंतराव यांच्या नेतृत्वाखाली तेलंगणात वाचनालयांचे एक मोठे जाळेच निर्माण झाले.

लोकमान्यांच्या निधनानंतर संस्थानामध्ये खिलाफतची चळवळ व स्वदेशीची चळवळ या चळवळी आगेमागे येऊन पोहचल्या. खिलापत चळवळीत मुस्लिम नेतृत्वाला रस असल्याने या चळवळीला पाठबळ मिळून संस्थानात काही काळ हिंदु-मुस्लिम ऐक्याचा देखावा दिसू लागला. अर्थात हे चित्र फार काळ टिकले नाही. इंग्रजांच्या सांगण्यानुसार महायुद्धामध्ये तुर्कस्थानविरुद्ध लढणाऱ्या दोस्त राष्ट्रांना निजामाला आपला पाठिंबा जाहीर करावा लागला. नंतरच्या काळात खाजगी शाळा, व्यायाम शाळा, वाचनालये या सर्वांवर बंधने आली. सरकारने त्यांची वाढ होऊ दिली नाही. खाजगी शाळा आणि ग्रंथालये यांना मदत देणे तर दूरच राहिले. पण त्यांना सरकारी अवकृपेचे धनी व्हावे लागले.

हैदराबाद स्वातंत्र्यलढ्याच्या मुळाशी राजकीय, धार्मिक संघर्षाबरोबरच भाषिक संघर्षाचाही संदर्भ होता. निजाम राजवटीने उर्दू भाषेला शिक्षणाचे माध्यम म्हणून स्थान देताना, राज्यकारभाराची भाषा म्हणून उर्दू ठेवताना तेलगू, मराठी, कन्नड भाषांबद्दल अन्यायाचीच भूमिका स्वीकारली. त्यामुळे या भाषांचा संकोच झाला. याचा परिणाम म्हणून एरव्ही राजकीयदृष्ट्या निरुपद्रवी ठरणाऱ्या भाषाविषयक आणि साहित्यविषयक चळवळींना राजकीय दृष्ट्या प्रतिक्रियात्मक व संघर्षात्मक स्वरूप आले. या चळवळींकडे सरकार राजसत्तेविरुद्धच्या कारवाया म्हणून पाहू लागले. वाचनालये उघडणे सरकारविरोधी कारवाई ठरली. केवळ वाङ्मय विकासाच्या उद्दिष्टाने स्थापन होणाऱ्या साहित्य परिषदेलाही परवानगी नाकारण्यात आली. १९१५ च्या आसपास केशवराव कोरटकर आणि वामन नाईक यांच्या पुढाकाराने 'डेक्कन लिटररी असोसिएशन'ची स्थापना करण्यात आली. या संघावर संस्थानाबाहेरून कोणत्याही साहित्यिकाला बोलावण्यात येऊ नये असे बंधन घालण्यात आले.

१९३७ मध्ये निजाम प्रांतीय मराठी साहित्य परिषद कायम होऊन तिचे अधिवेशन बाळकृष्ण गणेश खापर्डे यांच्या अध्यक्षतेखाली हैदराबादला झाले. या संमेलनात निजामी कचेऱ्यांतील सरकारी कामकाज मराठवाड्यात मराठीत करावे असा ठराव करण्यात आला. १९४४ पासून ही साहित्य संमेलने मराठवाडा साहित्य

परिषद या नावाने होऊ लागली. या संमेलनांमधून होणारे ठराव प्राय भाषा व साहित्य यांच्या अभिवृद्धीच्या संदर्भातच असत. पण सरकारच्या भूमिकेमुळे साहित्य संस्थांच्या चळवळींना राजकीय संघर्षाचे स्वरूप आले. साहित्य आणि भाषा यांच्यासह जेवढे म्हणून जनतेचे मूलभूत हक्क आहेत ते मिळविण्यासाठी उग्र संघर्ष द्यावा लागेल हे वस्तुस्थिती जनसामान्यांच्या लक्षात येऊ लागली होती.

हैदराबाद संस्थानात सरकारच्या धर्मांध दृष्टिकोनामुळे हिंदूंचे धार्मिक प्रश्न जटील बनले होते. उपासना स्वातंत्र्यावर, धार्मिक मिरवणुकींवर सरकारी बंधने तर आलीच होती. याशिवाय 'इत्तेहादुल मुसलमीन' हिंदूचे धर्मांतर वेगाने करीत होते. या संघटनेला सरकारचा आशीर्वाद होता. इत्तेहादुल मुसलमीन या संस्थेच्या धर्मांतराच्या चळवळीस आर्य समाजाने चोख प्रत्युत्तर दिले. हैदराबाद येथे आर्यसमाजाची स्थापना १८९२ मध्ये झाली. न्या. केशवराव कोरटकर कित्येक वर्षे आर्यसमाजाचे अध्यक्ष होते. १९३२ नंतर त्यांचे पुत्र विनायकराव वेदालंकार यांनी आर्यसमाजाची धुरा वाहिली. आपली धार्मिक कर्तव्ये पार पाडण्यात सरकारी कायदे आड येत असतील तर अशा यंत्रणेस .विरोध करण्याचा कणखरपणा आर्यसमाजामुळे लोकांत निर्माण झाला. १९३८ च्या सत्याग्रहात हजारो सत्याग्रही आर्यसमाजाने सहभागी केले. १९३१ मध्ये केवळ तीस शाखा असलेल्या आर्यसमाजाच्या १९४१ मध्ये २४१ शाखा संस्थानात निर्माण झाल्या. पुढे स्टेट काँग्रेसचे कार्य ज्यांनी केले त्यापैकी अनेक कार्यकर्ते १९२५ ते ३५ या दशकात आर्यसमाजाच्या चळवळीत होते. राजसत्तेला आव्हान देऊन लोकशक्ती जागृत करण्याच्या कामी संस्थानातील आर्यसमाजाने सिंहाचा वाटा उचलला. न्या. केशवराव कोरटकर, श्रीपाद दामोदर सातवळेकर, दत्तो अप्पाजी तुळजापूरकर, वामन नाईक इ. व्यक्तींनी सार्वजनिक जीवनात जागृती करण्यासाठी अहर्निश प्रयत्न केले.

लोकांमध्ये एव्हाना असंतोष धुमसू लागला होता. तो बाहेर पडण्यासाठी धडपडत होता. त्याचा पहिला आविष्कार सामाजिक परिषदेच्या रूपाने झाला. १९१३ मध्ये न्या. बालमुकुंद यांच्या पुढाकाराने 'ह्युमॅनिटेरियन लीग'ची स्थापना करण्यात आली. या लीगमध्ये नंतर तेलंगणातील हरिजन नेते भाग्यरेड्डी वर्मा सहभागी झाले. त्यांनी 'आदि हिंदू लीग' काढून अस्पृश्योद्धाराचे कार्य हाती घेतले. या कामी त्यांना केशवराव कोरटकर व वामन नाईक यांचे मोलाचे सहकार्य लाभले. याच ह्युमॅनिटेरियन लीगमधून पुढे सामाजिक सुधारणा परिषद आकाराला

आली. या परिषदेच्या उभारणीचे श्रेय नांदेड जिल्ह्यातील कवाना या गावचे नागोराव देशमुख यांना जाते. १९३८ पासून या परिषदेची सहा अधिवेशने कवाना जि. नांदेड, हदगाव जि. नांदेड, नांदेड शहर, हैदराबाद, गुलबर्गा या गावी झाली. या अधिवेशनात संस्थानाबाहेरील अहिताग्नी राजवाडे, महर्षी अण्णासाहेब कर्वे, सौ. काशीबाई किर्लोस्कर इ. थोर व्यक्ती सहभागी झाल्या होत्या. या परिषदांमध्ये प्रामुख्याने हुंडाबंदी, मद्यपान निषेध इ. विषयांवर ठराव करण्यात आले होते. कन्या विद्यालयाच्या स्थापनेची तसेच मोफत सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाची मागणी करणारे ठरावही या परिषदांमधून संमत करण्यात आले.

संस्थानातील खरा गाभ्याचा प्रश्न राजकीय स्वरूपाचा होता. जबाबदार राज्य पद्धती हा ऐरणीवरचा प्रश्न होता. त्याची मागणी करणे जनसामान्यांना निकडीचे वाटू लागले. त्या हेतूने १९२१ मध्ये 'हैदराबाद राजकीय सुधारणा परिषद' ही संस्था स्थापन झाली. याच वर्षी सरकारने संस्थानात राजकीय संघटनांवर बंदी करणारे फर्मान काढले होते. संस्थानामध्ये या परिषदेच्या अधिवेशनांना परवानगी मिळणे शक्यच नव्हते. त्यामुळे या संस्थेची चारही अधिवेशने १९२३ ते १९३१ या कालावधीत संस्थानाबाहेर काकिनाडा, मुंबई, पुणे आणि अकोला या गावी झाली. या अधिवेशनांच्या अध्यक्षपदी अनुक्रमे लोकनायक बापूजी अणे, या. मा. काळे, तात्यासाहेब केळकर, बॅ. रामचंद्र नाईक हे होते. अकोला येथील परिषदेचे वैशिष्ट्य असे की, प्रथमत:च जबाबदार राज्यपद्धतीची मागणी करणारा ठराव या अधिवेशनात पास करण्यात आला.

संस्थानाबाहेर झालेल्या या अधिवेशनातील चर्चांना वृत्तपत्रांत बरेच महत्त्वाचे स्थान मिळत असे. या अधिवेशनांच्या निमित्ताने निजामाच्या एकतंत्री राजवटीवर वृत्तपत्रांतून जाहीर टीका होऊ लागली. संस्थानी प्रश्नांना जाहीर वाचा फुटली. या अधिवेशनांच्या निमित्ताने सर्वानाच संस्थानात राज्यव्यापी राष्ट्रीय राजकीय संघटनेची गरज भासू लागली.

शिक्षणविषयक धोरण हे निजामी राजवटीचे मर्मस्थान होते. स्वतंत्र मुस्लिम राष्ट्राच्या स्वप्नपूर्तीसाठी मीर उस्मानअली ज्या दिशेने वाटचाल करीत होता त्यात संस्थानातील शिक्षणविषयक धोरण हे महत्त्वाचे हत्यार होते. त्या दृष्टीने 'दारूल उलूम' या संस्थेच्या माजी विद्यार्थ्यांनी 'हैदराबाद एज्युकेशनल कॉन्फरन्स' नावाची संस्था स्थापन केली. या परिषदेवर सर्वस्वी सरकारचा ताबा होता. उस्मानिया विद्यापीठाची स्थापना व उर्दू माध्यमाचे श्रेय या परिषदेलाच आहे. परिषदेचे हे स्वरूप

लक्षात घेऊन हिंदू लोक या परिषदेतून बाहेर पडले. आणि 'हैदराबाद जनता शिक्षण परिषद' नावाची संस्था कायम केली. १९२८ मध्ये केशवराव कोरटकर यांच्या अध्यक्षतेखाली या परिषदेची स्थापना करण्यात आली. शिक्षण क्षेत्रामध्ये निजाम सरकारने जे जाचक निर्बंध लादून खाजगी शाळा, वाचनालये काढणे अशक्य केले होते त्या विरुद्ध लोकमत संघटित करावे, उर्दू भाषेच्या शिक्षणाची सक्ती रद्द करून मातृभाषेच्या शिक्षणाची सोय करावी या उद्दिष्टांनी शिक्षण परिषदेची स्थापना करण्यात आली होती. या परिषदेची १९२९ ते १९४४ या कालावधीत पाच अधिवेशने झाली.

संस्थानातील शैक्षणिक, सामाजिक, सांस्कृतिक प्रश्न सोडविण्यासाठी तेलंगण विभागात आंध्र महासभा व कर्नाटकामध्ये कर्नाटक परिषद या संस्था स्थापन झाल्या होत्या. या संस्थांचे स्वरूप प्राय बिगर राजकीय होते. संस्थानातील सामाजिक, शैक्षणिक चळवळीपुरते या संस्थांचे कार्यक्षेत्र सीमित होते. संस्थानातील बदलत्या परिस्थितीत या संस्थांमध्ये कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांना बिगर राजकीय कार्य पुरेसे वाटेनासे झाले. या कार्यकर्त्यांना राजकीय स्वातंत्र्याशिवाय सामाजिक, आर्थिक, सांस्कृतिक विकास अशक्यप्राय आहे असे वाटू लागले होते. जनतेच्या सार्वभौमत्वासाठी उघड लढा देण्याची गरज वाटत होती.

राजधानीतील प्रतिष्ठित राजकीय नेत्यांचे धोरण सरकारला न दुखावता करता येईल तितके राजकारण करण्याचे आणि सुधारणा पदरात पाडून घेण्याचे होते. ही मंडळी खाजगी बैठकीत जहाल भाषा वापरत. पण जाहीरपणे विनम्र, मवाळ भाषा बोलत. राजसत्तेविरुद्ध जनआंदोलन करण्यासाठी जे धाडस, जी हिंमत लागते या गुणांचा अभाव या राजकीय नेत्यांमध्ये होता.

अशा प्रकारचे धाडसी, निग्रही, कणखर नेतृत्व संस्थानातील जनतेला स्वामी रामानंद तीर्थ यांच्या रूपाने लाभले आणि संस्थानातील स्वातंत्र्याचा लढा उभा राहिला.



# 'संन्याशाचे पोर!'

हैदराबाद संस्थानाच्या मुक्तिलढ्याचे नेतृत्व करून इतिहास घडविणाऱ्या स्वामी रामानंद तीर्थ यांचे पूर्वाश्रमीचे नाव व्यंकटेश भवानराव खेडगीकर!

त्यांचा जन्म कर्नाटकातील विजापूर जिल्ह्यातील सिंदगी या गावी ३ ऑक्टोबर १९०३ रोजी झाला. हे गाव संस्थानाबाहेर होते. सरकारी कागदपत्रांत त्यांचे जन्मगाव हैदराबाद संस्थानामधील गुलबर्गा जिल्ह्यातील चिनमेल्ली असे नोंदवले गेले आहे. याचे कारण असे की, हैदराबाद संस्थानात संस्थानाबाहेरील व्यक्तीस राजकारणात सहभाग घेतल्यास 'गैरमुलकी' ठरवून हद्दपार केले जाई. हे संकट टाळण्यासाठी स्वामीजींचे जन्मगाव चिनमेल्ली असल्याची नोंद चिनमेल्लीच्या जन्म-मृत्यू रजिस्टरमध्ये करण्यात आली.

स्वामीजींचे वडील भवानराव खेडगीकर हे सिंदगी या गावी कानडी प्राथमिक शाळेत बरीच वर्षे मुख्याध्यापक होते. स्वामीजींचे प्राथमिक शिक्षण याच गावी झाले. स्वामीजी मुळात कन्नड भाषिक. हे घराणे हंडी तालुक्यातील सिंदगी या गावचे होते. हे गाव भीमा नदीच्या काठावर वसलेले आहे. ही नदी महाराष्ट्र-कर्नाटक राज्याच्या दरम्यान सरहद्दीवरून वाहते. त्यामुळे स्वामीजी कानडी भाषिक असले तरी मराठी भाषेचा त्यांना बालपणापासून सराव होता. अगदी लहानपणापासून कानडी-मराठी या दोन्ही भाषा ते उत्तम बोलत.

स्वामीजींचे वडील भवानराव खेडगीकर हे प्रपंचात असूनही विरक्त होते. वेदांत आणि अध्यात्म याकडे त्यांचा कल होता. विरक्ती आणि अनासक्ती त्यांच्या रोमारोमात भिनली होती. शाळेचे कामकाज संपल्यावर ते आपल्या शिष्यगणांसमोर

अध्यात्म विवेचन करीत. लहान वयातला व्यंकटेश हे प्रतिपादन ऐकत असे. परंतु त्याचा अर्थ त्याला समजत नसे. ते मधुर आवाजात प्रार्थनागीत म्हणत असत. या गीतांचा अर्थ व्यंकटेशला समजणे शक्यच नसे. परंतु या गीतांच्या स्वरमाधुर्याने तो भारावून जात असे. वडील प्राणायाम करीत असताना गाढ ध्यानमग्न अवस्थेत असल्याचे दृश्य व्यंकटेशने अनेकवार पाहिले होते. या सर्व गोष्टींचा व्यंकटेशच्या बालमनावर खोल असा संस्कार झाला. या सर्वांचा परिणाम म्हणून व्यंकटेशच्या बालमनाला साधू-संन्याशी, बैरागी, निर्जन नदीकाठ, यांचे बालपणापासून विलक्षण आकर्षण वाटू लागले.

व्यंकटेशचे वडील भवानराव विरक्त वृत्तीचे तर होतेच; पण त्यांना संन्यस्त जीवनाचेही जबरदस्त आकर्षण होते. एक मुलगा आणि दोन मुलींचा जन्म झाल्यानंतर त्यांनी संन्यास घेतला व घर सोडून निघून गेले. त्यांच्या गुरूंना भवानराव कुटुंबवत्सल प्रापंचिक गृहस्थ आहेत असे समजल्यानंतर गुरूंनी त्यांना पुन्हा गृहस्थाश्रम स्वीकारण्यास सांगितले. गुरूंच्या आज्ञेनुसार भवानराव पुन्हा प्रपंचात परतले. प्रपंचात परतल्यानंतर भवानरावांना तुंगाबाई, व्यंकटेश, कमलाबाई, भीमराव अशी चार अपत्ये झाली. संन्यास घेण्यापूर्वी भवानरावांना अण्णाराव, गंगाबाई, यमुनाबाई अशी तीन अपत्ये झाली होती. संत ज्ञानेश्वर आणि त्यांची भावंडे ही जशी संन्याशाची अपत्ये होती त्याचप्रमाणे व्यंकटेश आणि त्याची भावंडे संन्याशाचीच पोरे होती. जन्मापासूनच व्यंकटेशचा जीवनप्रवास रूढ चाकोरीबाहेरचा प्रवास आहे.

आपल्या वडलांच्या संन्यस्त वृत्तीचा वारसा व्यंकटेशने बालवयातच घेतला. या संदर्भातील एक घटना लक्षणीय आहे. एक दिवस व्यंकटेश आपल्या वडलांसोबत सीना नदीवर गेला. नदीचा प्रवाह शांतपणे वाहात होता. त्याचे वडील एका खडकावर बसले. त्यांनी ध्यानस्थ अवस्था धारण केली... मिटलेले डोळे... गाढ निद्रेत आहेत असे वाटण्यासारखे डोळे... निमग्न अवस्था... सर्वत्र निस्त:ब्ध शांतता... वाहणाऱ्या पाण्याचा आवाज... तोच काय तो शांत वातावरणात ओरखडा ओढल्यासारखा... त्यांनी हळूहळू डोळे उघडले. सोबत आणलेली फुले, बिल्वदले हाती घेऊन नदीकडे चालू लागले. नदीच्या प्रवाहात गुढघाभर पाण्यात गेले... फुले प्रवाहात सोडली... ते स्वत:शीच मोठमोठ्याने हसत होते. त्यांनी व्यंकटेशला जवळ बोलावले. जवळ जाताच त्यांनी विचारले, ''तुला लग्न करून घ्यायचे आहे काय?'' व्यंकटेशने तात्काळ उत्तर दिले, ''नाही, कधीच नाही.''

वडलांनी पुन्हा विचारले, ''मग तू जगात कसा राहशील?'' व्यंकटेशने उत्तर दिले, ''घरोघर भिक्षा मागून संन्याशासारखा राहीन.''

नियतीने व्यंकटेशची ही इच्छा भविष्यात पूर्ण केली. साधू, संन्याशी, संन्यस्त जीवन यांचे व्यंकटेशला लहानपणापासून आकर्षण वाटत असले तरी देवपूजा वगैरे कर्मकांडात त्याला स्वारस्य नव्हते. व्यंकटेशचे कुटूंब वैष्णव ब्राह्मणांपैकी होते. वैष्णवांमध्ये तप्त मुद्रा घेतली जाते. एकदा सोलापूरला उत्तरादिमठाचे मध्वाचार्य चातुर्मासाकरता आले होते. सगळ्या कुटुंबीयांनी तप्तमुद्रा घेतल्या. व्यंकटेशने मात्र तप्तमुद्रा घेण्यास नकार दिला.

व्यंकटेशचे चुलते रामभाऊ खेडगीकर सोलापूर येथे रेल्वेत नोकरीस होते. पुढे ते रेल्वे कामगारांचे पुढारी म्हणून प्रसिद्धीस आले. त्यांनी व्यंकटेशचे प्राथमिक शिक्षण पूर्ण झाल्यावर पुढील शिक्षणासाठी व्यंकटेशला सोलापूरला आणले. नॉर्थकोट हायस्कूल नावाच्या सरकारी शाळेत इंग्रजी दुसरीत व्यंकटेशला प्रवेश दिला. आणि शाळेला जोडून असलेल्या वसतिगृहात त्याला दाखल केले. रामभाऊंची आर्थिक स्थिती फारशी चांगली नव्हती. त्यामुळे ते व्यंकटेशला फारशी आर्थिक मदत करू शकत नसत. व्यंकटेशला शाळेत नादारी मिळालीच होती. वसतिगृहात सवलत मिळावी म्हणून व्यंकटेश तेथे वाढप्याचे काम करी.

नॉर्थकोट हायस्कुलात शिकत असतानाच व्यंकटेशची एकनाथ गोडबोले नावाच्या वर्गमित्राशी मैत्री झाली. व्यंकटेश आपले अंतरंग या मित्राजवळ उघडे करीत असे. व्यंकटेशच्या बालमनात रुजलेल्या संन्यस्त वृत्तीचा आविष्कार लहानपणापासूनच पाप-पुण्याच्या कल्पनेच्या रूपात त्याच्या आचारा-विचारांतून व्यक्त होत होता. आपण मनाने दुबळे आहोत आणि आपल्याकडून पापाचरण घडते अशा विचारांनी या काळात व्यंकटेशच्या मनाला ग्रासून टाकले. आपणाकडून पापाचरण घडू नये याबद्दल तो सदैव दक्षता बाळगत असे. एकनाथ-सारख्या मित्रांसोबत राहिल्यास आपणाकडून पापाचरण घडणार नाही असे त्याला वाटे आणि असे आचरण आपल्याकडून घडले असे जर वाटले तर त्याची कबुली एकनाथजवळ दिल्याशिवाय व्यंकटेशला स्वस्थता लाभत नसे. चहा पिणे, खोटे बोलणे अशा किरकोळ गोष्टीही व्यंकटेशच्या दृष्टीने पापाचरणात मोडणाऱ्या होत्या. या बाबतीतील एक घटना उल्लेखनीय आहे. व्यंकटेश मॅट्रिकच्या वर्गात शिकत असतानाची ही घटना आहे. परीक्षा जवळ आल्यामुळे आपल्याजवळ मनगटी घड्याळ असणे अभ्यासाच्या दृष्टीने सोयीचे आहे असे व्यंकटेशला वाटत होते.

घड्याळ विकत घेणे परिस्थितीमुळे अशक्य होते. म्हणून त्याने परीक्षेपुरते आपल्या मित्राकडून घड्याळ मागून घेतले. पुण्यास जाऊन मॅट्रिकची परीक्षा दिली. दरम्यान सदैव हातात असणाऱ्या घड्याळाबद्दल व्यंकटेशच्या मनात अभिलाषा निर्माण झाली आणि हे घड्याळ हरवले असे त्याने मित्राला खोटेच सांगितले. असे सांगताना एकीकडे आपण पाप करीत आहोत याची बोचणीही मनाला होती. तर घड्याळाचा मोहही अनावर होत होता. शेवटी मोहाने विजय मिळविला. परंतु नंतर ही चोरी एकनाथसमोरच उघडी पडली. व्यंकटेशच्या सारवासारवीने एकनाथचे समाधान झाले नाही. मॅट्रिकनंतर पुढील शिक्षणासाठी व्यंकटेश अंमळनेरला गेला. पण या घटनेची बोंच कायम होती. जगणे असह्य होऊ लागले. मनावरचा ताण वाढू लागला. या अवस्थेतच त्याने एकनाथला दीर्घ पत्र पाठवून घड्याळ प्रकरण कळवले आणि आपण आपल्या मित्राशी प्रतारणा केल्याबद्दल पश्चाताप व्यक्त केला आणि ''मी पूर्ण शुद्ध होईन म्हणजे तुझ्या मैत्रीस लायक ठरेन.'' अशी भावूक आशा पत्रातून व्यक्त केली. ही घटना किरकोळ असली तरी व्यंकटेशचा मानसिक प्रवास पाप टाळण्याकडे होत होता या बाबीचा ज्याप्रमाणे निर्देश करणारी आहे, त्याचप्रमाणे व्यंकटेशच्या मानसिक प्रवासाची ही निदर्शक घटना आहे.

व्यंकटेश शिकत असताना देशात बऱ्याच महत्त्वाच्या राजकीय घडामोडी घडत होत्या. लोकमान्य टिळक मंडालेच्या तुरुंगातून सुटले होते. एक विद्वान, त्यागी, कणखर, जहाल राष्ट्रनेता म्हणून टिळकांची प्रतिमा सर्वमान्य झाली होती. महाराष्ट्रातील तरुण वर्ग तर टिळकांच्या व्यक्तिमत्वाने कमालीचा भारावलेला होता. १९१५ मध्ये गांधीजी आफ्रिकेहून परतले होते. त्यांनी अहमदाबादेत सत्याग्रह आश्रमाची स्थापना केली होती. जेथे अन्याय होत असेल तेथे धावून जाणारा नेता अशी गांधीजींची देशव्यापी प्रतिमा तयार होत होती. या दरम्यान पहिले महायुद्ध पेटले होते. सहस्रावधी भारतीय सैनिक ब्रिटिशांचे युद्ध परक्या भूमीवर लढत होते. या युद्धाचा खर्चही भारतीय जनतेच्या पैशांतून होत होता. युद्धाच्या प्रयत्नात सर्वांना सहभागी करण्याचा ब्रिटिश सरकारचा प्रयत्न होता.

सोलापूरचे इंग्रज कलेक्टर दर आठवड्यास नॉर्थकोट शाळेस भेट देत. आणि नकाशा लावून त्याच्या आधाराने त्या आठवड्यातील युद्ध आघाडीवरील माहिती विद्यार्थ्यांना सांगत. दोस्त राष्ट्रांचे चांगुलपण आणि जर्मनांचे क्रौर्य विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबवण्याचा आपल्या भाषणांमधून प्रयत्न करीत असत.

नॉर्थकोट हायस्कूल सरकारी असल्यामुळे देशप्रेमाचे निदर्शक असणाऱ्या गोष्टी

करता येत नव्हत्या. गांधी टोपी घातलेली शिक्षकांना आवडत नसे. हा बंदीहुकूम मोडून वर्गात गांधी टोपी घालून बसल्यामुळे व्यंकटेश आणि त्याच्या वर्गमित्रांना छड्या खाव्या लागल्या. या प्रकरणाचा एक परिणाम असा झाला की, सर्व विद्यार्थी संघटित झाले. आणि संघटित विद्यार्थ्यांनी युवक मंडळाची स्थापना केली. या मंडळात देशभक्तांची आणि क्रांतिकारकांची चरित्रे अभ्यासली जात. याच दरम्यान असहकारितेच्या आंदोलनाला प्रतिसाद म्हणून विद्यार्थ्यांनी शाळा सोडण्याचे ठरवले. एक सभा घेऊन हा निर्णय जाहीर करण्याचे ठरले. या सभेसाठी न. चि. केळकरांना आमंत्रित करण्यात आले. ठरल्याप्रमाणे तात्यासाहेब केळकर आले. या सभेत तात्यासाहेबांच्या भाषणानंतर फक्त व्यंकटेशनेच मातृभूमीच्या सेवेसाठी प्रतिज्ञाबद्ध होण्याची शपथ घेतली. नंतर इतर उपस्थित विद्यार्थी शपथ घेतील असे ठरले होते. परंतु उपस्थित विद्यार्थ्यांनी फक्त टाळ्या वाजवल्या. व्यंकटेशने मात्र शपथ आणि प्रतिज्ञा शेवटपर्यंत पाळली.

एप्रिल १९२० मध्ये सोलापूरला महाराष्ट्र प्रांतिक परिषद न. चि. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली भरणार होती. या परिषदेला लोकमान्य टिळक येणार ही बातमी नॉर्थकोट हायस्कूलच्या मुलांना कळाली. लोकमान्यांचे आकर्षण तर सर्व मुलांना होतेच. त्यांचे भाषण ऐकण्याचा, त्यांना प्रत्यक्षात पाहण्याचा दुर्मिळ योग जुळून आला होता. सर्व मुलांनी टिळकांच्या सभेला जाण्याचे ठरवले. पण शाळेचे राजनिष्ठ मुख्याध्यापक सी. एन. नाबरांना मुलांनी या सभेला जाणे मंजूर नव्हते. शाळेची वार्षिक परीक्षा सुरू होती. वेळापत्रकाप्रमाणे सकाळी पेपर होता. मुलांना सभेला जाता येऊ नये म्हणून मुख्याध्यापकांनी त्या दिवशीचा विज्ञान विषयाचा पेपर जाणीवपूर्वक दुपारी ठेवला. व्यंकटेश आणि त्याच्या मित्रांनी चांगले येतील तेवढे प्रश्न घाईघाईने सोडवून हॉल सोडला आणि टिळकांच्या सभेला हजर राहिले. त्यांचा शब्द न शब्द कानात साठवून घेतला. त्यांचे करारी रूप, तेजस्वी व्यक्तिमत्व डोळ्यांत साठवून घेताना व्यंकटेशसह सर्व मित्र रोमांचित झाले. भारावलेल्या मनस्थितीत घरी परतले. अर्थातच दुसऱ्या दिवशी टिळकांच्या सभेला हजर राहिल्याचा गुन्हा केल्याबद्दल सर्व विद्यार्थ्यांना मुख्याध्यापकांच्या छड्या खाव्या लागल्या. शाळेच्या मुख्याध्यापकांच्या इच्छेविरुद्ध टिळकांच्या सभेला हजर राहणे व्यंकटेशच्या दृष्टीने मोठेच धाडस होते. या गुन्ह्यामुळे शाळेची व वसतिगृहाची नादारीची सवलत रद्द होण्याचा धोका होता. परंतु हे धाडस त्याने केले.

पण काळाला तरुण पिढीने टिळकांच्या प्रभावाखाली भारून जाऊन ध्येयधुंद

जगणे जणू मान्यच नव्हते. १ ऑगस्ट १९२० रोजी लोकमान्य टिळकांचे मुंबईच्या सरदार गृहात दु:खद निधन झाले. सारे राष्ट्र शोकसागरात बुडाले. लोकांच्या झुंडीच्या झुंडी शोकाकूल अवस्थेत सरदार गृहाच्याकडे निघाल्या. या घटनेने व्यंकटेशच्या मनावर तीव्र आघात झाला. दशदिशा अंधारून आल्यासारख्या झाल्या. काय करावे काही सुचेना. त्याची पावले एकनाथ गोडबोलेच्या घराकडे वळली. एकनाथचीही अवस्था व्यंकटेशच्यापेक्षा निराळी नव्हती. दोघांनाही अश्रू आवरेनात. व्यंकटेशने दिवसभर उपवास केला. त्याची पावले सिद्धेश्वराच्या मंदिराकडे वळली. स्वामीजींनी आपल्या आठवणीत लिहिले आहे :

''मी तळ्याच्या पायऱ्यांवर बसलो. तळ्याचे पाणी पायऱ्यापर्यंत होते. मी खूपखूप रडलो. किती वेळ मला आठवत नाही. बाहेरच्या जगाचा बहुतेक मला विसर पडला होता. मी अगदी शून्यमनस्क बनलो. न कोणता विचार न कोणती जाणीव! संध्याकाळ झाली होती. सूर्य अस्तास चालला होता. मी एकदम उभा राहिलो. दोन्ही हातांच्या ओंजळीत तळ्याचे पाणी घेतले. आणि मावळत्या सूर्यास अर्घ्य दिले आणि भाविकपणे स्वत:शीच पुटपुटलों, 'या क्षणापासून माझे पुढील जीवन मी पूर्णपणे मातृभूमीच्या सेवेसाठी अर्पीन. सर्वसंगपरित्याग करून आजन्म ब्रम्हचारी राहीन.' मी अर्घ्य दिले अन् ध्यानमग्न झालो.

तेव्हापासून पुढे जीवन प्रवाह बदलला. आंतरिक जीवनाची ओढ जाणवू लागली होती. सारी तळमळ शांत झाली. जीवन त्यागमय आणि सेवामय बनवण्यासाठी जाणीवपूर्वक करावयाचा प्रयत्न जणू त्या क्षणाची वाट पाहत होता.''

व्यंकटेशच्या अंतर्मनात होत असलेली ही स्थित्यंतरे त्याच्या आयुष्याचा प्रवाह बदलून टाकण्याच्या दिशेने वाटचाल करीत होती. बाहेरच्या राजकीय जीवनात लहान मोठ्या घडामोडी घडत होत्या. लोकमान्यांच्या निधनानंतर महाराष्ट्रात गांधीजींचे नेतृत्व सर्वमान्य होऊ लागले होते. पूर्वी लढ्याचे हत्यार म्हणून अहिंसा, सत्याग्रह असे मार्ग कुठल्याच नेत्याने सांगितले नव्हते. गांधीजी प्रथमच या गोष्टी सांगत होते. हे ऐकून तरुण वर्ग वेगाने गांधीजींकडे आकर्षित होत होता. व्यंकटेशची स्थितीही यापेक्षा वेगळी नव्हती. एकदा गांधीजी सोलापूरमार्गे मुंबईस जाणार होते. त्यांच्या दर्शनासाठी प्रचंड जनसमुदाय रेल्वे स्टेशनवर लोटला होता. व्यंकटेशही गेला. प्रचंड गर्दीत कृशयष्टीचा व्यंकटेश रेटला जात होता. गाडी रेल्वे स्टेशनात आली. योगायोग असा की, व्यंकटेशच्या समोरच गांधीजींचा डबा थांबला. अत्यंत कृतार्थ भावनेने व्यंकटेशने गांधीजींच्या पायांना स्पर्श करून त्यांचे

दर्शन घेतले. गांधीजींनी व्यंकटेशचे खांदे धरून उठवले. हिंदीत म्हणाले, ''देशासाठी काहीतरी करा.'' हाच कृश शरीराचा व्यंकटेश पुढे हैदराबादच्या स्वातंत्र्य आंदोलनाचा नेता झाला.

गांधीजींच्या असहकाराच्या हाकेला प्रतिसाद म्हणून व्यंकटेशने सरकारी शाळा सोडली. टिळक राष्ट्रीय विद्यापीठातून मॅट्रिक उत्तीर्ण झाला.

मॅट्रिकच्या वर्षात राष्ट्रीय वृत्तीने व्यंकटेशच्या मनावर आणि बुद्धीवर पूर्णतया ताबा मिळवला होता. मॅट्रिकची परीक्षा दिल्यानंतर स्थानिक कॉंग्रेस नेत्यांच्या मार्गदर्शनानुसार सोलापूरजवळच्या खेड्यापाड्यांतून पदयात्रा काढून कॉंग्रेसचा संदेश जनसामान्यांपर्यंत पोहचवण्याचे काम व्यंकटेशने सुरू केले. परंतु पोलिसांच्या धमक्यांमुळे आणि नेत्यांच्या आदेशानुसार व्यंकटेशला ही पदयात्रा थांबवावी लागली. ही छोटीशी पदयात्रा व्यंकटेशचे राजकारणातले पहिले पाऊल होते!

मॅट्रिकनंतर पुढे काय हा प्रश्न व्यंकटेश समोर नव्हताच. पदयात्रेच्या काळात खेड्यांमधून भाषणे करताना आपल्या तुटपुंज्या वैचारिक शिदोरीची व्यंकटेशला प्रकर्षाने जाणीव झाली होती. भविष्यात राष्ट्रकार्य, समाजकार्य करावयाचे असेल तर विपुल ज्ञान मिळवले पाहिजे, भरपूर शिकले पाहिजे याचे भान व्यंकटेशला आले होते आणि शिक्षण घ्यायचे असेल तर आपल्या ठिकाणच्या राष्ट्रीय वृत्तींचे भरण-पोषण करण्याची क्षमता असलेल्या राष्ट्रीय शिक्षण संस्थेतूनच हेही निश्चित झाले होते.

खानदेशमधील अंमळनेर येथे काही राष्ट्रीय वृत्तीच्या नेत्यांनी स्थापन केलेल्या राष्ट्रीय महाविद्यालयात पुढील शिक्षण घेण्यासाठी जाण्याचे व्यंकटेशने निश्चित केले. अंगातला एकमेव जुना सदरा... खिशात चार-पाच आणे... मनात उत्कट राष्ट्रप्रेम इतक्या सामग्रीसह व्यंकटेश अंमळनेरला पोहचला.

१९२१ मध्ये व्यंकटेश अंमळनेरच्या राष्ट्रीय शिक्षण संस्थेत दाखल झाला. या महाविद्यालयाची स्थापनाच गांधीजींच्या चळवळीतून प्रभावित झालेल्या शिक्षकांनी केली होती. गांधीजींचे 'यंग इंडिया' मधील लेखन व्यंकटेशच्या वाचनात नियमितपणे येऊ लागले. स्वराज्याची साधना शस्त्रांच्या आधाराने करावयाची नसून आत्मबलाने, अहिंसेने, सत्यावरच्या श्रद्धेने केली पाहिजे हा संस्कार व्यंकटेशच्या मनावर झाला. यासाठी सत्याग्रह करू इच्छिणाऱ्या-स्वराज्याच्या चळवळीत सहभागी होऊ इच्छिणाऱ्या-व्यक्तीच्या आंतरिक मानसिक शुद्धतेला फार मोठे महत्त्व होते. ही शुद्धता प्राप्त करून घेण्यासाठी व्यंकटेशची अहोरात्र धडपड सुरू

झाली. स्वत:चे मानसिक अंतरंग तपासून ते अधिकाधिक शुद्ध कसे करता येईल याचे प्रयत्न व्यंकटेश करू लागला. उपवास, प्रार्थना, पापनिवेदन या साधनांच्या साह्याने आत्मशुद्धी मिळविण्याचे प्रयत्न सुरू केले. मन:शुद्धीचा मार्ग म्हणून त्याने दैनंदिनी लिहिण्यास प्रारंभ केला. ही दैनंदिनी व्यंकटेशचे प्राचार्य श्री गुणे यांच्या वाचनात आली. व्यंकटेशच्या दैनंदिनी लिहिण्यातील प्रामाणिकपणा आणि निरागसता पाहून व्यंकटेशच्या प्राचार्यांनी त्याला सांगितले, ''तू योग्य मार्गावर आहेस, प्रयत्न चालू ठेव.''

राष्ट्रीय महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून ज. ग. गुणे काम पाहत होते. नंतरच्या काळात ते लोणावळ्याच्या मुक्तिधामाचे स्वामी कुवलयानंद या नावाने प्रसिद्धीस आले.

गुण्यांचे व्यक्तिमत्व कुणावरही प्रभाव पडावा असेच होते. ते ब्रह्मचारी होते. महाविद्यालयाच्या परिसरातच ते एका झोपडीत राहत. अत्यंत धार्मिक, प्रेमळ, व्यासंगी असे गृहस्थ होते. प्राचार्य गुण्यांचा सहवासात व्यंकटेशच्या मनात सुप्तावस्थेत असलेली आध्यात्मिकता आकार घेऊ लागली. आपले अंत:करण अधिकाधिक शुद्ध आणि निर्मळ कसे होईल याचा व्यंकटेश अधिकच विचार करू लागला. त्या दिशेने पावले टाकू लागला.

व्यंकटेशने मानव्यशास्त्र विद्याशाखेत प्रवेश घेतला होता. इथेच त्याने वक्तृत्व आणि लेखनकलेचे कित्ते गिरविण्यास प्रारंभ केला. महाविद्यालयाच्या वादविवाद मंडळात त्याने नेपोलियनच्या चरित्रावर भाषण दिले. एका हस्तलिखिताचेही तो संपादन करीत असे. त्यात 'वेड्यांचे चिंतन' नावाने एक सदर तो लिहित असे. या सदरात मुख्यत्वे आत्मसंशोधनाने व्यक्ती अधिकाधिक शुद्ध कशी होऊ शकेल याबद्दलचे विवेचन असे.

दररोज पहाटे उठून व्यंकटेश गीतेच्या अध्यायाचे पठण करी. याचबरोबर कबीर, तुलसीदास यांची पदे गात असे. मोरोपंतांच्या केकावली म्हणत असे. सकाळी नऊनंतर महाविद्यालयाचे वर्ग सुरू होत असत. इतिहास, अर्थशास्त्र, राजनीतिशास्त्र हे विषय व्यंकटेशने पदवी परीक्षेसाठी निवडले होते.

व्यंकटेशची शैक्षणिक, आध्यात्मिक जडण-घडण होत होती त्या काळात १९२१ मध्ये असहकाराची चळवळ ऐन भरात आली होती. काळा कायदा म्हणून कुख्यात असलेल्या आणि इंग्रजांना दडपशाहीचे अधिकार देणाऱ्या रौलट ॲक्टला विरोध म्हणून भारतीय तरुणांनी सैन्यातून, सरकारी नोकऱ्यांतून, सरकारी शाळा-

महाविद्यालयांमधून बाहेर पडावे असे गांधीजी, नेहरू, वल्लभभाई पटेल इ. पन्नास नेत्यांनी पत्रक काढून भारतीय जनतेला आवाहन केले. या आंदोलनाचे तीव्र पडसाद गांधीजींच्या प्रेरणेने सुरू झालेल्या अंमळनेरच्या राष्ट्रीय विद्यालयात उमटणार हे उघडच होते. महाविद्यालयाच्या बहुसंख्य विद्यार्थ्यांनी असहकार आंदोलनात उडी घेण्याचे निश्चित केले. प्राचार्य गुणे तर काँग्रेसचे सक्रिय कार्यकर्तेच होते. काही शिक्षकही या आंदोलनात उतरण्याचा विचार करीत होते. शिक्षक व विद्यार्थी यांनी विचारविनिमयानंतर असे ठरवले की, एक वर्षभर महाविद्यालय बंद ठेवून प्रत्यक्ष चळवळीत भाग घ्यावा. या साऱ्यांचा परिणाम असा झाला की, या संस्थेवर सरकारी वक्रदृष्टी वळली. दरम्यान संस्थेच्या संचालक मंडळातील नेमस्त मंडळींना राष्ट्रीय शिक्षणाची ही फलनिष्पत्ती रुचली नाही. अशा परिस्थितीत राष्ट्रीय शिक्षणाचा प्रयोग बंद करण्याचा २७ मे १९२३ रोजी निर्णय झाला.

व्यंकटेशला महाराष्ट्र टिळक विद्यापीठाची वाङ्मय विशारद पदवी मिळविण्यासाठी अजून एक वर्ष शिकणे भाग होते. म्हणून व्यंकटेशने पुण्याच्या टिळक महाविद्यालयात प्रवेश घेतला. पुण्याचे टिळक महाविद्यालय अनेक बाबतीत निराळे होते. अंमळनेरच्या वास्तव्यात व्यंकटेशचा आध्यात्मिक आणि मानसिक घाट घडवला गेला. तर पुण्याच्या वास्तव्याने व्यंकटेशच्या जीवनाला बौद्धिकतेचे परिमाण प्राप्त करून दिले.

अंमळनेर आणि पुण्याच्या अभ्यासक्रमातही फरक होता. व्यंकटेशचे एकट्याचेच वर्ग घेण्याच्या दृष्टीने वेळापत्रक आखण्यात आले होते. न. चि. केळकर, वा. गो. आपटे, वा. कृ. भावे, दत्तोपंत आपटे, चित्रावशास्त्री असे एकाहून एक विद्वान शिक्षक व्यंकटेशला लाभले होते. तासांना वेळेचे बंधन नसे. वर्गात एकटाच विद्यार्थी असल्यामुळे व्यंकटेश मोकळेपणाने आपल्या शंकांचे निरसन करून घेऊ शकत असे. व्यंकटेशची बौद्धिक जडणघडण करणारा हा कालखंड होता. महाविद्यालयाचे समृद्ध ग्रंथालय व्यंकटेशला सदैव उपलब्ध होते. व्यंकटेश तासन् तास ग्रंथालयात वाचन करीत असे. वाचलेल्या ग्रंथांची टिपणे काढी. त्यावर चिंतन करी, एडमंड बर्क, जॉन स्टुअर्ट मिल, रुसो, हॉब्ज, लॉक अशा विचारवंतांचे विविध ज्ञानशाखांमधील ग्रंथ त्याच्या वाचनात आले. अभ्यासाव्यतिरिक्त आध्यात्मिक क्षेत्रातील महापुरुषांची जीवनचरित्रे आणि त्यांचे विचारधन हे व्यंकटेशच्या विशेष आवडीचे विषय होते. त्याने स्वामी विवेकानंदांचे चरित्र व भाषणाचे खंड मुळातून वाचून काढले. या भाषणांमधील देशहिताची

तळमळ व्यंकटेशच्या हृदयाला स्पर्शून गेली. पंजाब प्रांतातील गुजराणवाला जिल्ह्यातील एक संन्यासी स्वामी रामतीर्थ यांचे चरित्र व्यंकटेशच्या वाचनात आले. संन्यास म्हणजे निष्क्रिय जगणे नव्हे; तर नि:स्वार्थ वृत्तीने जगणे हा रामतीर्थांचा विचार व्यंकटेशला प्रभावित करून गेला. आत्मिक उत्कर्षासाठी उद्योग, त्याग, प्रेम, कर्तव्य, निर्भयता, स्वावलंबन आणि सदाचार ही रामतीर्थांनी सांगितलेली तत्त्वे व्यंकटेशला बालपणापासून वाटणाऱ्या संन्यस्त वृत्तीच्या आकर्षणाला निश्चित प्रयोजन आणि दिशा देणारी ठरली.

१९२५ मध्ये व्यंकटेशने 'वाङ्मय विशारद' ही पदवी मिळवली. आणि एम. ए. ला समकक्ष असणारी 'वाङ्मय पारंगत' पदवी मिळविण्यासाठी त्याने अभ्यासाला प्रारंभ केला. राजनीतिशास्त्र हा विषय एम. ए. साठी निवडला. या पदवीसाठी 'लोकशाहीचा विकास' या विषयावर प्रबंधिका लिहून त्याने वाङ्मय पारंगत ही पदवी प्राप्त केली.

पुण्याच्या वास्तव्यात व्यंकटेशच्या दृष्टीने दोन महत्त्वपूर्ण घटना घडल्या. गांधीजींच्या दोन वेळा भेटी होणे ही एक घटना आणि कामगार चळवळींचे जनक ना. म. जोशी यांचा सहाय्यक म्हणून काम करण्याची व्यंकटेशला लाभलेली संधी ही दुसरी महत्त्वपूर्ण घटना होय.

१९२४ मध्ये राजद्रोहाखाली येरवडा तुरुंगात तुरुंगवास भोगताना गांधीजींची प्रकृती बिघडली आणि त्यांना उपचारासाठी पुण्याच्या ससून रुग्णालयात दाखल करण्यात आले होते. त्यांच्यावर शस्त्रक्रिया करण्यात आली होती. त्यांची प्रकृती क्षीण झाली होती. त्यांच्या भेटीसाठी काँग्रेस अध्यक्ष मौलाना महंमदअली पुण्यात आले होते. त्यांचे विद्यार्थ्यांसमोर भाषण झाले. या सभेचा अध्यक्ष विद्यार्थी संघाचा अध्यक्ष या नात्याने व्यंकटेशच होता. या ओळखीमुळे मौलाना महंमद अलींसोबत गांधींना रुग्णालयात जाऊन भेटण्याची संधी व्यंकटेशला प्राप्त झाली. गांधींजी अशक्त झाले असले तरी आनंदी दिसत होते. गांधीजींचे हे दर्शन व्यंकटेशला अतीव कृतार्थता वाटायला लावणारे होते.

यानंतर ४ सप्टेंबर १९२४ रोजी गांधींजी टिळक विद्यापीठाच्या पदवीदान समारंभासाठी पुण्यात आले होते. त्यांच्या हस्ते विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या पुतळ्याचे अनावरण होणार होते. या सभेला व्यंकटेश स्वयंसेवक म्हणून व्यासपीठावरच होता. त्यामुळे त्याला गांधीजींचे भाषण जवळून ऐकण्याची संधी मिळाली. गांधीजी आपल्या भाषणात म्हणाले, ''महाराष्ट्राकडे त्याग आहे. या

त्यागाला श्रद्धेची जोड हवी.'' हे वाक्य व्यंकटेशला विचारप्रवृत्त करणारे होते. याच दरम्यान पुण्यात काहीजण गांधीजी आणि टिळक यांची तुलना करीत होते. हा धागा पकडून गांधीजी आपल्या भाषणात पुढे म्हणाले, ''लोकमान्य टिळक थोर व्यक्ती होती, मी एक नम्र पाईक आहे.'' गांधीजी व्यथित अंत:करणाने बोलत होते. त्यांच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहत होत्या. सारा श्रोतृसमाजही अश्रू ढाळत होता. व्यंकटेशच्या डोळ्यांतूनही अश्रू वाहत होते. अशा भावपूर्ण मन:स्थितीत व्यंकटेशने स्वत:शी पुन्हा एकदा निश्चय केला. ''मी पथभ्रष्ट होणार नाही. समर्पित असे जीवन जगेन!''

व्यंकटेशचे शिक्षण संपत आले होते. त्याच्या मनात पुढच्या कामाची दिशा ठरविण्याचे विचार घोळत होते. याच काळात भारतातील संघटित मजूर चळवळीचे जनक श्री. ना. म. जोशी यांनी सहाय्यकाची निवड करण्यासाठी वृत्तपत्रात जाहिरात देऊन 'भांडवल आणि श्रम' या विषयावर निबंध मागवले होते. या निबंधाच्या आधारे सहाय्यकाची निवड होणार होती. व्यंकटेशने पाठवलेला निबंध निवडला गेला. आणि १९२६ मध्ये मुंबईच्या टेक्स्टाईल लेबर युनियनचा शहर संघटक म्हणून व्यंकटेशची नियुक्ती झाली. जीवनाच्या अकल्पित वळणांना व्यंकटेश सामोरे जात होता. वेगवेगळे अनुभव गाठीशी बांधत होता. भोवतालचे जग डोळसपणे पाहत होता.

कामानिमित्त व्यंकटेशला कुर्ला, परळ, लालबाग परिसरात पसरलेल्या कामगार वस्तींमध्ये वारंवार जावे लागे. झोपडपट्ट्यांमधून अस्वच्छ परिसरात कसेबसे जीवन व्यतीत करणाऱ्या कामगारांचे, त्यांच्या मुलाबाळांचे जगणे पाहून व्यंकटेश व्यथित होई. गिरणी मालकांच्या दृष्टीतून कामगार म्हणजे विकत घेण्याची वस्तू आहे. या पलिकडे कामगारांना काही स्थान नाही हे पाहून व्यंकटेशला विषाद वाटे. ही परिस्थिती बदलली पाहिजे असेही वाटत असे. या निमित्ताने खेडगीकरांचा दलित, शोषित वर्गाशी जवळून संबंध येत होता. भांडवलदारांच्या शोषणाची विविध रूपे त्याच्या पाहण्यात येत होती.

ही कामे करीत असताना व्यंकटेश खेडगीकरांना ना. म. जोशी यांचे खाजगी सचिव म्हणूनही काम करावे लागे. जोशी केंद्रीय कायदेमंडळाचे सदस्य होते. १९२७ मध्ये जोशींनी खेडगीकरांना कामगार विधेयकासाठी आवश्यक ती माहिती गोळा करण्यासाठी आणि मजूर सभेच्या अधिवेशनाची तयारी करण्यासाठी दिल्लीस बोलावून घेतले. या काळात खेडगीकरांना विधिमंडळाचे कामकाज

जवळून पाहता यावे या हेतूने जोशींनी 'ज्ञानप्रकाश' या वृत्तपत्राचे प्रवेशपत्रही मिळवून दिले. त्यामुळे बातमीदाराच्या कक्षात बसून खेडगीकरांना मोतीलाल नेहरू, लाला लजपतराय, अशा थोर नेत्यांची भाषणे ऐकता आली. सांसदीय कार्यपद्धतीचे जवळून निरीक्षण करता आले. जणू खेडगीकरांना सांसदीय कार्यपद्धतीचे भविष्यासाठी प्रशिक्षणच मिळत होते. स्वत: खेडगीकरांनाही भविष्यात आपण या सभागृहात सदस्य म्हणून येऊ असे स्वप्नातही वाटले नसेल.

याच काळात खेडगीकरांवर मोठा आघात झाला. मोठ्या दुखण्याने त्यांना गाठले. या आजारातून कायमचे अपंगत्व त्यांच्या वाट्याला आले. दिल्लीत जानेवारी महिन्यात मोठा अवकाळी पाऊस झाला. त्यामुळे अचानकपणे हाडे गोठवणारी भीषण थंडी पडली. खेडगीकरांनी दिल्लीस जाताना पुरेसे कपडे सोबत नेले नव्हते. ही थंडी त्यांना बांधली. प्रारंभी चालताना त्रास होऊ लागला. पाठीच्या कण्यातील मज्जातंतूवर थंडीचा परिणाम झाला. खेडगीकर मुंबईस परतले. अर्धांगवायूने त्यांचा कमरेखालचा भाग लुळा पडला. मुंबईस डॉ. कॉन्ट्रक्टर, पुण्याला वैद्य पु. ग. नानल यांचे उपचार घेतले. पण गुण येईना. एके दिवशी तर त्यांची शुद्ध हरपली. खेडगीकरांना त्यांच्या मित्रांनी नगर येथे वैद्यपंचानन गुणे यांनी स्थापन केलेल्या आयुर्वेद महाविद्यालयाच्या रुग्णालयात हलवले. आठ महिन्यांच्या प्रदीर्घ उपचारानंतर खेडगीकरांच्या प्रकृतीत सुधारणा होऊ लागली. काठीच्या आधाराने हळूहळू चालता येऊ लागले.

पक्षाघाताचा आजार खेडगीकरांना अंतर्बाह्य हादरवून टाकणार होता. अवघे चोवीस वर्षांचे वय! समोर सारे आयुष्य पसरलेले. उर्वरित आयुष्य लुळ्यापांगळ्या अवस्थेत कंठण्याच्या कल्पनेने त्यांना मुळातून हादरवून टाकले. अशा मन:स्थितीतून त्यांच्या ठिकाणी जात्याच असलेल्या संन्यस्त आणि चिंतनशील वृत्तीने त्यांना बाहेर काढले. त्यांच्या मनावरचे नैराश्याचे मळभ हळूहळू दूर होऊ लागले. जगण्याबद्दलचा आत्मविश्वास निर्माण होऊ लागला. या मानसिक परिवर्तनाबद्दल त्यांनी आपल्या आठवणींमध्ये असे लिहिले की, ''शरीराने जरी मी पंगू झालो होतो तरी आत्माच अतिमोलाचा आहे हे मी जाणले होते. शारीरिक दृष्टीने माझी जितकी हानी झाली, त्या हानीच्या हजारपटीने आत्मिक दृष्टीने मला लाभ झाला. माझ्या आजारपणाच्या काळाची स्मृती जेव्हा मनाला स्पर्श करून जाते त्यावेळी माझ्यावर आजारपणाचा अनुग्रह करून मला प्रखर असे समर्पित जीवन जगण्याची संधी प्राप्त करून दिल्याबद्दल त्या जगनियंत्याला भक्तिपूर्ण

अंत:करणाने मी शतश:प्रमाण करतो.''

ना. म. जोशी यांची परवानगी घेऊन खेडगीकर हवाबदलासाठी सोलापूरला आले. खेडगीकरांनी कामगार चळवळीचे काम सोडू नये, सोलापूरला गिरणी कामगार शाखेचे काम करावे असे जोशी यांनी सुचवले. त्या प्रमाणे खेडगीकर सोलापूरात काम करू लागले. मोर्चे, जनसंपर्क, दगदग त्यांच्या प्रकृतीला झेपेनाशी झाली होती.

अशा वेळी एके दिवशी खेडगीकरांच्या खोलीचा पत्ता शोधत एक गृहस्थ बिऱ्हाडी आले. निजाम संस्थानच्या हद्दीत उस्मानाबाद जिल्ह्यातल्या हिप्परगा येथील राष्ट्रीय शाळेचे संचालक अनंतराव कुलकर्णी हेच ते गृहस्थ होते. त्यांनी हिप्परग्याच्या शाळेचे मुख्याध्यापकपद खेडगीकरांनी स्वीकारावे, अशी विनंती केली. स्वत: खेडगीकरांचे शिक्षण राष्ट्रीय शिक्षण संस्थांमधूनच झाले होते. त्यामुळे हिप्परग्याच्या राष्ट्रीय शिक्षणाच्या प्रयोगात त्यांना रस वाटणे स्वाभाविक होते. शिवाय कामगार क्षेत्रातील कामाची दगदगही प्रकृतीला झेपेनाशी झाली होती.

हिप्परग्याच्या शाळेची जबाबदारी स्वीकारण्याचे खेडगीकरांनी ठरविले.

१९२९ च्या जून महिन्यात खेडगीकर मुख्याध्यापक म्हणून हिप्परग्याच्या शाळेत रुजू झाले.

२२४ वर्षे जुलमी, धर्मांध राजसत्ता असणाऱ्या निजामी राजवटीची पाळेमुळे उपटून टाकण्यासाठी उग्र जनसंघर्ष उभारण्याची अपार ताकद सुप्तावस्थेत असणारा कृश, पंगू तरुण निजामी संस्थानात पोहचला होता.

काळाच्या पटलावर सोंगटे म्हणून नियतीने खेडगीकरांना निवडले होते.

भविष्याच्या इतिहासाची पहाट होऊ घातली होती.



# माळरानावरील फुलबाग

हैदराबाद संस्थानामध्ये निजामी राजवटीविरुद्ध लोकक्षोम उसळण्याची जी अनेक कारणे होती त्यापैकी निजाम सरकारचे शिक्षणविषयक धोरण हे एक महत्त्वपूर्ण कारण होते.

संस्थानात इयत्ता तिसरीपासूनच उर्दू माध्यमातून शिक्षण दिले जाई. खेड्यापाड्यांतून सरकारची मान्यता नसलेल्या गावठी शाळा होत्या. या शाळा बहुतेक एक शिक्षकी असत. या शाळांमधून मराठी भाषा, गणित असे एक दोन विषय शिकवले जात. या शाळांमधून खेड्यापाड्यांतील विद्यार्थ्यांची फार मोठ्या प्रमाणात शिक्षणाची गरज भागत असे. परंतु १९२६ मध्ये संस्थान सरकारने एक कायदा करून सरकारच्या परवानगीशिवाय खाजगी शाळा काढता येणार नाहीत, असे जाहीर केले. परिणामी खेड्यापाड्यांतून चालणाऱ्या गावठी शाळा बंद झाल्या. उर्दू माध्यमातील सरकारी शाळांमधून शिक्षण घेण्याशिवाय संस्थानातील विद्यार्थ्यांना पर्यायच उरला नाही. सरकारी शाळाही मोजक्या होत्या. त्या तालुक्याच्या व जिल्ह्याच्या ठिकाणीच होत्या. या शाळांमध्ये जाऊन शिक्षण घेणे सर्वच विद्यार्थ्यांना अनेक कारणांमुळे शक्य होत नसे. याचा परिणाम म्हणून संस्थानात शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचे प्रमाण अत्यल्प होते.

सरकारी शाळांमधून सक्तीचे उर्दू माध्यम आणि गावठी शाळांवरील बंदी याच्यामुळे मातृभाषेतून शिक्षण घेण्याची सोयच नाहीशी झाली. सरकारी शाळांमधून मातृभाषेला अत्यंत दुय्यम स्थान मिळावे अशा प्रकारे शिक्षणक्रमाची रचना केलेली असे. पाठ्यक्रमाची रचना धर्मांधतेला खतपाणी घालणारी अशीच असे. शाळेतील

वातावरणही विद्यार्थ्यांच्या मनांवर निजामी सत्तेची थोरवी बिंबवणारे आणि गुलामीची भावना मनात निर्माण करणारे होते. अगदी सकाळी शाळा सुरू होई त्या वेळेस 'ताबद खालीक आलम' ही निजामाची स्तुती करणारी प्रार्थना विद्यार्थ्यांना म्हणावी लागे. अशा प्रकारच्या शैक्षणिक वातावरणात विद्यार्थ्यांवर कसले संस्कार होणार?

अशा परिस्थितीतही सरकारी निर्बंधांना, अडथळ्यांना तोंड देत देत संस्थानात काही खाजगी शाळा निघाल्या. हैदराबादच्या विवेक वर्धिनी आणि गुलबर्ग्याच्या नूतन विद्यालयानंतर १९१६ मध्ये परभणी येथील नूतन विद्यालय आणि औरंगाबाद येथे सरस्वतीभुवन विद्यालय निघाले. १९१७ मध्ये औरंगाबादेतच शारदा मंदिर मुलींची शाळा निघाली. या शिक्षणसंस्थांना अर्थातच कुठल्याही स्वरूपाची सरकारी मदत नव्हती. शिक्षकांना नियमित वेतनाची हमी नव्हती. तरी राष्ट्रीय प्रेरणेने भारलेले अनेक तरुण या संस्थांमधून काम करू लागले. शाळेतील विद्यार्थ्यांवर देशभक्ती, स्वाभिमान, गुलामगिरीविरुद्ध चीड यांचे संस्कार करू लागले. अशाच प्रकारची राष्ट्रीय निवासी खाजगी शाळा १९२१ मध्ये उस्मानाबाद जिल्ह्यातील हिप्परगा येथे सुरू झाली.

या शाळेचे संस्थापक व्यंकटराव व अनंतराव कुलकर्णी हे होते. अनंतराव कुलकर्णी हे पुण्यात शिक्षण घेत होते. गांधीजींनी १९२० मध्ये सुरू केलेल्या असहकार चळवळीत त्यांनी शिक्षण सोडून दिले. लोकमान्य टिळकांच्या मृत्यूनंतर असहकार चळवळीचा भाग म्हणून देशभर राष्ट्रीय शाळा १९२१ मध्ये स्थापन झाल्या. त्यापैकीच हिप्परगा येथील राष्ट्रीय शाळा ही एक होती.

या शाळेचे वैशिष्ट्य असे की, ही निवासी शाळा होती. त्यामुळे या शाळेचे स्वरूप आश्रम शाळेसारखे होते. शाळेतील विद्यार्थी रात्रंदिवस शिक्षकांच्या नियंत्रणाखाली असत. त्यामुळे अभ्यासाव्यतिरिक्त स्वावलंबन श्रमप्रतिष्ठा यांचे शिक्षण विद्यार्थ्यांना देणे शिक्षकांना सहजसुलभ होत असे. शिक्षकही शाळेच्या आवारात बांधलेल्या झोपड्यांमधून राहत असत. या शाळेचे वातावरण एखाद्या गुरुकुलासारखे होते.

विद्यार्थ्यांना पहाटे साडेचार वाजता उठावे लागे. आपल्या अंथरुणाची वळकटी छताला बांधलेल्या शिड्यांवर ठेवावी लागे. पाच वाजता प्रार्थना व व्यायाम होई साडेसातच्या सुमारास अर्धी भाकरी, दूध, कारळ, जवसाची चटणी अशी न्याहरी मिळे. आठ ते साडेअकरा आणि दुपारी तीन ते साडेचार शाळा असे. त्यानंतर

क्रीडांगणावर खेळण्यासाठी जाणे अनिवार्य असे. सायंकाळी सात वाजता जेवण, नंतर सामुदायिक प्रार्थना होई. रात्री साडेनऊच्या सुमारास विद्यार्थी झोपत. सुट्टीच्या दिवशी विद्यार्थी शाळेच्या भिंती व जमीन शेणाने सारवीत. शिक्षकही त्यांना मदत करीत.

हिप्परग्याची शाळा म्हणजे राष्ट्रीय शिक्षण पद्धतीमधील एक नवा प्रयोग होता. परीक्षेच्या दृष्टीने अध्ययनाबरोबरच भावी जीवनात विद्यार्थ्यांनी स्वावलंबी व्हावे, नोकरीपेशाच्या मागे न लागता स्वत:चा स्वतंत्र व्यवसाय उभा करून स्वाभिमानाने जगावे या उद्देशाने काही छोटे छोटे अभ्यासक्रम सुरू केले गेले होते. सूत कातणे, विणकाम, बुक बायडिंग, शिवणकाम, शाळेच्या बागायतीमधून श्रम करून धान्य पिकवणे इ. गोष्टीचेही शिक्षण दिले जात असे.

शाळेच्या विद्यार्थ्यांमध्ये राष्ट्रीय वृत्ती निर्माण व्हावी, देशप्रेम जागृत व्हावे म्हणून जितके लक्ष पुरवले जाई, तितकेच लक्ष विद्यार्थ्यांच्या बलोपासनेकडे दिले जाई. दंडबैठका, सूर्यनमस्कार, पोहणे, मलखांब, लाठी काठी, तलवार, पट्टा, जंबिया, भालाफेक, लेझीम, कुस्ती इ. खेळ विद्यार्थ्यांना शिकवले जात.

शाळेचे छोटेसे वाचनालय होते. वाचनालयाची व्यवस्था पुढे प्रकाशक म्हणून नावारुपास आलेले रा. ज. देशमुख पाहत. वाचनालयात नवाकाळ, ज्ञानप्रकाश, निजाम विजय, चित्रमयजगत, शालापत्रक इ. मराठी मासिकांसोबतच मॉडर्न रिव्ह्यु, सारखी इंग्रजी नियतकालिके येत.

सर्व विद्यार्थी शिक्षक एकत्रच राहत, झोपत, जेवत, सारखीच कामे करीत. त्यामुळे विद्यार्थ्यांमधील जातीपाती, स्पृशास्पृश्यभेद, आर्थिक उच्चनीचता विसरायला लावून मुलांना संघभावना, भ्रातृभाव वृद्धिंगत करण्याचे कार्य या शाळेतून आपोआप घडत होते.

या शाळेला लाभलेला शिक्षकवर्गही त्यागी आणि ध्येयनिष्ठ असाच होता. अभ्यासू वृत्तीचे आणि विचारवंत शिक्षक के. के. देशपांडे, राष्ट्रीय विचारांचे पुण्याच्या टिळक महाराष्ट्र विद्यापीठात शिकलेले ग. धों. देशपांडे, पुढे पत्रकार म्हणून लौकिक मिळवणारे रॉयवादी ह. रा. महाजनी यांनी या शाळेत शिक्षक म्हणून काम केले. पुढील आयुष्यात खेडगीकरांसोबत खांद्याला खांदा लावून मुक्तिलढ्यात सहभागी होणारे राघवेंद्रराव दिवाण व बाबूराव कानडे हे दोघे खेडगीकर येण्यापूर्वीच हिप्परग्याच्या शाळेत शिक्षक म्हणून काम करीत होते. शाळेत संगीत विभाग होता. शास्त्रीय संगीताचे जाणकार असलेल्या निगडीकर

बुवांची कीर्तनेही हिप्परग्यात होत.

हिप्परग्याच्या शाळेत वेळोवेळी विविध उपक्रम हाती घेतले जात. दर महिन्याच्या शेवटच्या रविवारी काँग्रेसचा तिरंगा ध्वज फडकावून ध्वजवंदन होई. सामुदायिकपणे राष्ट्रभक्तिपर गीते म्हटली जात. शाळेतील पंधरा मिनिटांचा तास हा महत्त्वाचा उपक्रम होता. या तासात जोसेफ मॅझिनी, डी. व्हॅलेरा या सारख्या देशभक्तांची चरित्रे आणि शिवाजी, राणाप्रताप यांच्यासारख्या ऐतिहासिक महापुरुषाच्या कथा सांगितल्या जात. कधी ज्ञानेश्वरीतील एखादी ओवी, तुकारामाचा अभंग मुलांना समजावून सांगितला जाई. हा तास बहुधा अनंतराव कुलकर्णी घेत. प्रचंड पाठांतर, भावोत्कटता, प्रासादिक विवेचन शैली या अनंतरावांच्या गुणवैशिष्ट्यांमुळे मुले या तासात मंत्रमुग्ध होत.

संस्थानी सरकार मुळातच खाजगी शाळांबद्दल प्रतिकूल धोरण बाळगणारे होते. त्यातून हिप्परग्याच्या खाजगी शाळेत निजाम सरकारविरोधी कारवाया चालतात हे लक्षात आल्यावर शाळेतील हालचालींवर लक्ष ठेवण्यासाठी हिप्परग्यात एक कायमची पोलिस चौकी बसविण्यात आली. शाळेस भेट देणाऱ्या व्यक्तींवर भेटीपूर्वी पोलिसांना सूचना देण्याचे बंधन घालण्यात आले. शाळेला भेट देणाऱ्या व्यक्तींची पोलिस चौकीत नोंद केली जाई.

हिप्परग्याच्या शाळेत एक सेवक संघ होता. या संघाचे प्रमुख अनंतराव कुलकर्णी होते. अनंतरावांवर स्वामी रामतीर्थांच्या आध्यात्मिक विचारांचा प्रभाव होता. अनंतराव पद्मासन घालून बसत. समोर बसलेल्या पंधरा, वीस विद्यार्थ्यांसमोर आध्यात्मिक विवेचन करीत. अनंतरावांच्या बहुश्रुततेचा, प्रभावी वाणीचा उपस्थितांवर विलक्षण प्रभाव पडत असे. सेवक संघाच्या सदस्यांची उपासना, अध्यात्मसाधना सुरू असताना त्या झोपडीत इतरांना प्रवेश करण्यासाठी मज्जाव असे.

या सेवक संघामुळे हिप्परग्याच्या शाळेतील प्रखर राष्ट्रीय वातावरणाला उदात्त आध्यात्मिक वातावरणाची जोड लाभली होती. खेडगीकरांच्या अंत:करणातील राष्ट्रभक्ती आणि अध्यात्मनिष्ठ संन्यस्तवृत्तीला पोषक असेच वातावरण हिप्परग्याच्या शाळेत होते. त्यामुळे हिप्परग्याच्या शाळेशी खेडगीकर बघता बघता एकरूप झाले.

खेडगीकरांनी हिप्परग्यांच्या शाळेत उदरनिर्वाहाचे साधन म्हणून शिक्षकी पेशा पत्करलेला नव्हता, तर अत्यंत विचारपूर्वक, आपण अंगिकारलेल्या राष्ट्रसेवेच्या

व्रताचा भाग म्हणून या व्यवसायाची निवड केली होती. हिप्परग्याला रुजू होण्यापूर्वी त्यांनी स्वत:लाच विचारले की, आपण स्वत:वर जितके प्रेम करतो तितकेच प्रेम आपल्या विद्यार्थ्यांवर करू शकू काय? स्वत:च्या चुकांना आपण जशी क्षमा करतो तशाच दृष्टिकोनातून आपण विद्यार्थ्यांच्या चुकांना क्षमा करू शकू काय? या प्रश्नांची उत्तरे होकारार्थी मिळाल्यानंतरच खेडगीकरांनी हिप्परग्याच्या शाळेच्या मुख्याध्यापकपदाची जबाबदारी स्वीकारण्याचे निश्चित केले.

मुख्याध्यापकपदी रुजू होताना चालकांनी खेडगीकरांना वेतनाच्या अपेक्षेबाबत विचारणा केली. खेडगीकरांनी उत्तर दिले की, पगारी नोकर म्हणून काम करण्याची आपली वृत्ती नाही. सामान्य माणसाचे साधे जीवन जगण्यासाठी आवश्यक असतील तितके पैसे आपल्याला पुरेत. चालकांना या उत्तरामुळे अतीव समाधान वाटले. कारण खेडगीकरांच्या रूपाने त्यांच्या संस्थेच्या उद्दिष्टांना अनुरूप, त्यांच्या राष्ट्रीय वृत्तीच्या ध्येयांना प्रत्यक्षात साकार करण्याची क्षमता असलेला त्यागी, निस्पृह मुख्याध्यापक लाभला होता. चालकांनी असे ठरवले की, दरमहा पन्नास रु. खेडगीकरांच्या खात्यात जमा केले जावेत. खेडगीकरांनी आपल्या खात्यातून गरजेप्रमाणे पैसे काढावेत. खेडगीकरांची राहण्याची सोय शाळेच्या आवारातच बांधलेल्या झोपडीत होती. शाळेच्या भोजनगृहात भोजनाची सोय होती. इतर अवांतर खर्च मुळीच नव्हते. एका आजारी नातेवाईकाला भेटायला जाताना एकदा खेडगीकरांनी काही पैसे खात्यातून काढले. नंतर कधीच आपल्या पगारातून पैसे उचलले नाहीत. काही काळानंतर ही सर्व रक्कम त्यांनी संस्थेला देऊन टाकली.

खेडगीकर शाळेचे मुख्याध्यापक झाले तेव्हा शाळेत विज्ञान विषय शिकवायला शिक्षकच नव्हते. यासाठी खेडगीकरांनी पुण्याच्या फर्ग्युसन महाविद्यालयातून बी. एस्सी. झालेले आपल्या मित्राचे बंधू रामचंद्र परांजपे या तरुणाला शाळेत शिक्षक म्हणून बोलावून घेतले. उत्कट देशभक्ती, प्रभावी, ओजस्वी वक्तृत्व, स्वार्थाचा विचारही मनाला स्पर्शू न देण्याची वृत्ती या गुणांमुळे हा भावनाप्रधान शिक्षक विद्यार्थ्यांमध्ये लवकरच लोकप्रिय झाला. पुढे हैदराबाद मुक्तिसंग्रामामध्ये खेडगीकरांसोबत सहभागी होऊन मौलिक कामगिरीही रामचंद्र परांजपे यांनी बजावली. हेच परांजपे पुढे मुक्तिसंग्रामात बाबासाहेब परांजपे या नावाने प्रसिद्ध झाले.

खेडगीकर वरच्या वर्गांना इंग्रजी शिकवत. मॅट्रिकच्या वर्गात चारच मुले होती.

सर्वांचाच इंग्रजी विषय कच्चा असल्याचे खेडगीकरांच्या लक्षात आले. आठवी, नववी वर्गांच्या विद्यार्थ्यांचीही स्थिती यापेक्षा फारशी निराळी नव्हती. खेडगीकरांनी या विद्यार्थ्यांकडे विशेष लक्ष देण्यास सुरुवात केली. इंग्रजी विषय कच्चा असणाऱ्या विद्यार्थ्यांचे जादा वर्ग घेण्यास प्रारंभ केला. नियमितपणे विद्यार्थ्यांचे गृहपाठ ते करवून घेत. हळूहळू विद्यार्थ्यांना त्यांचे शिकवणे आवडू लागले.

मुख्याध्यापक म्हणून काम करताना कधीकधी खोडकर विद्यार्थ्यांना शिक्षा करण्याचा प्रसंग खेडगीकरांवर येत असे. विद्यार्थ्यांना शिक्षा देण्यासाठी ते मनोमन नाखूष असत. पण शिस्त लावण्याच्या दृष्टीने ते आवश्यकही वाटत असे. एखाद्या विद्यार्थ्याकडून गुन्हा घडला आहे आणि त्याला शिक्षा देणे आवश्यक आहे याची खात्री पटल्यावर आधी ते आपल्या हातावर छड्या मारून घेत. नंतर विद्यार्थ्यांना छड्या मारत. आपल्या गुन्ह्यांमुळे गुरुजी स्वतःला शिक्षा करीत आहेत. या लोक-विलक्षण प्रकाराने विद्यार्थी मनोमन खजील तर होतच, पण अंतर्यामी दुःखी होत. गुरुजी आणि शिष्य दोघांच्याही डोळ्यांतून घळाघळा अश्रू वाहत. विद्यार्थ्यांचे पश्चातापाने पोळलेले अश्रू खेडगीकरांच्या वस्त्रांना चिंब करून टाकत. शिक्षा झालेला विद्यार्थी आणि शिक्षा देणारे गुरुजी दोघांच्याही डोळ्यांतून अश्रू वाहत आहेत असा गुरुशिष्य नात्याचा दिव्य आदर्श हिप्परग्याच्या परिसरात आकाराला येत होता.

हिप्परग्याच्या वास्तव्यात खेडगीकर विद्यार्थीजगत, शाळेचे दैनंदिन कामकाज यात पुरते बुडून चालले होते. त्याचबरोबर ऐहिक जीवनाबद्दल अनासक्तही होत चालले होते. त्यांच्याजवळ एक लहान वळकटी आणि खादीचे दोन जाड पोषाख होते. खेडगीकरांनी हळूहळू आपल्या गरजा कमी करण्यास प्रारंभ केला. अंथरायला एक आणि पांघरायला एक अशा घोंगड्या वापरण्यास प्रारंभ केला. खादीच्या पोषाखांमध्ये विजारी होत्या. त्या वापरण्याचे खेडगीकरांनी सोडून दिले. त्या ऐवजी लुंगी वापरण्यास सुरुवात केली. चहा कॉफीसारखी पेये वर्ज्य केली. खेडगीकरांच्या मनाची वाटचाल ज्या संन्यस्त वृत्तीच्या दिशेने होत होती तिचा जणू हा बाह्य स्तरावरील प्राथमिक आविष्कार होता.

दिवसभराच्या दगदगीतून मोकळे झाल्यावर खेडगीकर सायंकाळी गावाबाहेरच्या ओढ्याकाठी जाऊन बसत. सभोवताली हिरवी गर्द आमराई. सूर्य मावळतीकडे चाललेला. मावळतीच्या सूर्याची किरणे झाडांवर पसरत चाललेली... सर्वत्र नीरव शांतता. घरट्याकडे परतणाऱ्या पक्ष्यांचा चिवचिवाट आणि पंखांची

फडफड यांच्यामुळेच जो काय होईल तो शांत वातावरणाचा भंग. अशा वातावरणात आत्मतत्त्वाचा शोध घेण्यात खेडगीकर हरवून जात. विद्यार्थिदशेत म्हणत असलेली पदे ते गुणगुणत. डोळ्यांमधून अश्रूनीर वाहत असत. ते एका वेगळ्याच श्रेष्ठ आध्यात्मिक विश्वात काही काळ हरवून जात.

हिप्परग्याच्या शाळेतील विश्वात सेवक संघाच्या कार्यक्रमांनी, भजन प्रवचनांनी भारावून टाकणारे वातावरण निर्माण केले होते. या संघात सर्वांना मुक्त प्रवेश नसे. सेवकसंघाच्या सदस्यांची संख्या साधारणपणे चाळीसपेक्षा जास्त होऊ द्यायची नाही यावर अनंतराव काकांचा कटाक्ष होता. रामतीर्थांनी देशकार्यासाठी चाळीस जणांच्या 'चहल दरवेश' ची कल्पना मांडली होती. त्याचे हे अनुकरण होते.

दररोज एका झोपडीत सेवक संघाचे भजन प्रवचनादी कार्यक्रम होत. अनंतराव काका स्वतःच्या अमोघ वक्तृत्वाने श्रोत्यांना मंत्रमुग्ध करीत. अनेक वेळा समाधी लावत. त्यावेळेस त्यांच्या डोळ्यांतून अश्रू वाहत. सेवक संघातील सदस्यांचेही अश्रू आवरत नसत. भावोत्कट असे वातावरण निर्माण होई. संघातील सदस्यांना दैनंदिनी लिहावी लागे. आपल्या मनात आलेल्या बऱ्यावाईट विचारांची नोंद या दैनंदिनीत करावी लागे.

खेडगीकर हिप्परग्याला आल्यानंतर काही सेवकांच्या दैनंदिन्या त्यांच्या वाचनात आल्या होत्या. त्यामुळे सेवक संघाबद्दल एक प्रकारची उत्सुकता त्यांच्या मनात निर्माण झाली. या संघात आपल्याला प्रवेश मिळावा असे त्यांना मनोमन वाटू लागले. तशी इच्छा प्रगट करणारी एक चिठ्ठीही खेडगीकरांनी अनंतकाकांना पाठविली. आणि उत्तराची वाट पाहू लागले. उत्तराला विलंब होऊ लागला तसे ते कमालीचे अस्वस्थ होऊ लागले. सहा महिने झाले तरी उत्तर येईना. वेगवेगळ्या शंकाकुशंकांनी त्यांना घेरले. आपण सेवक संघात प्रवेश देण्याइतके शुद्ध आहोत असे अनंतरावांना वाटत नाही, या विचाराने त्यांना त्रस्त केले. या मंडळींना आपल्याबद्दल विश्वास वाटत नसेल तर हे गाव, ही शाळा सोडणे बरे असे खेडगीकरांना वाटू लागले. शेवटी एकदाचा त्यांना प्रवेश मिळाला. आपल्या अंतःकरणाच्या शुद्धतेच्या प्रयत्नांना सेवक संघातील साधना साह्यकारी ठरू शकेल असा विश्वास त्यांना वाटला.

खेडगीकरांना संघात प्रवेश देताना काकांनी एक प्रश्न विचारला हा प्रश्न खेडगीकरांच्या भावी जीवनक्रमाबद्दलच विचारणा करणारा होता, अनंतराव

काकांनी विचारले, परमेश्वरासाठी तू सर्वस्वाचा त्याग करायला तयार आहेस का? खेडगीकरांकडून होकारार्थी उत्तर मिळाल्यानंतर काकांनी पुढे विचारले, तू भिक्षा मागून उपजीविका करू शकशील काय? याही प्रश्नाचे उत्तर होकारार्थी होते.

ही घटना खेडगीकरांच्या संन्यासाश्रमाच्या प्रवेशाची नांदीच ठरली.

१४ जानेवारी १९३० या दिवसापासून त्यांनी भिक्षा मागायला सुरुवात केली. बहुतेक वेळा रंगनाथ सायगावकर हा विद्यार्थी सोबत असे. मिळालेली भिक्षा नृसिंह मंदिरात किंवा मारुती मंदिरात ते सेवन करीत असत.

एक उच्च विद्याविभूषित, शाळेच्या मुख्याध्यापकपदी असलेला गृहस्थ गावात दररोज घरोघरी भिक्षा मागतो ही गोष्ट गावकऱ्यांना अभूतपूर्व, आश्चर्यकारक वाटणे स्वाभाविक होते. इतकेच नव्हे, तर २२ जानेवारी १९३२ रोजी शाळेच्या दशवार्षिक समारंभात कार्यक्रमाचे अध्यक्ष आणि हैदराबादचे धनिक धनराज गिरजी यांनी पाच हजार जनसमुदायासमोर बोलताना खेडगीकर मुख्याध्यापकाचे काम निर्वेतन करून भिक्षा मागून आपला निर्वाह करतात असा निर्देश करून खेडगीकरांच्या त्यागी वृत्तीचा गौरवपूर्वक उल्लेख केला.

भिक्षावृत्तीचा स्वीकार केल्यानंतर खेडगीकरांच्या मानसिक प्रवृत्तीमध्ये वेगाने स्थित्यंतरे घडून येत होती. संन्यासाश्रमाबद्दल ते गंभीरपणे विचार करू लागले होते. विरक्त जीवनाबद्दल त्यांना बालपणापासूनच आकर्षण होते. पण निरुद्देश व आळशीपणात आयुष्य घालवणे त्यांना मान्य नव्हते. देशसेवेचे कार्य परिपूर्णतेने करण्यासाठी संन्यासाश्रम उपकारक ठरेल असे त्यांना वाटत होते. स्वामी विवेकानंद व स्वामी रामतीर्थ यांचा आदर्श समोर होता. स्वतःच्या स्वार्थासाठी जीवन व्यतीत करण्याऐवजी जो समाज, देश यांच्यासाठी झटतो व विकारमुक्त व अनासक्त राहतो तो खरा संन्याशी असे खेडगीकर मानत होते. वेदांताला निवृत्तीकडून प्रवृत्तीकडे वळवणारे रामतीर्थ खेडगीकरांना दीपस्तंभासारखे मार्गदर्शक वाटत होते. दिवसेंदिवस संन्यास घेण्याची इच्छा मनात प्रबळ होत होती. खेडगीकरांनी आपली ही इच्छा अनंतराव काकांच्या कानी घातली. अनंतरावांनी संमती दिली. रामतीर्थांचे पट्टशिष्य नारायणस्वामी यांच्या हातून संन्यास घ्यावा असे ठरले. आणि १९३१ च्या मे महिन्यात नारायणस्वामींची भेट घेण्यासाठी खेडगीकर लखनौला गेले. दोन दिवस नारायणस्वामींसोबत संन्यासाश्रमाबद्दल चर्चा केली. संन्यासधर्माची दीक्षा देण्यासाठी नारायण स्वामींनी हिप्परग्यास यावे, अशी विनंती

करून खेडगीकर हिप्परग्यास परतले.

१४ जानेवारी १९३२ रोजी मकर संक्रातीच्या मुहुर्तावर खेडगीकरांना संन्यासधर्माची दीक्षा देण्याचे ठरले. ठरल्याप्रमाणे नारायणस्वामी आठ दहा दिवस आधी हिप्परग्यास आले. मकरसंक्रातीच्या अगोदर एक दिवस दीक्षेची जागा निश्चित केली. ओढ्याकाठी औदुंबर वृक्षाखालची जागा निश्चित करण्यात आली होती.

मकरसंक्रातीचा दिवस उजाडला. खेडगीकरांचे सोलापूर, सिंदगी, जेवरगी, गाणगापूर येथील नातेवाईक, विद्यार्थी, शिक्षक, गावकरी ओढ्याकाठी मोठ्या संख्येने जमले. ओढ्याच्या पलिकडे जाऊन नारायणस्वामींनी स्वतःचे मुंडण करवून घेतले. नंतर खेडगीकरांचे मुंडण करविले. ओंकाराचा उच्चार करून त्यांनी खेडगीकरांच्या हाताला धरून ओढ्याच्या पात्रातील डोहात डुबकी मारली. नंतर पाण्यात उभे राहून खेडगीकरांना म्हणाले, ''आजपासून तू परमेश्वराचा झालास. आता सर्व विश्व तुझे कुटूंब आहे.'' पाण्याबाहेर आल्यावर नारायणस्वामींनी खेडगीकरांना भगवी वस्त्रे दिली.

ओढ्याच्या पलीकडच्या काठावर जमलेले खेडगीकरांचे नातेवाईक हुंदके दाबत होते. सर्व वातावरण गंभीर होते. इतकी गर्दी असूनही निःस्तब्ध शांतता होती.

भगवी वस्त्रे परिधान केलेल्या खेडगीकरांचे स्वामी रामानंद तीर्थ असे नामाभिधान नारायणस्वामींनी केले.

स्वामी रामानंद तीर्थ शाळेचे कामकाज पाहताना सभोवतालच्या सामाजिक परिस्थितीचे सूक्ष्म अवलोकन करीत होते. हैदराबाद संस्थानातील निरनिराळ्या भागांतून विद्यार्थी या संस्थेत शिक्षणासाठी आले होते. या विद्यार्थ्यांचे पालक शाळेत येत तेव्हा ते स्वामीजींना भेटत. कार्यकर्तेही स्वामीजींना भेटत. या लोकांशी बोलताना स्वामीजींना संस्थानातील परिस्थिती कळत होती. हे पालक सरकारी अधिकाऱ्यांकडून होत असलेल्या छळाच्या करूण कहाण्या सांगत. स्वतःचा धर्म, भाषा यांच्यावर सरकारने घातलेल्या निर्बंधाबद्दल असहाय्यपणे खेद प्रगट करीत. सर्वसामान्य माणसाच्या वाट्याला लाजिरवाणे जिणे आले होते. स्वामीजींनी आपल्या आठवणीमध्ये लिहिले आहे : ''जीवनाची सारी सूत्रे जातीय मुस्लिम धर्ममंडळाच्या हाती होती. हिंदू संशयास्पदच समजला जाई. वरिष्ठ वर्गातील मुसलमानांना सर्व प्रकारच्या सवलती मिळत होत्या. आपला सहधर्मी सूत्रचालक

आहे व आपण राज्यकर्त्यांच्या जातीचे आहोत, या गोष्टीचा अज्ञ गरीब मुसलमानाला मोठा आनंद वाटत असे. स्वत: चिरगुट चिंध्या गुंडाळून राहात असला तरी आपल्या जातीचाच एक वर्ग ऐश्वर्यसंपन्न आहे, या गोष्टीविषयीच्या आसुरी सुखात तो मग्न होता. एखादे शेंबडे कारटेही हिंदूला वेडावून दाखवू शके व हिंदू स्त्रियांचा उपमर्द करू शकत असे. हे चित्र पाहून स्वामीजी अंतर्यामी दु:खी, अस्वस्थ होत होते. संस्थानातील लोकांचे कुंठित जीवन स्वामीजींची घालमेल वाढवत होते.

दरम्यान हिप्परग्याच्या वातावरणात अध्यात्मप्रवणतेचा अतिरेक होत होता. सेवकसंघातील सदस्यांच्या भक्तिभावाचे रूपांतर व्यक्तिपूजेत होत होते. अनेक शिक्षकांना, संघातील सदस्यांनाही हे पचवणे अवघड जात होते. बाबासाहेब परांजपेसारख्या प्रखर बुद्धिवाद्यांना हा बदल रुचणे शक्यच नव्हते. काही जण अध्यात्मप्रवण असले तरी कर्मकांडाचा अतिरेक कसा घातक असू शकतो याची त्यांना पुरेपूर जाणीव होती.

अशा परिस्थितीत १९३४ च्या जानेवारी महिन्यात हिप्परग्यात प्लेगची साथ आली. मॅट्रिकचे विद्यार्थी वगळून इतर विद्यार्थ्यांची परीक्षा न घेताच त्यांना सोडून देण्यात आले. मॅट्रिकच्या मुलांना सोलापूरला नेऊन तेथे अभ्यासक्रम पूर्ण करण्याचे ठरविण्यात आले. त्याप्रमाणे काही शिक्षक, विद्यार्थी सोलापूरला गेले. सोबत वसतिगृहाची व्यवस्था पाहणारे कर्मचारी, शिक्षकांच्या कुटुंबातील महिला, संचालकांपैकी अनंतराव देशमुख सोलापूरला गेले. एका वाड्यात सर्वजण एकत्रच राहू लागले.

याच वास्तव्यात अशा काही विपरीत गोष्टी घडल्या की, परस्परांवरचा विश्वास संपुष्टात आला. शिक्षकांच्या मनात संस्थाचालकांबद्दल असणाऱ्या प्रेमाचा लोप झाला. काही शिक्षक शाळा सोडून जाण्याचा विचार करू लागले. पण स्वामीजींनी प्रयत्नपूर्वक अशा शिक्षकांना थोपवले. महिनाभर थांबून मॅट्रिकचा अभ्यासक्रम पूर्ण करावा असे स्वामीजींनी शिक्षकांना सुचवले. त्याप्रमाणे अभ्यासक्रमाची जबाबदारी पार पाडल्यानंतर बाबासाहेब परांजपे, बाबूराव कानडे, राघवेन्द्रराव दिवाण, श्री. रं. देशपांडे, गं. धो. देशपांडे असे बहुतेक महत्त्वाचे सहकारी सोलापूरहून हिप्परगा शाळेचा निरोप घेऊन गेले. खरे तर स्वामीजींचेही मन हिप्परग्यातून उठले होते. संस्था सोडण्याचे विचार त्यांच्याही मनात घोळत होते. परंतु स्वामीजींवर मुख्याध्यापकपदाची जबाबदारी होती. त्यांनी तडकाफडकी शाळा सोडली असती

तर शाळाच बंद पडण्याचा संभव होता. व्यंकटराव देशमुखांनी निदान वर्षभर तरी स्वामीजींनी संस्थेत राहावे, अशी गळ घातली. स्वामीजींनी काही महिने राहण्याचा निर्णय घेतला.

शाळेचे चैतन्यच लोपले होते. शिक्षकांमध्ये मरगळ आली होती. शाळा कशीबशी चालली होती. शाळेच्या परिसरातले भजन प्रवचनाचे ध्वनी विरून गेले होते.

स्वामीजी प्रत्येक क्षण जणू जड हाताने लोटत होते. कर्तव्य म्हणून ते शाळेत शिकवत होते. पण त्यात पूर्वीचा जोम नव्हता. स्वामीजींचे सारे लक्ष आता पुढे कुठले काम हाती घ्यावे, कुठल्या गावी जाऊन काम करावे याकडे लागले होते.

संस्थानात स्वामीजी गावोगावी निधीवसुलीसाठी जात. कार्यकर्तेही वेगवेगळ्या निमित्ताने हिप्परग्याला येत आणि स्वामीजींना भेटत. बोलत. चर्चा करीत. या चर्चेतून संस्थानातील दमनयंत्रणेची स्वामीजींना प्रकर्षाने जाणीव होत होती. नागरिक स्वातंत्र्याच्या गळचेपीमुळे सर्वसामान्यांची होणारी घुसमट दरक्षणी जाणवत होती. ही कोंडी फोडण्याचा मार्ग सापडत नव्हता. स्वामीजींना भेटणारे अनेक लोक स्वामीजींना सुचवत होते की, त्यांनी संस्थानातील लोकांमध्ये फिरून लोकजागृती करावी आणि मुक्तिसंग्रामासाठी लोकांना संघटित करावे. या सूचनांचा स्वामीजी गंभीरपणे विचार करीत होते. हे कार्य करायचे असेल तर पूर्वतयारीसाठी काही अवधी तर निश्चितपणे लागणार होता. तोपर्यंत एखाद्या शिक्षणसंस्थेचा आधार घेणे आवश्यक होते. त्या दृष्टीने स्वामीजींनी अंबाजोगाई येथील योगेश्वरी शाळेत जाण्याचे ठरविले. या कामी तिथल्या काही मित्रांचे सहकार्य लाभेल अशी स्वामीजींना खात्री होती.

हिप्परग्याची शाळा सोडणे स्वामीजींच्या दृष्टीने सोपी गोष्ट नव्हती. आयुष्यातील सात वर्षे हिप्परग्यात व्यतीत केली होती. शाळेतील मुले, गावकरी यांच्याशी ऋणानुबंध निर्माण झाले होते. ते सहजासहजी तुटणे कठीण होते... गावाबाहेरच्या ओढ्यातील पाण्याचा खळखळाट... गर्द आमराई या साऱ्यांशी भावबंध जुळले होते. नदी काठच्या औदुंबराने स्वामीजींचा जीवनप्रवाह बदलला होता. हे सारे मागे ठेवून निघणे कष्टप्रद होते.

-स्वामीजींचा हिप्परगा सोडण्याचा दिवस निश्चित झाला. लोक हिप्परगा सोडू नये म्हणून गळ घालण्याची शक्यता होती. हे सारे टाळणे आवश्यक होते.

भल्या पहाटे स्वामीजी उठले. सोबत घेण्याजोगे काही नव्हतेच. त्यांनी आपले कमंडलू आणि भिक्षापात्र उचलले. आणि अंबाजोगाईची वाट धरली.

✿

# छोटा, पण प्रेरक विजय!

पूर्वापार काळापासून अंबाजोगाई शहराला मराठवाड्याचे पुणे म्हणून संबोधले जाते. मध्यमवर्गीय संस्कृतीचा ठसा असलेले शांत असे बीड जिल्ह्यातील गाव. रसिक, शिक्षणप्रेमी, नव्या सामाजिक, राजकीय विचारप्रणालींचे स्वागत करणारे गावकरी असे या गावाचे स्वरूप होते. विवेकसिंधुकर्ते मुकुंदराज, विपुल काव्यरचनेने सर्वज्ञात असलेले दासोपंत येथेच होऊन गेले. या गावाचे मूळ नाव गावातील योगेश्वरी देवीवरून जोगाईचे अंबे किंवा अंबेजोगाई असे रूढ होते. मुस्लिम राजवटीत हे नाव बदलून मोमीनाबाद असे करण्यात आले. स्वातंत्र्योत्तर काळात त्या गावाचे नाव पूर्ववत अंबाजोगाई करण्यात आले.

१९१८ मध्ये अंबाजोगाईत योगेश्वरी नूतन विद्यालय नावाची प्राथमिक शाळा स्थापन करण्यात आली होती. ही शाळा नारायणराव जोशी, केशवराव कुर्डूकर, कृष्णराव चौसाळकर यांच्या अथक परिश्रमांमधून उभी राहिली. जोशी आणि कुर्डूकर शाळेत अध्यापनाचे काम करीत. खाजगी शिक्षणसंस्थांवर निर्बंध घालण्याच्या दृष्टीने निजाम सरकारने १५ खुर्दाद १३३५ फसली (इ.स.१९२६) मध्ये नवा आदेश जारी केला. या आदेशाचा फटका योगेश्वरी शिक्षण संस्थेलाही बसला. आर्थिक अडचणींना तोंड देत देत कशाबशा चालणाऱ्या शाळेत पटावरील विद्यार्थीसंख्या जेमतेम पंचवीस होती. काही वर्ग बंद पडले होते.

मार्च १९३५ मध्ये स्वामीजी अंबाजोगाईस आले. योगेश्वरी देवळाच्या आवारात त्यांनी मुक्काम ठेवला. नवी शाळा सुरू करण्याच्या दृष्टीने स्वामीजी प्रयत्नांना लागले. प्रमुख नागरिकांच्या, पालकांच्या भेटी घेऊन विचारविनिमयाला प्रारंभ

केला. परंतु नवी खाजगी शाळा काढण्यासाठी सरकार परवानगी देईल अशी शक्यता नव्हती. विनापरवानगी शाळा सुरू करणे कायदाभंग ठरणार होता. या परिस्थितीतून मार्ग काढण्यासाठी स्वामीजी हैदराबादेस गेले. तेथे अनेक पुढाऱ्यांच्या भेटी घेतल्या. परंतु त्यातून काहीच निष्पन्न झाले नाही. ते वामनराव नाईक यांना भेटले. वामनराव नाईक हे हैदराबाद संस्थानातील सर्व सार्वजनिक व सामाजिक चळवळींमध्ये अग्रेसर असणारे कार्यकर्ते होते. त्यांनी स्वामीजींशी चर्चा करून योगेश्वरी नूतन विद्यालयाचे पुनरुज्जीवन करावे आणि तिचे हायस्कूलमध्ये रूपांतर करावे अशी सूचना केली. सरकारी आदेशानुसार नवी शाळा काढण्याला परवानगी नव्हती. आधीच सुरू असलेल्या शाळेच्या वर्गांचा विस्तार करणे कायदेभंगात मोडणारे नव्हते. जर सरकारने या कृतीला कायदेभंग मानून स्वामीजींवर काही कारवाई केलीच; तर आपण स्वामीजींच्या बाजूने लढू असे अश्वासन नाईकांनी स्वामीजींना दिले.

स्वामीजी हैदराबादहून अंबाजोगाईस परतले. स्वामीजी, अंबाजोगाईच्या योगेश्वरी संस्थेचे नारायणराव जोशी, बाबासाहेब परांजपे इ. कार्यकर्ते घरोघर फिरून पालकांना भेटू लागले. आपल्या मुलांना योगेश्वरी शिक्षण संस्थेत प्रवेश द्यावा अशी विनंती हे सर्व कार्यकर्ते पालकांना करीत. पालकांनी मुले आमच्या स्वाधीन करावीत. आम्ही मुलांना उज्ज्वल भवितव्याची हमी देतो, असे पालकांना आश्वासन देत. रामायणाच्या काळात वसिष्ठांनी असुराच्या निर्दालनासाठी आणि आश्रमाच्या रक्षणासाठी अयोध्यापती दशरथाकडे सैन्य, धनसंपत्ती यांची मागणी न करता दूरदर्शीपणाने त्याची मुले मागितली होती. त्यानंतर कितीतरी काळ लोटल्यावर देशातील युवाशक्ती जागृत झाली तर असत्याचे पारिपत्य होईल व सत्याचे रक्षण होईल याच दूरदर्शी विश्वासाने स्वामीजी आणि त्यांचे सहकारी अंबाजोगाईला घरोघरी जाऊन पालकांना त्यांची मुले मागत होते. वातावरणात भीती होती. निजामी सरकारची दडपणे येण्याचे भय होते. पण त्यावर मात करण्याचे धैर्यही जनतेत निर्माण होत होते. हळूहळू विद्यार्थी शाळेत प्रवेश घेत होते. पाहता पाहता विद्यार्थिसंख्या शंभरापर्यंत गेली.

त्या वेळच्या परिस्थितीमध्ये मुलांना खाजगी शाळेत प्रवेश देणे ही साधीसुधी बाब नव्हती. जे पालक सरकारी नोकऱ्यांमध्ये असत त्यांच्यावर संस्थानाच्या सरकारचा रोष होण्याची भीती होतीच. सरकारी नोकऱ्यांमधील नागरिकांनी आपल्या मुलांना खाजगी शाळांमधून प्रवेश देऊच नये, जर प्रवेश दिलाच असेल

तर अशा मुलांचे दाखले काढून पुन्हा सरकारी शाळांमधून प्रवेश घ्यावा असे दडपण अप्रत्यक्षपणे सरकारकडून नागरिकांवर आणले जाई.

गावातच सातव्या इयत्तेपर्यंत सरकारी शाळा होती. नागरिकांनी वारंवार विनंती करूनही सरकार आठवीचा वर्ग सुरू करीत नव्हते. योगेश्वरी विद्यालयात वर्गांचा विस्तार होऊ लागला तेव्हा त्याला शह देण्यासाठी सरकारी शाळेत आठवा वर्ग सुरू करण्यात आला. आणि पालकांवर त्यांनी आपली मुले सरकारी शाळेत दाखल करावीत यासाठी दडपणे आणण्यात येऊ लागली.

५ मे १९३५ रोजी अक्षय्यतृतीयेच्या दिवशी शाळेच्या पुरुज्जीवनाचा आणि आठव्या वर्गाचा शुभारंभ करण्यात आला. पहिल्या दिवशी ८६ विद्यार्थ्यांनी प्रवेश घेतला. वर्षाखेरीस ही संख्या २७५ वर गेली. १९३६ च्या जुलै महिन्यात नववीचा वर्ग उघडण्यात आला. विद्यार्थिसंख्या पाचशेवर गेली. बाबूराव कानडे, श्री. रं. देशपांडे, अ. भा. भोसले आदी शिक्षक स्वामीजींसोबत अध्यापनाचे काम करू लागले. नंतर स्वामीजींचे हिप्परगा शाळेतील विद्यार्थी रंगनाथ सायगावकर, स्वामीजींचे बंधू भीमराव ऊर्फ बेथुजी गुरुजी शिक्षक म्हणून रुजू झाले.

शाळेत अध्यापन करणाऱ्या शिक्षकांच्या उदरनिर्वाहासाठी अंबाजोगाईच्या गावकऱ्यांनी दरमहा शंभर रू. जमा करून देण्याचे कबूल केले होते. या रकमेत सर्व शिक्षकांचा चरितार्थ भागवावयाचा होता. पहिले काही दिवस स्वामीजींनी संन्यासधर्मानुसार भिक्षा मागितली. पण वेळेचा होणारा अपव्यय लक्षात घेऊन भिक्षा मागणे थांबवले. पुढे विद्यार्थ्यांसाठी चालविल्या जाणाऱ्या भोजनगृहातून नाटेकर स्वामीजींना डबा पाठवत. बरेच शिक्षक याच भोजनगृहात जेवत असत. बाबासाहेब परांजपे काही दिवस डॉ. देशपांडे यांच्या घरी राहिले. नंतर बाहेरगावाहून शिक्षणासाठी आलेल्या विद्यार्थ्यांच्या खोलीत राहू लागले. कमीत कमी गरजा ठेवून शाळेसाठी परिश्रम करण्याची वृत्ती, निस्पृहता, कमालीचा स्वार्थत्याग, उत्कट राष्ट्रभक्ती अशा गुणवैशिष्ट्यांमुळे स्वामीजींसह शाळेतील शिक्षकवर्गाबद्दल नागरिकांच्या मनात आदराची भावना निर्माण झाली.

योगेश्वरी नूतन विद्यालय शिक्षणसंस्था चालवताना स्वामीजी, त्यांचे सहकारी, संचालक यांच्या सामोरचे उद्दिष्ट स्पष्ट होते. या उद्दिष्टाला अनुरूप असे वातावरण शाळेत निर्माण व्हावे याबद्दल सर्वजण दक्ष होते. शाळेत प्रथमदर्शनी 'तेन त्यक्ते न भुंजीथा;' हे संस्थेचे ब्रीदवाक्य ठळक अक्षरात लावलेले होते. बाजूलाच स्वातंत्र्यवीर सावरकर यांची 'धन्य होय ती वंशलता, निर्वंश जिचा राष्ट्राकरिता' ही

काव्यपंक्ती ठसठशीत अक्षरांमध्ये लावण्यात आली होती. शाळेत सकाळी प्रार्थनेत साने गुरूजींचे 'प्रिय भारत भू, सेवा सतत करून जाईन सुखाने मरून' हे गीत विद्यार्थी सामूहिकपणे म्हणत. सायंकाळी वसतिगृहात 'त्वा अमेरिका सुखविली स्वातंत्र्ये, आम्हालाच का पारतंत्र्य पंजिरी कोंडिले राम' हे रामाचा धावा करणारे पद म्हटले जाई. सर्व वातावरण राष्ट्रभक्तीने भारावलेले होते. विद्यार्थ्यांच्या कोवळ्या संस्कारक्षम मनांवर देशभक्तीचे संस्कार करणारे होते. शिक्षक-विद्यार्थी सारेच चैतन्याने रसरसून गेले होते.

शाळेत देशभक्तांच्या, महापुरुषांच्या जयंत्या-पुण्यतिथ्या यांचे कार्यक्रम आवर्जून घेतले जात. या कार्यक्रमांमध्ये स्वामीजी, बाबासाहेब यांची भाषणे तर नेहमीच होत. अधूनमधून बाहेरगावाहून एखादा पाहुणा आला तर त्याचेही व्याख्यान होई.

योगेश्वरी नूतन विद्यालयात सुरू असलेल्या सरकारविरोधी कारवाया संस्थानी सरकारच्या नजरेतून सुटणे शक्यच नव्हते. स्वामीजी आणि त्यांचे सहकारी यांच्या उपक्रमांचे स्वरूपही छपवाछपवी करणारे नव्हते. शाळेत एकदा प्रार्थनेनंतर बोलताना स्वामीजींनी असे उद्‌गार काढले की, ''चार माणसांची उपजीविका चालावी या सामान्य लोभाने मी संस्थासंचलन केलेले नाही. आत्मबलिदानात अनंत पुनीतता असते. म्हणून राष्ट्राच्या स्वातंत्र्य यज्ञात तरुणांनी समिधा व्हावे व आपला हविर्भाग अर्पण करावा. हे श्रेष्ठ कार्य करीत असताना संस्था जगली काय, मेली काय, माझी संस्था दिव्यमरण मरण्यासाठी जन्माला आली आहे.''

एका शिक्षणसंस्थेच्या प्रमुखाने आपल्या शिक्षण संस्थेचा जाहीरपणे मांडलेला हा जणू जाहीरनामा होता. हा जाहीरनामा सरंजामी वृत्तीच्या सरकारला सहन होणे कदापि शक्य नव्हते.

विद्यालयाच्या नव्या वर्गांना मान्यता देण्याचे अर्ज संस्थान सरकारकडे पडून होते. परवानगी देण्यासाठी सरकार टाळाटाळ करू लागले. मान्यतेअभावी ही शाळा बंद पडली तर सरकारला हवेच होते. पुनरुज्जीवनापूर्वी कार्यरत असलेल्या शाळेला फक्त प्राथमिक विभागासाठी मान्यता होती. मे १९३६ मध्ये सरकारने योगेश्वरी नूतन विद्यालयाला पत्राने कळविले की, आठव्या वर्गाच्या गुणपत्रिका शिक्षणाधिकाऱ्याकडे पाठवाव्यात आणि त्यांच्या अभिप्रायाप्रमाणेच मुलांना वरच्या वर्गात प्रवेश द्यावा. नंतर सरकारने शाळेला कळवले की, तुमच्या आठव्या वर्गाला सरकारची मान्यता नाही. त्यामुळे विद्यार्थ्यांच्या गुणपत्रिका पाठवण्याची गरज नाही.

सरकारने असाही आक्षेप घेतला की, तुमची प्राथमिक शाळा आहे. आणि प्राथमिक शाळेला आठवीचा वर्ग जोडण्याची मान्यता देता येणार नाही. सातवी पर्यंतच्या वर्गांना दुसरे शैक्षणिक वर्ष संपता संपता मान्यता देण्यात आली. तरीही आठव्या वर्गाला आणि नव्याने सुरू होणाऱ्या नववीच्या वर्गांना सरकारने मान्यता दिली नव्हती. मान्यतेअभावी आठवी, नववी वर्गातील मुलांचे भवितव्य धोक्यात येण्याची शक्यता होती. संस्थेचे चिटणीस नारायणराव जोशी वरचेवर सरकारी अधिकाऱ्यांना भेटत होते. स्वामीजी, नारायणराव हैदराबादच्या फेऱ्या करून मान्यता मिळवण्याचा प्रयत्न करीत होते. काशीनाथराव वैद्य वगैरेंच्या मदतीने अधिकाऱ्यांच्या भेटी घेत होते. अर्ज, विनंत्या सुरूच होत्या. शेवटी मुंबई भेटीवर आलेल्या हैदराबादचे पंतप्रधान अकबर हैदरींची भेट स्वामीजींनी घेतली. त्यानंतर मान्यतेचे प्रकरण मार्गी लागले. १९३७च्या नोव्हेंबर महिन्यात शिक्षण खात्याचे विशेष तपासणी अधिकारी सैय्यद अकबर अली अंबाजोगाईस आले. प्रत्येक विद्यार्थ्याची वर्गावर्गात जाऊन परीक्षा घेतली. आणि शेवटी १९३७च्या डिसेंबर महिन्यात सरकारने एक पत्र पाठवून हायस्कूल विभागाला मान्यता दिल्याचे कळवले. अनिश्चितता संपली. विद्यार्थ्यांचे संभवनीय नुकसान टळले.

शाळेच्या वर्गांना सरकारची परवानगी मिळवणे हा प्रश्न तितका मोठा नव्हता. पण जुलमी राजवटीचे दमनतंत्र विरूद्ध स्वातंत्र्याचे रणशिंग फुंकण्यासाठी तरूण देशभक्त घडवू पाहणारी राष्ट्रीय शिक्षणसंस्था असे या संघर्षाचे स्वरूप होते. संस्थानातील लोक या घटनेकडे उत्सुकतेने पहात होते. शाळेच्या वर्गांना मिळालेली परवानगी हा सार्वजनिक कार्याचा विजय होता. या घटनेचे दूरगामी परिणाम झाले. याबद्दल स्वामीजींनी आपल्या आठवणींमध्ये लिहिले आहे की, ''या लहानशा यशाने आपण प्रचलित सरकारशी टक्कर देऊन शकू व सरकारचे अन्यायी कायदे मोडू शकू असा विश्वास जनतेत निर्माण झाला. लोकांच्या अंत:करणात कायदेभंगाचा विचार खूप खोलवर जाऊन रुजला. मोमिनाबादची घटना म्हणजे नजीकच्या भविष्यकाळात होऊ घातलेल्या महान व ऐतिहासिक स्वातंत्र्य संग्रामाची नांदी होती.''

जनशक्ती संघटित करण्याच्या स्वामीजींच्या कार्याचा आरंभ झालेला होता!

✿

# महाराष्ट्र परिषद

हैदराबाद संस्थानातील सर्वांत मागासलेल्या बीड जिल्ह्यातील अंबाजोगाई या तालुक्याच्या गावी योगश्वरी नूतन विद्यालय या शाळेत राष्ट्रीय शिक्षणाचा प्रयोग अनंत अडचणींवर मात करून यशस्वीपणे राबवला जात होता. त्यामुळे संस्थानातील जनसामान्यांचे लक्ष या संस्थेकडे वेधले जाऊ लागले. हैदराबादेत सामाजिक, राजकीय चळवळी करणाऱ्या पुढाऱ्यांनाही स्वामी रामानंद तीर्थ यांच्या प्रयत्नांबद्दल, धडपडीबद्दल कुतूहल वाटू लागले. याच दरम्यान हैदराबाद येथे २० नोव्हेंबर १९३६ रोजी झालेल्या हैदराबाद प्रजा शिक्षण परिषदेच्या अधिवेशनाला स्वामीजींना काशीनाथराव वैद्यांनी निमंत्रित केले. या अधिवेशनात स्वामीजी शिक्षणविषयक धोरण ठरविण्यासाठी नेमलेल्या मॅकेंझी समितीच्या अहवालावर इंग्रजीत बोलले. या भाषणामुळे स्वामीजींचा एक शिक्षणतज्ज्ञ म्हणून तर परिचय झालाच; शिवाय त्यामुळे उपस्थित असलेले तरुण विद्यार्थी स्वामीजींच्या भाषणामुळे कमालीचे प्रभावित झाले. उस्मानिया विद्यापीठातील हिंदू विद्यार्थ्यांनी वसतिगृहात श्रीकृष्ण जयंती साजरी करण्याचे ठरविले. आणि त्यासाठी स्वामीजींना निमंत्रित केले. स्वामीजी या कार्यक्रमात 'भगवान श्रीकृष्णाचा संदेश' या विषयावर इंग्रजीत बोलले. या भाषणास विद्यार्थ्यांसह प्रकुलगुरू, प्राध्यापक, विद्यापीठाचा अधिकारीवर्ग मोठ्या संख्येने उपस्थित होता. व्याख्यानासाठी आलेल्या स्वामीजींच्या निवासाची सोय विद्यापीठाच्या अतिथीगृहात करण्यात आली होती. विद्यापीठातील हिंदू विद्यार्थ्यांनी स्वामीजींची भेट घेतली. हे विद्यार्थी रात्रभर स्वामीजींसमोर आपली दु:खे मांडत होते. संस्थानात मुस्लिमेतरांना मिळणाऱ्या

पक्षपाती वागणुकीची झळ या विद्यार्थ्यांना पदोपदी बसत होती. उच्च शिक्षण घेणाऱ्या या विद्यार्थ्यांच्या ठिकाणी प्राप्त परिस्थितींचे राजकीय विश्लेषण करण्याची थोडीफार क्षमता होती. या विद्यार्थ्यांच्या तोंडून लोकमनच प्रगट होत होते. स्वामीजींनी परिस्थितीची कोंडी फोडण्यासाठी शिक्षण क्षेत्रातून बाहेर पडावे, संस्थानात राजकीय चळवळ सुरू करावी, तिचे नेतृत्व करावे अशीही अपेक्षा काही विद्यार्थ्यांनी केली. स्वामीजी मनोमन गंभीर झाले. लोकांच्या आपल्याकडून काय अपेक्षा आहेत हे त्यांच्या ध्यानी आले होते. परंतु काही निर्णय घ्यावा अशी परिस्थिती अद्याप निर्माण झाली नव्हती.

...अशा मन:स्थितीमध्येच स्वामीजी अंबाजोगाईला परतले.

या दरम्यान भारतातील राजकीय परिस्थितीमध्ये वेगाने स्थित्यंतरे घडत होती. २ ऑगस्ट १९३५ रोजी नवा हिंदुस्थान सरकार कायदा ब्रिटिश सरकारने मंजूर केला. या कायद्यानुसार प्रांतांना मर्यादित प्रमाणात प्रांतिक स्वायत्तता लाभणार होती. तीन कोटी लोकांना मतदानाचा हक्क मिळणार होता. अनेक मर्यादा असलेली का होईना; पण लोकप्रतिनिधींच्या हाती सत्ता येण्याची लक्षणे दिसू लागली होती. संस्थानांना संघराज्यात सामील होण्याचे बंधन नव्हते, तर ते ऐच्छिक होते. हैदराबाद संस्थानालगतच्या मुंबई, मध्य प्रांत, मद्रास प्रांतामध्ये निवडणुकीच्या वातावरणाचे चैतन्य निर्माण झाले होते. हैदराबाद संस्थानात मात्र तसे काही घडत नव्हते. संस्थानातील जनतेच्या पदरी लढा दिल्याशिवाय काही पडणार नाही हे सत्य एव्हाना स्पष्ट झाले होते.

निजामाच्या राजवटीकडून लोकशाहीच्या आगमनाचे स्वागत केले जाईल हे संभवनीय नव्हतेच; उलट सरकार उलटया दिशेने पावले टाकत होते. लोकसंख्येत मुस्लिम अल्पसंख्य असल्याने निवडणुकीच्या मार्गाने मुस्लिम लोकप्रतिनिधी बहुमताने निवडून येणार नाहीत, परिणामी मुस्लिमांच्या हाती सत्ता राहणार नाही म्हणून संस्थानातील मुस्लिम लोक बहुमताच्या राज्यास विरोध करीत होते. तर दुसरीकडे धर्मांतराची चळवळ गतिमान करून संस्थानातील लोकसंख्येत मुस्लिमांचे प्रमाण वाढवण्याचे मुस्लिम नेते प्रयत्न करीत होते. आपले हे उद्योग संस्थानातील हिंदू जनता निमूटपणे सहन करणार नाही, या वर्गाकडून तीव्र प्रतिक्रिया व्यक्त होईल हे गृहीत धरून सरकार दडपशाहीला सज्ज झाले होते. या परिस्थितीविरुद्ध लोकजागृती करण्याची, लोकसंघटनाची, आणि चळवळ उभारण्याची गरज होती. हे काम हैदराबादेत मवाळ राजकारण

करणाऱ्या काशीनाथराव वैद्य, बी. रामकृष्णराव, रामाचारी इ. नेमस्त प्रस्थापित नेत्यांकडून होण्याचा संभव नव्हता. या वर्गाचे राजकारण सरकारला फारसे न दुखावता अर्ज, विनंत्या, चर्चा या मार्गांनी जाणारे होते. या मार्गाने प्रश्न सुटणार नाहीत, असे स्वामीजी आणि त्यांच्या सहकाऱ्यांना वाटत होते. हा प्रश्न सर्व प्रकारच्या त्यागाला सिद्ध असलेल्या कार्यकर्त्यांकडूनच सुटेल असे वाटत होते. या बाबतीत विचार विनिमय करण्यासाठी सोलापूरला एकनाथराव गोडबोले यांच्या घरी एक बैठक झाली. या बैठकीला स्वामीजींचे हिप्परगा आणि अंबाजोगाई शाळेतील सहकारी बाबासाहेब परांजपे, हिप्परगा शाळेचे संचालक व्यंकटराव, अनंतराव आणि अंबाजोगाईच्या शाळेचे चिटणीस नारायणराव जोशी उपस्थित होते. यांच्याशिवाय पुढे हैदराबाद मुक्तिसंग्रामात मोलाची कामगिरी बजावलेले दिगंबरराव बिंदू आणि आनंद कृष्ण वाघमारे हे स्वामीजींचे सहकारीही हजर होते. या बैठकीत ''मी हैदराबाद संस्थानच्या जनतेच्या विमोचनाचे कार्यास वाहून घेण्याची व त्यासाठी माझे सर्वस्व अर्पण करण्याची प्रतिज्ञा करतो.'' अशी शपथ सर्वांनी घेतली. आणि अशी शपथ घेऊन राष्ट्रकार्यासाठी कटिबद्ध होऊ शकणारे निष्ठावंत कार्यकर्ते मिळविण्याचे ठरविण्यात आले. या दृष्टीने प्रयत्न करण्यासाठी सर्व जण हैदराबाद येथे झालेल्या प्रजा शिक्षण परिषदेच्या अधिवेशनास उपस्थित राहिले.

परिषदेच्या निमित्ताने आलेल्या कन्नड व तेलगू भाषिक कार्यकर्त्यांशी स्वामीजी आणि त्यांचे सहकारी यांची प्राप्त राजकीय परिस्थितीबाबत चर्चा झाली. बहुमतावर अधारित लोकप्रतिनिधींच्या राजसत्तेला संस्थानी सरकारचा होत असलेला विरोध, संस्थानात बहुसंख्यांकावर सतत होणारे सांस्कृतिक आक्रमण या गोष्टींमुळे कन्नड, तेलगू भाषिक जनताही अस्वस्थ आहे आणि या परिस्थितीची कोंडी फोडण्यासाठी काही तरी करणे आवश्यक आहे याबद्दल सर्वांचे एकमत आहे ही बाब स्वामीजी आणि इतर कार्यकर्त्यांच्या लक्षात आली. परंतु संस्थानात राजकीय संघटना आणि राजकीय सभा यांच्यावर सरकारने बंदी घातली होती. इतकेच नव्हे; तर सरकारच्या धोरणामुळे भाषिक आणि वाङ्मयीन चळवळीही चालवणे अशक्यप्राय होऊन बसले होते. या परिस्थितीविरुद्ध आवाज उठविण्यासाठी आंध्र महासभा आणि कर्नाटक परिषद अशा दोन बिगर राजकीय संघटना स्थापन झाल्या होत्या. या संघटना राजकीय प्रश्नांना स्पर्शसुध्दा करीत नसत. मराठवाड्यातून आलेल्या कार्यकर्त्यांच्या मनात अशी एखादी मराठी भाषिकांची संघटना असली पाहिजे हा

विचार होताच; परंतु राजकीय स्वातंत्र्याशिवाय आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक विकास अशक्य आहे. हे स्वातंत्र्य नागरी स्वातंत्र्यासाठी लढा देऊनच मिळवता येईल असेही या कार्यकर्त्यांना वाटत होते. या मताचे प्रतिनिधित्व आ. कृ. वाघमारे व इतर कार्यकर्ते करीत होते.

मराठी भाषिकांची संघटना असावी या कल्पनेला आंध्र महासभेच्या पाचव्या अधिवेशनात मूर्त रूप आले. हे अधिवेशन १९३६ मध्ये झाले. या अधिवेशनासाठी हैदराबाद शहरातील मराठी कार्यकर्ते आले होते. महाराजा किशनप्रसाद यांचे कारभारी गुंडेराव मोतेमदही उपस्थित होते. या प्रसंगी मराठी भाषिकांची परिषद असावी अशी कल्पना चर्चेत आली. गुंडेरावांनी सहकार्य देण्याचे मान्य केले. आणि महाराष्ट्र परिषदेची कल्पना साकार झाली. विठ्ठल रंगराव देशपांडे, दिगंबरराव बिंदू, आ. कृ. वाघमारे यांच्या प्रयत्नांनी महाराजा किशनप्रसादांच्या जहागिरीतील मराठवाड्यातील परतूड या तालुक्याच्या गावी महाराष्ट्र परिषदेचे पहिले अधिवेशन १, २ व ३ जून १९३७ या कालावधीत संपन्न झाले.

हे अधिवेशन परतूडच्या 'डबलजीन' नावाने ओळखल्या जाणाऱ्या एका जिनिंग प्रेसिंग फॅक्टरीच्या जागेत भरले. परतूड हे तालुक्याचे लहान गाव असल्याने आयोजकांना अनेक अडचणींना तोंड द्यावे लागत होते. परंतु कार्यकर्त्यांच्या उदंड उत्साहामुळे अडचणीवर मात करता येत होती. अधिवेशनाच्या नियोजित तारखांच्या काही दिवस आधी स्वामीजी, बाबासाहेब, योगेश्वरी नूतन विद्यालयाच्या शिक्षक सहकाऱ्यांसह परतूडला पोहचले. आणि स्वतःकडे स्वयंसेवकाचे काम घेऊन भोजनव्यवस्थेची जबाबदारी स्वीकारली.

हे अधिवेशन प्रारंभापासूनच संस्थानातील जनतेच्या औत्सुक्याचा विषय बनले. या परिषदेच्या अध्यक्षपदी हैदराबादच्या एखाद्या प्रतिष्ठित पुढाऱ्याला नेमण्याऐवजी परभणीचे सचोटीचे सत्वशील वकील गोविंदराव नानल यांची निवड करण्यात आली होती.

या परिषदेत खुर्शीदजाही पायग्यातील येळवटचे पाटील शामराव येळवटकर यांचे प्रभावी भाषण झाले. त्यांनी संस्थानात सर्वात मागासलेल्या जहागिरी आणि पायगा या भागातील शेतकऱ्यांच्या शोषणाचे स्वरूप परिणामकारकपणे आपल्या भाषणातून मांडले. या भागातील शेतसारा खालसा जहागिरीपेक्षा कितीतरी पटीने अधिक असल्यामुळे सामान्य शेतकऱ्याची होणारी केविलवाणी अवस्था परिषदेला

जमलेल्या प्रतिनिधींना हेलावून गेली. आपल्या अध्यक्षीय भाषणात गोविंदराव नानलांनीही संस्थानातील शेतकऱ्यांच्या प्रश्नांचा उहापोह केला. याचा परिणाम म्हणून संस्थानातील खेड्यापाड्यांतील बहुजनसमाज मोठ्या संख्येने परिषदेच्या कार्यकर्त्यांच्या मागे उभा राहण्याची शक्यता निर्माण झाली.

या परिषदेचे दुसरे लक्षणीय वैशिष्ट्य असे की, संस्थानातून हद्दपार करण्यात आलेले वि. रं. तुळजापूरकर अचानकपणे परिषदेत आले. त्यांनी अधिवेशनाच्या मिरवणुकीत उघड भाग घेतला. सरकारी रोष टाळण्याच्या हेतूने कार्यकर्त्यांनी केलेल्या विनंतीवरून ते लगेच मनमाडकडे रेल्वेने परत गेले. परिषदेत होणारी भाषणे, ठराव यांच्यामुळे पहिल्या अधिवेशनापासूनच महाराष्ट्र परिषदेचे पुरोगामी स्वरूप आकाराला येऊ लागले. महाराष्ट्र परिषदेने भिन्न विचारांच्या लोकांना एकत्र येण्याची संधी उपलब्ध करून दिली.

या अधिवेशनाचे सर्वात मोठे आणि लक्षणीय वैशिष्ट्य असे की, ही परिषद म्हणजे जणू अघोषित असा राजकीय मेळावा होता. या अधिवेशनासाठी संस्थानातील सर्व प्रकारचे विचारांचे कार्यकर्ते हजर होते. मवाळ कार्यकर्तेही उपस्थित होते, तसेच जहाल विचार मनात बाळगणारे तरुणही उपस्थित होते. काँग्रेसच्या ध्येय धोरणांवर श्रद्धा असलेल्या कार्यकर्त्यांबरोबरच जहाल विचारांचे तसेच साम्यवादी विचारसरणीवर श्रद्धा असलेलेही तरुण कार्यकर्ते उपस्थित होते. उपस्थितांमध्ये औरंगाबादचे गोविंददास श्रॉफ, पुढे साम्यवादी म्हणून प्रसिद्धीस आलेले कॉ. व्ही. डी. देशपांडे, विनोबाजींचे अनुयायी अच्युतराव देशपांडे, स. कृ. वैशंपायन, डी. एल. पाठक, अण्णासाहेब वाळूजकर, दामोदरदास मुंदडा यांचा समावेश होता. या तरुणांनी आरंभापासून परिषदेला जनताभिमुख आणि संघर्षाभिमुख बनविण्याचे प्रयत्न केले. परतूडच्या या अधिवेशनापूर्वी नाशिकला काही तरुणांनी नवजीवन मंडळाची स्थापना केली होती. या मंडळामध्ये गोविंददास श्रॉफ, अच्युतराव देशपांडे, दत्तोपंत बीडकर, दामोदरदास मुंदडा ही मंडळी सहभागी झाली होती. दामोदरदास मुंदडा यांचा वर्धा येथील गांधी आश्रम आणि महात्माजी यांच्याबरोबर संबंध होता. नवजीवन मंडळात सहभागी होणारी ही तरुण मंडळी संस्थानाबाहेर होणाऱ्या असहकार आंदोलनात भाग घ्यावा व संस्थानात स्वातंत्र्यसंग्रमासाठी अनुकूल वातावरण तयार करावे या मताची होती. तीही मंडळी परतूड अधिवेशनासाठी उपस्थित राहिली होती.

संस्थानाच्या राजकारणाचा अनुभव असलेले पण विचारांनी मवाळ असलेले

हैदराबादचे काशीनाथराव वैद्य, लक्ष्मणराव फाटक, लक्ष्मणराव गानू, बॅ. रामचंद्र नाईक, विनायकराव कोरटकर इ. पुढारीही अधिवेशनाला हजर होते. या शिवाय मराठवाड्याच्या वेगवेगळ्या जिल्ह्यांमधून नागरिक स्वातंत्र्याच्या बंधनाविरुद्ध आवाज उठवणारे मुकुंदराव पेडगावकर, माणिकचंद पहाडे, श्रीनिवासराव बोरीकर, शामराव बोधनकर, नारायणराव जोशी, पुरुषोत्तमराव चपळगावकर इ. कार्यकर्ते अधिवेशनासाठी उपस्थित होते.

या अधिवेशनात स्वामीजींनी येणाऱ्या प्रतिनिधींची भोजनाची व्यवस्था पाहण्याची जबाबदारी स्वीकारली होती. स्वामीजी आंबाजोगाईहून अधिवेशनासाठी आलेल्या आपल्या शिक्षक सहकाऱ्यांसह भोजनव्यवस्था पहात होते. अधिवेशनासाठी आलेल्या वेगवेगळ्या विचारसरणीच्या कार्यकर्त्यांचा परिचय करून घेत होते. स्वामीजींनी या अधिवेशनाच्या कामकाजात प्रत्यक्षपणे सहभाग घेतला नाही, वा जाहीरपणे भाषणही केले नाही. ते अत्यंत बारकाईने परिस्थितीचे निरीक्षण करीत होते. अधिवेशनासाठी आलेल्या प्रतिनिधींमध्ये वेगवेगळ्या विचारप्रणाली असल्या तरी हैदराबाद संस्थानात नागरिक हक्कांची स्थापना व्हावी, धार्मिक आणि सांस्कृतिक जीवनावर लादण्यात आलेले अन्याय, जुलमी निर्बंध दूर व्हावेत, शेतकऱ्यांवर होत असलेल्या अन्यायांच्या निर्मूलनासाठी उपाययोजना करण्यात यावी याबद्दल सर्वांचेच एकमत होते.

या अधिवेशनासाठी आलेल्या तरुणांपैकी आ. कृ. वाघमारे, गोविंददास श्रॉफ इ. कार्यकर्त्यांनी त्यांच्या निवासस्थानी एक बैठक आयोजित केली. या बैठकीस स्वामीजी हजर राहिले. या बैठकीत मात्र स्वामीजींनी भाषण केले.

परतूडच्या अधिवेशनात खेड्यांमध्ये पक्के रस्ते बांधावेत, पिण्याच्या पाण्याची सोय करण्यात यावी, जहागिरीच्या मुलखात खालसा मुलखात असलेल्या शेतसाऱ्याइतका शेतसारा लावून जहागिरीच्या मुलखातील शेतकऱ्यांवरील शेतसाऱ्याचा बोजा कमी करण्यात यावा, खाजगी शाळांमधून सर्व दुय्यम शिक्षण मराठी भाषेत देण्यात यावे, खादीच्या वापरास उत्तेजन देण्यात यावे असे व अन्य काही ठराव पास करण्यात आले.

या अधिवेशनात परिषदेची अस्थायी समिती निवडण्यात आली. परिषदेचे अध्यक्ष म्हणून गोविंदराव नानल वकील यांची तर परिषदेचे चिटणीस म्हणून दिंगबरराव बिंदू आणि अनंतराव कुलकर्णी यांची निवड करण्यात आली. परिषदेचे चिटणीसपद स्वामीजींनी स्वीकारावे अशी अनेकांची इच्छा होती. परंतु

आंबेजोगाईच्या शाळेच्या मान्यतेचे प्रकरण अपूर्ण अवस्थेत सोडू नये असे स्वामीजींना वाटत होते. म्हणून त्यांनी परिषदेचे चिटणीसपद स्वीकारण्यास नकार दिला. या अधिवेशनात राजकीय संस्थेची आवश्यकता पुन्हा एकदा प्रस्थापित झाली. स्वातंत्र्यप्राप्तीसाठी आणि लोकशाहीच्या प्रस्थापनेसाठी त्याग करण्याची तयारी ठेवली पाहिजे, अशी मानसिकता निर्माण झाली. ही पहिल्या अधिवेशनाची फलश्रुती होती. दुसरे अधिवेशन लातूर येथे घेण्याचे ठरवून कार्यकर्ते आपल्या गावी परतले.

याच दरम्यान संस्थानात हिंदू-मुस्लिम दंगलीचे प्रमाण वाढत जात होते. हैदराबाद शहरात धूळपेठ येथे झालेल्या दंगलीचे स्वरूप सर्वाधिक भीषण आणि गंभीर होते. ब्रिटिश भारतात कायदेमंडळाच्या निवडणुका होऊ घातल्या होत्या. पण संस्थानात त्या दिशेने कुठलीच हालचाल होत नव्हती. ब्रिटिश भारतातील संस्थानांच्याप्रमाणेच आपले सरकार निवडण्याचा आपल्याला हक्क मिळाला पाहिजे असे हैदराबाद संस्थानातील लोकांना वाटत होते. ही मागणी मुळातूनच दडपून टाकणे सरकारच्या दृष्टीने आवश्यक होते. जबाबदार राज्य पद्धतीच्या मागणीला थोपवण्याचा एक प्रयत्न म्हणून रेसिडेंटच्या मर्जीतील वकील दिवाणबहादूर एस. आरवमदू अय्यंगार यांच्या अध्यक्षतेखाली निजामाने विधि-मंडळाच्या रचनेसंबंधी सुधारणा सुचविण्यासाठी एक समिती २२ सप्टेंबर १९३७ रोजी नियुक्त केली.

जनतेच्या कुठल्याही राजकीय आविष्काराला दडपून टाकण्याच्या प्रयत्नात सरकार असतानाच महाराष्ट्र परिषदेचे दुसरे अधिवेशन लातूर येथे ९ जून १९३८ रोजी न्या. केशवराव कोरटकर यांचे जावई बॅ. श्रीनिवास शर्मा यांच्या अध्यक्षतेखाली झाले.

या अधिवेशनासाठी परवानगी देण्यापासून सरकार विविध अडचणी उभ्या करीत होते. त्यामुळे हे अधिवेशन ऐतिहासिक स्वरूपाचे आणि वादग्रस्त ठरले. संस्थानी सरकार तळहाताने सूर्योदय झाकण्याचा हास्यास्पद प्रयत्न करीत होते. या अधिवेशनासाठी परवानगी देताना सरकारने अनेक निर्बंध लादले. पहिला निर्बंध असा होता की, अध्यक्ष व स्वागताध्यक्ष यांची भाषणे कलेक्टरांकडून मंजूर करून घेण्यात यावीत. दुसरी अट अशी की, अधिवेशनात सरकारने अनुमती दिलेले ठरावच मांडण्यात यावेत.

अध्यक्ष आणि स्वागताध्यक्ष यांची कलेक्टराकडे मंजुरीसाठी दिलेली मुद्रित

भाषणे कलेक्टरांनी अधिवेशनाच्या दिवशी ऐन वेळेस परत केली. आणि त्यातील काही भाग आक्षेपार्ह ठरवून वगळण्याची सूचना केली. अधिवेशन सुरू झाले. अध्यक्षांच्या भाषणाच्या मुद्रित प्रती श्रोत्यांमध्ये वाटण्यात आल्या होत्या. अध्यक्षांनी भाषणाला प्रारंभ करताना सरकारने आक्षेपार्ह ठरवलेला भाग वगळून आपण भाषण वाचत आहोत असे सांगितले. आक्षेपार्ह ठरवला गेलेला भाषणाचा भाग मुद्रित रूपात श्रोत्यांच्या हाती पूर्वीच पोहचला होता.

सभामंडपात अधिवेशन सुरू असतानाच अध्यक्ष व कलेक्टर यांच्यामध्ये चर्चेचे गुऱ्हाळ सुरू होते. अधिवेशनात येणाऱ्या ठरावांची सरकार कसून तपासणी करीत होते. शेवटी कलेक्टरांनी दोन ठराव वगळावेत अशी सूचना केली. त्यापैकी एक ठराव धूळपेठ दंगलीची चौकशी करण्यासाठी चौकशी समिती नेमावी हा होता. सरकारला हे अमान्य होते. म्हणून हा ठराव मांडण्यास परवानगी नाकारण्यात आली. दुसरा ठराव नागरी स्वातंत्र्याबद्दल व हक्कांबद्दल होता. या ठरावाला बऱ्याच चर्चेनंतर सरकारकडून मान्यता देण्यात आली.

या सर्व प्रकारांमुळे अधिवेशनासाठी आलेल्या कार्यकर्त्यांमध्ये संतापाचे वातावरण निर्माण झाले. सरकारच्या मुस्कटदाबीच्या धोरणामुळे लोक प्रक्षुब्ध झाले. सरकारचा निषेध म्हणून अधिवेशन अर्ध्यातच बरखास्त करावे, असा विचार पुढे आला. या मुद्यावर उपस्थितांमध्ये दोन तट पडले. मवाळ आणि नेमस्तांची भूमिका अशी होती की, सरकारशी सामोपचाराची भूमिका स्वीकारावी व अधिवेशन पार पाडावे. जहालांची भूमिका मात्र सरकारचा तीव्र निषेध करण्याची होती. यावर अध्यक्षांनी मतदान घेतले. जमलेल्यांपैकी १३३ प्रतिनिधींनी अधिवेशन सरकारचा निषेध म्हणून स्थगित करावे या बाजूने मतदान केले. तर कलेक्टरांच्या दुरुस्त्या मान्य कराव्यात व सरकारशी सामोपचाराची भूमिका घेऊन अधिवेशन पार पाडावे या बाजूने फक्त ११ मते पडली. आणि अधिवेशनाचे सूप वाजले. यानंतर महाराष्ट्र परिषदेची चार अधिवेशने झाली. या अधिवेशनांमधून निजाम सरकारने देऊ केलेल्या राजकीय सुधारणांची तपशिलाने चर्चा केली गेली. जहाल मतांच्या अध्यक्षांनी या सुधारणा राजकीय थोतांड आहेत. त्यात न अडकता संस्थानव्यापी एकच एक राजकीय संघटना स्थापन करावी व भारतीय संग्राम पूर्णत्वास न्यावा अशी भूमिका घेतली असल्याचे दिसून येते.

खरे तर या भूमिकेचे बीजांकुरण लातूरच्या दुसऱ्या अधिवेशनातच झाले. प्रत्यक्ष राजकीय चळवळीला आरंभ करणे व त्यासाठी कायदेभंग करणे हाच मार्ग

उपलब्ध असल्याच्या निर्णयाप्रत कार्यकर्ते लातूर अधिवेशनाच्या दरम्यान आले होते. आनंद कृष्ण वाघमारे आणि इतर सहकाऱ्यांची इच्छा स्वामीजींनी शिक्षणक्षेत्र सोडून प्रत्यक्ष राजकारणात यावे अशी होती. संस्थानी वातावरणात स्वातंत्र्यासाठी दिल्या जाणाऱ्या लढ्याचे नेतृत्व करण्यासाठी मवाळ नेते उपयोगी नाहीत, त्यासाठी सर्वसंगपरित्याग करण्याची क्षमता असलेल्या, निग्रही, कणखर नेतृत्वाची गरज आहे आणि असे नेतृत्व फक्त स्वामीजीच देऊ शकतात असे बहुसंख्य तरुणांना वाटत होते. आ. कृ. वाघमारेंच्या सारखे अनेक तरुण स्वामीजींना प्रत्यक्ष राजकारणात या असा आग्रह करीत होते.

स्वामीजींचा कलही हळूहळू प्रत्यक्ष राजकारणात येण्याच्या दिशेने होत होता. अंबाजोगाईच्या योगेश्वरी नूतन विद्यालयाला सरकारी मान्यता मिळाल्यामुळे तो प्रश्नही सुटला होता. संस्थानात स्वातंत्र्यासाठी कायदेभंगाची चळवळ करण्यासाठी, सरकारविरोधी संघर्ष देण्यासाठी परिस्थिती परिपक्व झाली आहे या निर्णयाप्रत स्वामीजीही आले होते. सहकारी कार्यकर्त्यांचा राजकारणात पदार्पण करण्यासंबधीचा आग्रह दिवसेंदिवस वाढत होता. लातूरच्या अधिवेशनात स्वामीजींनी कार्यकर्त्यांना सांगितले की, योगेश्वरी शिक्षण मंडळाच्या कार्यकारी मंडळाची संमती घेऊन मी प्रत्यक्ष राजकारणात येईन. शाळेतील अनेक शिक्षक आणि कार्यकारी मंडळाचे सदस्य अधिवेशनासाठी लातूरला आलेलेच होते. उर्वरित सदस्यांना तातडीने लातूरला बोलावून घेण्यात आले. योगेश्वरी शिक्षण मंडळाच्या कार्यकारिणी सदस्यांची तातडीची बैठक अधिवेशनाच्या जागीच झाली. या बैठकीत कार्यकारी मंडळाच्या सदस्यांनी आम्ही शाळेचे कामकाज व्यवस्थितपणे सांभाळू असे स्वामीजींना आश्वासन दिले. आणि स्वामीजींना पूर्ण वेळ राजकीय कार्यासाठी मुक्त केले. कार्यकारी मंडळाकडून संमती मिळताच स्वामीजींनी आपण पूर्ण वेळ राजकीय कामासाठी स्वत:ला वाहून घेत आहोत असे सहकारी मित्रांना सांगितले.

या अधिवेशनातच नागरिक स्वातंत्र्याच्या प्रश्नासंबंधी स्वामीजींच्या संयोजकत्वाखाली एक समिती नेमण्यात आली. काशीनाथराव वैद्य व दिगंबरराव बिंदू या समितीचे सदस्य होते.

अधिवेशन संपल्यानंतर स्वामीजी अंबाजोगाईला गेले. त्यांनी सहकारी शिक्षक, विद्यार्थी, गावकरी यांचा जड अंत:करणाने निरोप घेतला. आपण उभ्या केलेल्या शैक्षणिक वास्तूचे रूप डोळे भरून पाहून घेतले. स्वामीजींनी निर्मम वृत्तीने पुढच्या

प्रवासाची सिद्धता केली.

-९ जून १९३८ रोजी स्वामीजींनी हैदराबादकडे प्रस्थान ठेवले.

-अखंड गतिमान असलेले कालचक्र हैदराबाद संस्थानातील संघर्षपर्वाच्या इतिहासाची मांडणी करण्यासाठी भविष्याची चाचपणी करीत होते.



# स्टेट काँग्रेस : बंदीविरुद्ध सत्याग्रह

हैदराबादेत पोहचल्यावर स्वामीजींसमोर पहिला प्रश्न निवास व्यवस्थेचा होता. काही दिवस दिगंबरराव बिंदू यांच्याकडे राहिल्यानंतर स्वामीजी 'सुंदर भवन' येथे रंगराव रत्नाळीकर नावाच्या माजी मुन्सफाच्या भाड्याच्या घरातील एका खोलीत राहू लागले. त्या काळी राजकीय क्षेत्रातल्या एखाद्या व्यक्तीला आश्रय देणे जोखमीचे होते. पोलिसी ससेमिरा मागे लागण्याची शक्यता होती. तरीही रत्नाळीकरांसारख्या सेवानिवृत्त अधिकाऱ्याने स्वामीजींना आश्रय द्यावा हे तत्कालीन परिस्थितीच्या संदर्भात धाडसच होते.

निवासाचा प्रश्न सुटल्यानंतर स्वामीजींनी आपल्या राजकीय कार्याला प्रारंभ केला. त्यांचा भर वैयक्तिक संपर्क, गाठीभेटींवर होता. हैदराबादेतील मान्यवर प्रतिष्ठित नेत्यांच्या गाठीभेठी घेण्यास त्यांनी प्रारंभ केला. स्वामीजी आणि दिगंबरराव बिंदू दररोज पायी काही मैल चालून या पुढाऱ्यांच्या भेटीसाठी त्यांच्या बंगल्यांवर जात. रात्री दहा-दहा वाजेपर्यंत भेटीसाठी त्यांना ताटकळत राहावे लागे. ही पुढारी मंडळी आपल्या उद्योगातून, कामकाजातून मोकळे झाल्यावर स्वामीजींना केव्हातरी उशिरा भेटत. काही महत्त्वाच्या, प्रतिष्ठित अशा व्यक्ती सत्याग्रहाच्या सूचनेचे स्वागत करीत. पण प्रत्यक्ष सहभागाचा प्रश्न आला की, लगेच कचरत. अशा अनेक पुढाऱ्यांच्या भेटी घेतल्यानंतर, चर्चेनंतर स्वामीजी या निणर्याप्रत आले की, आपल्याला जी चळवळ उभी राहावी असे वाटते ती करण्याची क्षमता व इच्छा हैदराबादच्या जुन्या, प्रतिष्ठित नेत्यांत नाही. स्वामीजी याच काळात शहरातल्या तरुण मंडळींना भेटत होते. त्यांची चळवळीत सर्वस्वासह उडी घेण्याची

कितपत तयारी आहे याची चाचपणी करीत होते. तरुण वर्ग चळवळ सुरू व्हावी यासाठी उत्सुक होता.

प्राप्त परिस्थितीला प्रभावीपणे तोंड द्यायचे तर प्रांतिक संस्थांच्या माध्यमातून आणि प्रांतवार सुट्या प्रयत्नांच्या आधारे हे कार्य साधणार नाही, असे स्वामीजींचे मत झाले होते. त्यासाठी संस्थानव्यापी राजकीय संघटनेची गरज होती. कारण अशा संघटनेशिवाय उद्दिष्टांमध्ये एकवाक्यता येणे शक्य नव्हते. अशा सुट्या प्रयत्नांमध्ये एकसूत्रीपणा निर्माण होणे कठीण होते.

अशी संघटना बांधण्यासाठी, चळवळ प्रभावीपणे चालविण्यासाठी सर्वस्वाचा होम करून उडी घेणारे निष्ठावंत, धाडसी कार्यकर्ते हैदराबाद शहराबाहेरच शोधावे लागतील हे एव्हाना स्वामीजींनी पुरेपूर जाणले होते. खरे तर १९३६ मध्येच स्वामीजी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी सोलापूर येथील एका बैठकीत पूर्णपणे राजकीय चळवळीला वाहून घेण्याची प्रतिज्ञा केली होती आणि १९३८ पर्यंत स्वामीजींचे नेतृत्व हैदराबादबाहेरच्या खाजगी शिक्षण संस्थांमधील सहकाऱ्यांच्या पाठिंब्यावर आकाराला आले होते. त्यांच्या सहकाऱ्यांमध्ये बाबासाहेब परांजपे, गोविंददास श्रॉफ, स. कृ. वैशंपायन, अनंत भालेराव आदी प्रभृतींचा समावेश होता. या सर्वांचे उद्दिष्ट संस्थानव्यापी एकच राजकीय संघटना उभारणे आणि तिच्या मार्फत राजकीय आणि नागरिक हक्कासाठी लढा देणे हे होते.

अशी संघटना उभारण्याचे प्रयत्न संस्थानातील काही मंडळींनी पूर्वीही केले होते. २० जून १९३४ रोजी पुण्याला संस्थानी प्रजेचे एक शिष्टमंडळ गांधीजी व जमनालाल बजाज यांना भेटले होते. या शिष्टमंडळात हैदराबादचे राघवेन्द्र शर्मा यांचा समावेश होता. या शिष्टमंडळाला गांधीजींनी संस्थानी प्रजेचा प्रश्न काँग्रेस हाती घेऊ इच्छित नाही हे स्पष्टपणे सांगितले होते.

दि. २९ जून १९३८ रोजी मवाळांचे नेतृत्व करणारे नेते काशीनाथराव वैद्य यांच्या घरी स्टेट काँग्रेस स्थापन कण्याच्या दृष्टीने विचारविनिमय करण्यासाठी एक बैठक झाली. या बैठकीस बव्हंशी मवाळ कार्यकर्ते हजर होते. स्वामी रामानंद तीर्थ, आ. कृ. वाघमारे, दिगंबरराव बिंदू अशा मराठवाड्यातील कोणत्याही कार्यकर्त्यास बैठकीचे औपचारिक निमंत्रणही नव्हते. स्वतः होऊन जाऊन स्वामीजी, बिंदू यांनी सभासद नोंदणीचा अर्ज भरला. संकल्पित काँग्रेससाठी बी. रामकृष्णराव, सिराजुल हसन तिरमिजी, माडपाटी हनुमंतराव, पांडुरंगराव जोशी, जी. रामाचारी, रामकिशन धूत यांचा समावेश असलेली हंगामी समिती नियुक्त

करण्यात आली. अर्थातच या हंगामी समितीत स्वामीजी, बिंदू, वाघमारे वा अन्य कोणत्याही मराठवाड्यातील तरुण नेत्यांचा समावेश करण्यात आला नव्हता. संस्थानातील प्रस्थापित मवाळ नेतृत्व आणि नव्याने उदयाला येणारे नेतृत्व यांच्यातील संबंध कोणत्या प्रकारे आकार घेत होते हे या घटनेवरून लक्षात येण्यासारखे आहे.

स्टेट काँग्रेसची रीतसर स्थापना करण्यासाठी एक सर्वसाधारण सभा ९ सप्टेंबर १९३८ रोजी जी. रामाचारी यांच्या बंगल्यावर बोलावण्यात आली होती. तत्पुर्वीच संस्थानचे पंतप्रधान सर अकबर हैदरी यांनी ७ सप्टेंबरच्या राजपत्रात हैदराबाद स्टेट काँग्रेसच्या स्थापनेवरील बंदीहुकूम जारी केला. हा हुकूम जारी करताना 'काँग्रेस' या नावाचा दुरुपयोग करून ही संघटना जातीय उद्दिष्टांची पूर्तता करण्यासाठी प्रयत्नशील आहे असा आरोप केला होता. या आक्षेपांचे खंडन करणारे पत्रक हंगामी समितीने तर काढलेच; शिवाय दि. १७ सप्टेंबर १९३८च्या 'हरिजन'च्या अंकात गांधीजींनी संस्थानी सरकारचा स्टेट काँग्रेस स्थापनेबद्दलचा आक्षेप खोडून काढला. तरीही सर्वांना संस्थानाचे सरकार आज ना उद्या स्टेट काँग्रेसच्या स्थापनेला मान्यता देईल अशी आशा वाटतच होती.

बंदी घातल्या गेलेल्या स्टेट काँग्रेसचे संस्थानात काम करणे म्हणजे सरळ सरळ कायदेभंग होता. अशा प्रकारचे काम करणाऱ्यांना सरकारच्या अवकृपेचे धनी व्हावे लागणार होते हे उघडच होते. जुन्या मवाळ कार्यकर्त्यांची मानसिकता सत्याग्रह करून तुरुंगात जाण्याची नव्हती. परिणामी स्टेट काँग्रेसवर बंदी येताच तुरुंगात जाण्याची तयारी असलेल्या स्वामी रामानंद तीर्थांचे नेतृत्व अपरिहार्यपणे उदयास आले.

संस्थानातील प्रस्थापित, जुने राजकीय नेते सत्याग्रहात सहभागी होण्यासाठी टाळाटाळ करीत आहेत हे लक्षात आल्यानंतर स्वामीजी, दिगंबरराव बिंदू, आ. कृ. वाघमारे इ. कार्यकर्ते परभणीचे राहणारे हैदराबादेतील प्रतिष्ठित वकील गोविंदराव नानल यांना भेटले. सत्वशील, धार्मिक वृत्तीचे, सचोटीचे गृहस्थ असा गोविंदरावांचा संस्थानात लौकिक होता. त्यांना सामाजिक जीवनात प्रतिष्ठेचे स्थान होते. स्वामीजी आदींनी गोविंदरावांना स्टेट काँग्रेसचे अध्यक्षपद स्वीकारण्याची विनंती केली. ही विनंती म्हणजे सरकारच्या विरुद्ध दिल्या जाणाऱ्या लढ्याचे नेतृत्व स्वीकारण्याची विनंती होती. गोविंदराव नानलांनी स्वामीजी, बिंदू, वाघमारे यांनी केलेली विनंती मान्य केली आणि स्टेट काँग्रेसचा सत्याग्रह करण्याचे ठरवले.

हैदराबादला शहरात हरिश्चंद्र हेड्डा यांच्या निवासस्थानी दिगंबरराव बिंदू यांच्या पुढाकाराने सत्याग्रह कार्यालय सुरू करण्यात आले. हैदराबाद शहरात सत्याग्रही म्हणून नाव नोंदवण्यास फारशी माणसे पुढे येत नव्हती. श्रीधर नाईक, व्यंकटेश बापूजी जोशी, ॲड. रामचंद्रराव नांदापूरकर इ. मोजक्या कार्यकर्त्यांनी आपली नावे नोंदवली. हे पुरेसे नव्हते. म्हणून स्वामीजींनी मराठवाड्याचा दौरा काढला. स्वामीजी, बाबासाहेब परांजपे आदींनी मराठवाड्यात तरुणांच्या बैठकी घेतल्या. मराठवाड्यातील तरुण आ. कृ. वाघमारे, गोविंदभाई यांच्या नेतृत्वाखाली संघटित होत होते. महाराष्ट्र परिषदांच्या अधिवेशनांमधून अर्ज, विनंत्या, वाटाघाटींचा मार्ग सोडून सरळ सरळ संघर्षाचा, सत्याग्रहाचा मार्ग स्वीकारावा अशी मराठवाड्यातील तरुणांची मनोधारणा झाली होती. अनेक तरुणांनी सत्याग्रहात सहभागी होण्याची इच्छा व्यक्त केली. स्वामीजी आणि बाबासाहेब यांच्या दौऱ्यामुळे मराठवाड्यातील तरुणांमध्ये मोठा उत्साह संचारला. परिणामाची क्षिती न बाळगता अनेक तरुण स्वामीजींच्या नेतृत्वाखाली सत्याग्रहात सहभागी होण्यास सिद्ध झाले. हळूहळू संस्थानातही सत्याग्रहाचे वातावरण तयार होत चालले.

२५ सप्टेंबर १९३८ रोजी दिल्लीत अ. भा. काँग्रेस महासमितीची बैठक झाली. या बैठकीच्या वेळी हैदराबाद स्टेट काँग्रेस व तिच्यावरील बंदी याची माहिती देणारी एक इंग्रजी पुस्तिका छापून महासमितीच्या सदस्यांना वाटण्यात आली. याच बैठकीत हैदराबाद स्टेट काँग्रेसवरील बंदी उठवण्याची मागणी करणारा ठराव करण्यात आला.

हैदराबाद स्टेट काँग्रेसची सत्याग्रहाची तारीख २४ ऑक्टोबर १९३८ ही ठरविण्यात आली. गोविंदराव नानल यांच्या अध्यक्षतेखाली पहिल्या तुकडीने सत्याग्रह करण्याचे निश्चित झाले. सत्याग्रह होणार हे निश्चित होताच वाय. डी. जोशी वगैरे हिंदुत्ववादी कार्यकर्ते स्वामीजींना भेटले आणि फक्त नागरी स्वातंत्र्यासाठी हा सत्याग्रह होत असेल तर आम्हीसुद्धा त्यात सहभागी होऊ असे सांगितले. जर स्टेट काँग्रेसवरील बंदीविरुद्ध हा सत्याग्रह असेल तर मात्र या सत्याग्रहात सहभागी होण्यास त्यांचा नकार होता. हा सत्याग्रह फक्त नागरी स्वातंत्र्यासाठी न करता राजकीय स्वातंत्र्यासाठी आणि संस्थानात राजकीय संघटना स्थापन करण्याच्या अधिकारासाठी असला पाहिजे असे स्वामीजी व इतर कार्यकर्त्यांचे मत होते.

स्टेट काँग्रेसचा सत्याग्रह सुरू होण्याच्या दरम्यानच हैदराबादेत हिंदू

महासभेच्या कार्यकर्त्यांनी हिंदू नागरी स्वातंत्र्य संघ या संस्थेतर्फे नागरी स्वातंत्र्यप्राप्तीसाठी सत्याग्रह केला. २१ ऑक्टोबर १९३८ रोजी वाय. डी. जोशी यांच्या नेतृत्वाखाली पाच जणांच्या तुकडीने नागरी प्रतिकाराच्या नावावर कायदेभंग करून तुरुंगवास पत्करला. नंतर प्रत्येक आठवड्यास एक तुकडी हिंदू नागरी स्वातंत्र्य संघाच्या वतीने सत्याग्रह करीत होती.

स्टेट काँग्रेसचा सत्याग्रह सुरू झाला त्याच दिवशी आर्य समाजाचा सत्याग्रह हैदराबादेत सुरू झाला. हा सत्याग्रह धार्मिक हक्काच्या संरक्षणासाठी होता. या आंदोलनाला संस्थानातील धार्मिक वातावरणाची पार्श्वभूमी होती. संस्थानातील राजकीय नेते बहदुर यार जंग यांनी हैदराबादेत १९२७ पासून 'तबलीग'ची म्हणजे शुद्धीकरणाची चळवळ सुरू केली. प्रत्यक्षात 'तबलीग'च्या नावाखाली धर्मांतरेच केली जात होती. सरकारच्या पाठिंब्याने मोठ्या प्रमाणात होत असलेल्या धर्मांतरांना थोपवण्याचे काम आर्य समाज करीत होता. आर्य समाजाने २४ ऑक्टोबर १९३८ रोजी सुरू केलेल्या सत्याग्रह आंदोलनात देशाच्या अनेक भागातील सत्याग्रहींनी भाग घेतला. सुमारे बारा हजार सत्याग्रहींना या वेळेस अटक झाली. आर्य समाजाचे आंदोलन हिंदू नागरी संघाचे सत्याग्रह आंदोलन आणि स्टेट काँग्रेसचे सत्याग्रह आंदोलन यांच्या तुलनेत सत्याग्रह्यांच्या संख्येच्या दृष्टीने खूप मोठे होते. सरकारने आर्य समाजाच्या मागण्यांपैकी धार्मिक स्वातंत्र्याशी निगडित मागण्या चर्चेअंती मान्य केल्या. आणि ७ ऑगस्ट १९३९ रोजी आर्य समाजाने आपले सत्याग्रह आंदोलन मागे घेतले.

१९३७ मध्ये अ. भा. काँग्रेस कमिटीची बैठक कलकत्ता येथे झाली. या बैठकीत संस्थानांसह संपूर्ण हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळावे अशी काँग्रेसची भूमिका असल्याचे स्पष्ट करण्यात आले. परंतु संस्थानातील परिस्थिती आणि हिंदुस्थानातील परिस्थिती भिन्न स्वरुपाची असल्यामुळे संस्थानातील चळवळी जनतेने स्वतःच्या बळावर चालवाव्यात. त्याला काँग्रेसचा पाठिंबा असेल असे काँग्रेसने ठरवले. तरीही संस्थानातील आंदोलने अ. भा. काँग्रेसच्या नावावर चालवू नयेत. असे ठरवताना व्यक्तिशः काँग्रेस कार्यकर्त्यांना या आंदोलनात सहभागी होता येईल असेही काँग्रेसच्या बैठकीत स्पष्ट करण्यात आले.

महाराष्ट्रातील काँग्रेसचे ख्यातनाम, ध्येयनिष्ठ कार्यकर्ते सेनापती पांडुरंग महादेव बापट यांचे लक्ष हैदराबादेतील नागरी स्वातंत्र्यावरील निर्बंधाकडे वेधले गेले. अन्याय मग तो कुणाही व्यक्तीवर झालेला असो, कुठल्याही प्रदेशात झालेला

असो, त्याचा प्रतिकार करणे ही बापटांची वृत्ती होती. त्यांनी स्वामीजींना पत्र पाठवून आपण हैदराबादेस येण्याचे ठरविले आहे- आपणावर संस्थानात प्रवेशबंदीहुकूम घातला तरी तो मोडून हैदराबादला येण्याचे ठरवले आहे- असे कळवले. आणि बापटांनी एक विस्तृत निवेदन वृत्तपत्रांना पाठवले. त्या निवेदनात हैदराबादमधील नागरी स्वातंत्र्यावरील निर्बंधाचा प्रश्न मांडला. नंतर २४ सप्टेंबर १९३८ रोजी हैदराबादला पोहचले. सरकारने त्यांच्यावर हद्दपारीचा हुकूम बजावून बापटांची संस्थानाबाहेर रवानगी केली. हैदराबाद संस्थानातील नागरी स्वातंत्र्याचा प्रश्न बापटांना पक्षनिष्ठेपेक्षाही अधिक महत्त्वाचा आणि निकडीचा वाटत होता. त्या दृष्टीने ते प्रयत्नही करीत होते. परंतु ते प्रयत्न एकांड्या शिलेदाराचे असल्यासारखे एकाकी राहिले. सेनापती बापट संस्थानामध्ये दोन वेळा आले. एकदा त्यांना पकडून संस्थानाबाहेर पाठवण्यात आले. दुसऱ्या वेळी संस्थानात प्रवेश करताना त्यांना गुलबर्गा येथे १ डिसेंबर १९३८ रोजी पोलिसांनी पकडून खटला भरला. या खटल्यात बापटांना दोन वर्षांची शिक्षा ठोठावण्यात आली.

संस्थानातील दडपशाहीची माहिती संस्थानाबाहेर कळू नये याबाबत संस्थानी सरकार अत्यंत दक्ष होते. त्या दृष्टीने संस्थानातील जनतेचा संस्थानाबाहेरच्या हिंदुस्थानातील राजकीय संघटनांशी मुळीच संबंध येऊ नये याची काळजी सरकार घेत होते. परंतु संस्थानामध्ये आर्य समाज, हिंदु महासभा यांनी केलेल्या सत्याग्रहांमध्ये संस्थानाबाहेरील लोकांनी फार मोठया संख्येने भाग घेतला. संस्थानाबाहेरील सेनापती बापट यांनी एकदा नव्हे, तर दोन वेळा संस्थानात येऊन कायदेभंग केला. हे पाहताच आपल्या प्रयत्नांवर पाणी फिरले आहे हे सरकारच्या लक्षात आले. आणि सरकारचे माथे भडकले. संस्थानातील परिस्थिती बाहेर पोहचवणारी साधने वृत्तपत्रेच आहेत हे लक्षात घेऊन सरकारने संस्थानातील वृत्तपत्रस्वातंत्र्यावर मोठ्या प्रमाणात निर्बंध लादले. या निर्बंधांमुळे संस्थानात नवे वृत्तपत्र काढणे वा चालवणे जवळपास अशक्यप्राय झाले. संस्थानाबाहेरून येणाऱ्या अनेक वृत्तपत्रांवर संस्थानात बंदी घालण्यात आली. यावरचा तोडगा म्हणून स्टेट काँग्रेसचे कार्यकर्ते आ. कृ. वाघमारे यांनी 'मराठवाडा' हे साप्ताहिक १० एप्रिल १९३८ पासून पुण्यातून काढण्यास प्रारंभ केला. या साप्ताहिकातून संस्थानातील दडपशाहीबद्दलचे लेखन प्रसिद्ध होत असे. संस्थानातील जनतेला त्यांच्या स्वातंत्र्यावर घातल्या गेलेल्या बंधनाची जाणीव करून देण्याचा प्रयत्न या साप्ताहिकातून केला जाई. म्हणून निजाम सरकारने या साप्ताहिकावर बंदी घातली.

सरकारने बंदी घालताच वाघमारे दुसऱ्या नावाने साप्ताहिक सुरू करीत. अशा पद्धतीने वाघमारे यांनी वेगवेगळ्या अकरा शीर्षकांखाली 'मराठवाडा' साप्ताहिक नेटाने काढले आणि संस्थानामध्ये लोकजागृती करण्याचा प्रयत्न केला. संस्थानचे सरकार हैदराबादेतील चळवळी दडपून टाकण्यासाठी अधिकाधिक कठोर भूमिका घेऊ लागले. सरकारविरोधी चळवळी करू पाहणाऱ्या नागरिकांवर कडक कारवाई करू लागले. अशा वातावरणात स्टेट काँग्रेसच्या सत्याग्रहाला प्रारंभ झाला.

नियोजित कार्यक्रमानुसार २४ ऑक्टोबर १९३८ या दिवशी स्टेट काँग्रेसच्या सत्याग्रह्यांच्या पहिल्या तुकडीने गोविंदराव नानल यांच्या नेतृत्वाखाली सत्याग्रह केला. दिवाळीच्या पाडव्याचा दिवस असतानाही शेकडो लोक सुलतान बाजार तार कचेरीजवळ जमले होते. उपस्थित जनसमुदायाच्या साक्षीने रामकिशन धूत, रविनारायण रेड्डी, श्रीनिवासराव बोरीकर, जनार्दनराव देसाई या सहकाऱ्यांसह गोविंदराव नानल यांनी सत्याग्रहास प्रारंभ केला. याप्रसंगी नानलांनी स्टेट काँग्रेसची स्थापना केल्याचे आणि आपण तिचे अध्यक्ष असल्याचे व इतर सत्याग्रही सदस्य असल्याचे घोषित केले. या सर्व सत्याग्रह्यांना अटक करून चंचलगुडा जेलमध्ये पाठवण्यात आले. यानंतर दोन-तीन दिवसांनी २७ ऑक्टोबर रोजी स्वामी रामानंद तीर्थ यांच्या नेतृत्वाखाली व्यंकटेश बापूजी जोशी, राघवेंद्रराव दिवाण, तेलंगणचे राजरेड्डी, कर्नाटकचे अप्पाराव जोशी यांनी पुतली बावडीजवळ सत्याग्रह केला. सत्याग्रहापूर्वी स्वामीजींनी पोलिस कमीशनर नबाब रहमत यार जंग यांना रीतसर पत्र पाठवून आपण बंदीहुकूम मोडून स्टेट काँग्रेसचे कार्य करणार असल्याचे कळवले होते. या प्रसंगी स्वामीजींनी दोन पत्रके प्रसिद्ध केली. 'सत्य, अहिंसा आणि सत्याग्रह' या पहिल्या पत्रकात सत्याग्रहाच्या क्रांतिशास्त्राचे स्वरूप विशद करण्यात आले होते. आणि संस्थानातील जनतेस पूर्णपणे निर्भय बनून मूलभूत स्वातंत्र्याची गळचेपी करणारे कायदे मोडण्याचे आवाहन केले होते. दुसऱ्या पत्रकात तरुणांना आवाहन करण्यात आले होते. त्यात म्हटले होते की, ''सर्व जगात स्वातंत्र्याचा लढा तुमच्याच श्रेणीने जिंकला आहे. आमच्याकडून अपूर्ण राहिलेला धागा उचलून पुढे चला. कोणत्याही जातीचा, व्यक्तीचा किंवा पंथाचा द्वेष न करता पुढे जाऊ या व काँग्रेसचा झेंडा फडकत ठेवू या'' स्वामीजी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनाही अटक करून चंचलगुडा कारागृहात पाठवण्यात आले.

पहिल्या तुकडीतील सत्याग्रहींना एक महिना साधी कैद व दोनशे रु. दंड व

दंड न दिल्यास आणखी पंधरा दिवस शिक्षा देण्यात आली. दुसऱ्या तुकडीतील सत्याग्रह्यांपैकी स्वामीजींना १८ महिने सक्तमजुरी व ५० रु. दंड तर इतरांना नऊ महिने सक्तमजुरी व २५ रु. दंड अशी शिक्षा ठोठावण्यात आली. सरकार सत्याग्रह्यांवर जरब बसविण्यासाठी अधिकाधिक कठोर शिक्षेची उपाययोजना करीत होते. पण त्याचा सत्याग्रह्यांवर काही परिणाम झाला नाही. २४ डिसेंबर १९३८ रोजी गांधीजींनी सत्याग्रह स्थगितीचा आदेश देईपर्यंत हैदराबाद, सिकदराबाद शहरात सत्याग्रह करून १८ तुकड्या तुरुंगात गेल्या. मराठवाड्यातील विविध गावांतून सत्याग्रह करून तीनशे कार्यकर्ते तुरुंगात गेले. आणि १५०० कार्यकर्त्यांनी सत्याग्रहात सहभागी होण्यासाठी आपली नावे नोंदवली होती.

कोर्टाचा निकाल आल्यावर इतर गुन्हेगारांप्रमाणे स्वामीजींना तुरुंगात आणण्यात आले. पायात बेड्या घालण्यात आल्या. घोंगडी, थाळी, लोटा, चटई, टॉवेल आणि तुरुंगाचा जाडाभरडा गणवेश देण्यात आला. सक्तमजुरीची शिक्षा असल्याने बॉबिनवर सूत गुंडाळण्याचे काम देण्यात आले. सर्वसामान्य कैद्यापेक्षा तिप्पट कामाचे उद्दिष्ट ठरवून देण्यात आले. हे सरकारी रोषाचे एक प्रकारचे फलित होते. सतत आठ तास काम करूनही निर्धारित कामाचा पाऊण भागच पूर्ण होऊ शकत असे.

स्वामीजींच्या भेटीस राज्याचे पोलिस महानिरीक्षक हॉलिन्स आले असताना स्वामीजींची आणि त्यांची शाब्दिक चकमक झाली. याची शिक्षा म्हणून स्वामीजींची अंधार कोठडीत रवानगी करण्यात आली. ८ फूट लांब ४ फूट रूंद कोठडीत बाहेरचा सूर्यप्रकाश वा वाऱ्याची झुळूकही पोहचू शकत नसे. रात्री कोठडीत दिवाही नसे. मलमूत्र विसर्जनासाठी एक कुंडी ठेवण्यात आली होती. इतर कोणाशी बोलू नये असे बंधन घालण्यात आले होते. या कोठडीत स्वामीजी १११ दिवस होते.

स्वामीजी तुरुंगात असतानाच संस्थानातील महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचे वंदेमातरम् आंदोलन १४ नोव्हेंबर १९३८ रोजी उसळले. औरंगाबादच्या इंटरमीजिएट कॉलेजच्या वसतिगृहात प्रार्थना म्हणून विद्यार्थ्यांनी वंदेमातरम् म्हणावयास प्रारंभ केला. प्राचार्यांनी निर्बंध घातल्यानंतरही विद्यार्थ्यांनी हे निर्बंध मोडून गीत म्हणणे सुरू ठेवले. वंदे मातरम् आंदोलनाचे लोण संस्थानातील इतर भागांतील शहरांमधून पसरले. हैदराबाद, वरंगल, परभणी, नांदेड, बीदर, महबूबनगर येथील शाळा कॉलेजांमधून मोठ्या संख्येने विद्यार्थी वंदेमातरम् म्हणू

लागले. या विद्यार्थ्यांना शाळा कॉलेजांमधून काढून टाकण्यात आले. इतके होऊनही शेवटी सरकारने शाळा-कॉलेजांमधून वंदे मातरम् म्हणण्यास परवानगी दिली नाहीच; शिवाय विद्यार्थ्यांवर केलेली कारवाईही मागे घेतली नाही. या विद्यार्थ्यांनी संस्थानाबाहेरच्या नागपूर, जबलपूर, वाशिम येथील शिक्षण संस्थामध्ये प्रयत्नपूर्वक प्रवेश मिळवला.

हैदराबाद संस्थानात विद्यार्थ्यांनी सुरू केलेले वंदे मातरम् आंदोलन यशस्वी झाले नाही. हे आंदोलन अयशस्वी झाले असले तरी या आंदोलनाचा एक फार मोठा फायदा झाला. तो असा की, संस्थानातील तरुण वर्गात या आंदोलनामुळे राजकीय जागृती निर्माण झाली. अन्यायाविरुद्ध संघर्ष देण्याची आवश्यकता लोकांना पटली.

संस्थानात स्टेट काँग्रेसचे आंदोलन सुरू झाले तसे ते आंदोलन चिरडण्याचे प्रयत्नही सुरू झाले. स्टेट काँग्रेसच्या कार्यकर्त्यांपैकी मवाळ मंडळी सत्याग्रह आंदोलनापासून दूरच होती. ही मंडळी सत्याग्रहात सहभागी होण्याचे टाळत होती. मवाळांपैकी जनार्दनराव देसाई आणि काशीनाथराव वैद्य यांचा अपवाद वगळता अन्य मवाळ कार्यकर्ते आंदोलनात सहभागी झाले नाहीत. संस्थानात या आंदोलनावर बंदी घालण्यासाठी निमित्त मिळावे म्हणून हे आंदोलन जातीय स्वरूपाचे आहे असे सिद्ध करण्याचा प्रयत्न संस्थानाचे पंतप्रधान सर अकबर हैदरी करीत होते. यामुळे संस्थानात स्टेट काँग्रेसवर घातलेल्या बंदीचे समर्थनही सरकारला करता येणार होते.

सत्याग्रह सुरू झाल्यानंतर काही दिवसांनी गांधीजींचा परिचय असलेले संस्थानातील स्टेट काँग्रेसचे कार्यवाहक अध्यक्ष असलेले दामोदरदास मुंदडा आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी गांधीजींची भेट घेतली. हैदराबादची चळवळ गांधीजींच्याच मार्गदर्शनाने चालत होती. त्यामुळे गांधीजींचे संस्थानातील परिस्थितीवर बारीक लक्ष होते. संस्थानात एकाच वेळी हिंदुमहासभेचे नागरी स्वातंत्र्यासाठी, आर्य समाजाचे धार्मिक स्वातंत्र्यासाठी आणि स्टेट काँग्रेसचे राजकीय स्वातंत्र्यासाठी आणि लोकशाहीसाठी सत्याग्रह आंदोलने सुरू झाली होती. संस्थानातील जनसामान्यांच्या मनात एकाच वेळी सुरू झालेल्या आंदोलनांमुळे हेतूंची सरमिसळ होण्याची शक्यता गांधीजींना वाटत होती. स्टेट काँग्रेसची धर्मनिरपेक्ष भूमिका आणि इतर संघटनांच्या धार्मिक भूमिका यांच्या सीमारेषा पुसल्या जाण्याचा धोका गांधीजींना जाणवत होता. म्हणून गांधीजींनी दामोदरदास मुंदडा आणि त्यांच्या सहकाऱ्यांना

संस्थानातील स्टेट काँग्रेसचा सत्याग्रह सध्याच्या परिस्थितीत स्थगित करावा असा सल्ला दिला.

२२ डिसेंबर १९३८ रोजी नाशिक येथे स्टेट काँग्रेस कार्यकारिणीची बैठक झाली. या बैठकीत दामोदरदास मुंदडांनी गांधीजींनी सत्याग्रह स्थगित करण्याचा सल्ला दिल्याचे कार्यकर्त्यांना सांगितले. या बैठकीस उपस्थित असलेल्या तरुण कार्यकर्त्यांपैकी गोविंददास श्रॉफ आणि त्यांच्या सहकाऱ्यांना संस्थानात सत्याग्रह सुरूच राहावा असे वाटत होते. त्यामुळे तरुण कार्यकर्त्यांना गांधीजींचा सल्ला फारसा रुचला नाही. ही बैठक आटोपताच मुंदडा हैदराबादला गेले. आणि गांधीजींचा सल्ला काशीनाथराव वैद्य यांना सांगितला. २४ डिसेंबर १९३८ रोजी मवाळांचे नेते काशीनाथराव वैद्य यांनी शेवटचा सत्याग्रह केला. एका निवेदनाद्वारे सत्याग्रह स्थगित करण्यात येत असल्याची घोषणा केली. सरकारने वैद्यांनाही अटक केली.

लुधियाना येथे १५ फेब्रुवारी १९३९ रोजी भरलेल्या अ. भा. संस्थानी प्रजा परिषदेच्या अध्यक्षपदावरून बोलताना पं. नेहरूंनीही सत्याग्रह स्थगितीच्या निर्णयामागची कारणे सांगितली. सर्व संस्थानातील प्रजेसाठी एखादी प्रातिनिधिक संस्था असावी या उद्देशाने अ. भा. संस्थानी प्रजा परिषदेची १९२६ मध्ये स्थापना झाली होती. १९२७ पासून या परिषदेची १९४७ पर्यंत वार्षिक अधिवेशने होत होती.

सत्याग्रह स्थगित झाल्यावर गांधीजींनी हैदराबादचे पंतप्रधान सर अकबर हैदरी यांना एक पत्र पाठवले. त्या पत्रात गांधीजींनी असे लिहिले की, स्टेट काँग्रेसने आपला सत्याग्रह स्थगित करून शासनाला सहकार्य करण्याचे ठरवले आहे. शासनाने सहकार्याचा हात स्वीकारावा आणि स्टेट काँग्रेसवरील बंदी उठवावी. सत्याग्रहात पकडण्यात आलेल्या सर्व कार्यकर्त्यांना सोडून देण्यात यावे. त्यानुसार सरकारने टप्प्याटप्प्याने सत्याग्रहींची तुरुंगातून मुक्तता केली. सर्वात शेवटी १० एप्रिल १९३९ रोजी स्वामीजींची तुरुंगातून मुक्तता करण्यात आली. आणि सत्याग्रह आंदोलनाला स्वल्पविराम मिळाला.



# वैयक्तिक सत्याग्रह-तत्त्वनिष्ठेची कसोटी!

स्टेट कॉंग्रेसने सत्याग्रह स्थगित केल्यानंतर कार्यकर्त्यांच्या दृष्टीने काही काळ विषण्णतेचा आणि निष्क्रियतेचा गेला. आंदोलनात उतरलेल्या कार्यकर्त्यांना दीर्घकाळपर्यंत निष्क्रिय राहू देणे चळवळीच्या दृष्टीने हिताचे नव्हते आणि ते कार्यकर्त्यांनाही पटणारे नव्हते. संस्थानात १९२८ मध्ये स्थापन झालेल्या इत्तेहादुल मुसलमीनच्या कारवाया दिवसेंदिवस वाढत होत्या. 'मजलीसे इत्तेहादुल मुसलमीन' ही संघटना प्रारंभी मुस्लिमांचे ऐक्य आणि उन्नती या दृष्टीने कार्यरत होती. १९३५ नंतर या संघटनेचे कार्यकर्ते झपाट्याने मुस्लिमेतरांची धर्मांतरे करू लागले. या संघटनेचे अध्यक्ष बहादूरयारजंग यांचा प्रभावी आणि फर्डे वक्ते म्हणून लौकिक होता. त्यांच्या भाषणांमध्ये हिंदू धर्मीय आणि सत्याग्रह्यांची पुरेपूर निर्भत्सना असे. आणि मुस्लिमांना चिथावणी देणारी वक्तव्ये असत. संस्थानातील स्वातंत्र्य आंदोलनात शेवटच्या काळात रझाकारांकडून जे हिंसक हल्ले आणि अत्याचार करण्यात आले त्या हल्लेखोरांची आक्रमक मानसिकता घडवण्यात बहादूर यार जंग यांचा मुख्य वाटा होता. १९३५ पासून इत्तेहादुलची धार्मिक भूमिका आणि बहादुरयार जंग यांची भाषणे यामुळे संस्थानात जी परिस्थिती आकार घेऊ लागली होती तिची प्रतिक्रिया म्हणून स्टेट-कॉंग्रेसचे कार्यकर्ते हिंदु-मुस्लिम लढ्याकडे आकर्षित होण्याचा धोका होता. या परिस्थितीतून मार्ग काढण्याचे प्रयत्न स्वामीजी, गोविंददास वगैरे कार्यकर्ते करीत होते.

निजामाने नियुक्त केलेल्या अय्यंगार समितीचा रिपोर्ट ऑगस्ट १९३८ मध्ये सादर करण्यात आला. अय्यंगार समितीने केलेल्या शिफारशीनुसार सर्व प्रौढांना

मताधिकार देण्याऐवजी विशिष्ट शेतसारा आणि भाडे देणारे भाडेकरू आणि घरमालक यांनाच मताधिकार देण्यात आला होता. कायदेमंडळात हिंदूंना प्रतिनिधित्व देण्यात आले असले तरी मुस्लिमांची बहुसंख्या राहील अशी तरतूद करण्यात आली होती. कायदेमंडळात लोकनियुक्त सभासदांपेक्षा सरकारनियुक्त सभासदांचेच बहुमत राहणार होते. लोकप्रतिनिधींना सत्ता देण्याची जी मागणी स्टेट काँग्रेस करीत होती ती अर्थातच या शिफारशींमधून पूर्ण झालेली नव्हती. म्हणून या सुधारणांचा पं. नेहरू, गांधी, काँग्रेस कार्यकारिणी, संस्थानी प्रजा परिषदेचे अध्यक्ष पट्टाभि सीतारामय्या, हैदराबाद स्टेट काँग्रेस, स्वामी रामानंद तीर्थ, काशीनाथराव वैद्य या सर्वांनीच धिक्कार केला.

हा काळ मवाळ नेत्यांना वाटाघाटींना अनुकूल होता. तसे प्रयत्नही मवाळ नेत्यांकडून होत होते. ९ सप्टेंबर १९३९ रोजी काशीनाथराव वैद्यांनी सर अकबर हैदरी व मंत्री थियोडार टॉस्कर यांची इतर नेत्यांसह भेट घेतली. या बैठकीत हैदरींनी असे सांगितले की, स्टेट काँग्रेसच्या 'काँग्रेस' नावामुळे संस्थानाबाहेरील एका राजकीय पक्षाचा स्टेट काँग्रेसशी संबंध असल्याचे सूचित होते. संस्थानाबाहेरील राजकीय पक्षांना संस्थानात काम करण्यास बंदी असल्यामुळे हैदरींनी हा आक्षेप घेतला होता. नंतर काशीनाथराव वैद्यांनी संस्थानाचे गृहसचिव अजहर हुसेन यांना पत्र लिहून अशी विचारणा केली की, संघटनेच्या नावात बदल केला तर संस्थानात काम करण्यास सरकार परवानगी देईल काय? गृहसचिवांनी नि:संदिग्ध शब्दांत सरकार परवानगी देईल असे काही अश्वासन दिले नाही. गांधीजींच्या सल्यानुसार संघटनेचे नाव बदलून 'हैदराबाद नॅशनल कॉन्फरन्स' या नावाने संस्थानात काम सुरू करण्यात आले. काम सुरू करण्यापूर्वी संस्थान सरकारची परवानगी मात्र घेतली गेली नाही. या तांत्रिक त्रुटीचा फायदा घेऊन सरकारने आपल्या मान्यतेशिवाय काम सुरू केल्याचा आक्षेप संघटनेवर घेतला. संघटनेचे नाव बदलण्याची सरकारची सूचना मान्य केल्यानंतरही सरकार नवे नवे आक्षेप घेऊ लागले. शेवटी गांधीजींच्या सल्ल्यावरून नॅशनल कॉन्फरन्सचे काम थांबवण्यात आले.

संस्थानात निर्माण झालेल्या परिस्थितीवरील विचार विनिमयासाठी आणि स्टेट काँग्रेसच्या कार्यकारिणीची निवड करण्यासाठी १२ व १३ सप्टेंबर १९३९ रोजी कार्यकर्त्यांची एक बैठक मनमाड येथे घेण्यात आली. बैठकीला उपस्थित असलेल्या बहुसंख्य सदस्यांची इच्छा कार्यकारिणीचे अध्यक्षपद सत्याग्रहाचे नेतृत्व

करणाऱ्या दाजीसाहेब नानल यांनीच स्वीकारावे अशी होती. मात्र रामकिशन धूत आणि त्यांच्या काही सहकाऱ्यांना काशीनाथराव वैद्यांनी अध्यक्षपद स्वीकारावे असे वाटत होते. ते अशक्य आहे असे दिसल्यावर रामकिशन धूत यांनी चिटणीसपद स्वीकारण्यास नकार दिला. त्यानंतर अध्यक्षपदी नानल व चिटणीसपदी स्वामीजींची निवड करण्यात आली. बैठकीतील कार्यकर्त्यांनी संस्थानातील लढा सुरू ठेवण्याचा आपला निर्धार व्यक्त केला. याच बैठकीत गांधीजींनी दिलेल्या सल्ल्याप्रमाणे विधायक कार्यसमिती कायम करण्यात आली. ही समिती ग्रामोद्योग, सूतकताई, अस्पृश्यता निवारण, साक्षरता प्रसार वगैरे विधायक कामे करणार होती.

संस्थानात स्टेट काँग्रेसवरील बंदी कायम होती. 'हैदराबाद नॅशनल कॉन्फरन्स' या नव्या नावानेही कार्य करण्यासाठी काँग्रेसजनांना सरकार परवानगी देत नव्हते. मुस्लिमांची आक्रमकता दिवसेंदिवस वाढत होती. संस्थानात जाळपोळ व जातीय दंग्यांचे प्रमाण दिवसेंदिवस वाढतच होते.

अशा परिस्थितीत आंदोलनाशिवाय दुसरा पर्याय नव्हता. या आंदोलनाच्या संदर्भात गांधीजींशी सल्लामसलत करण्यासाठी स्वामीजी आणि स्टेट काँग्रेसचे कार्यकर्ते ऑगस्ट १९४० मध्ये सेवाग्रामला गेले. गांधीजींच्या झोपडीत सर्व कार्यकर्ते जमा झाले. सर्वांनी लढा पुन्हा सुरू करण्याबद्दल गांधीजींनी परवानगी द्यावी, अशी एकमुखाने मागणी केली. गांधीजी विचारमग्न झाले. हैदराबाद स्टेट काँग्रेसचे अस्तित्व मान्य करून घेण्यासाठी लढ्याशिवाय दुसरा पर्याय नसल्याचे गांधीजींचेही मत झाले होते. या लढ्याचे स्वरूप विशद करताना गांधीजी नवाच मार्ग सुचवत होते. त्यांनी सुचवले की, सर्वांनी आपण काँग्रेसचे सदस्य आहोत अशी घोषणा करावयाची व तुरुंगवासाच्या शिक्षेला सामोरे जावयाचे. हा लढा अनिश्चित काळपर्यंत चालू शकेल. त्यात कदाचित जीविताचेही बलिदान द्यावे लागेल. या त्यागाची सर्व कार्यकर्त्यांची तयारी असल्याची खात्री करून घेतल्यानंतर गांधीजींनी सर्वांकडे तीक्ष्ण दृष्टिक्षेप टाकत एक प्रश्न विचारला'' तुमचा अहिंसेवर कितपत विश्वास आहे? अहिंसा ही तुमची जीवननिष्ठा आहे का धोरण?'' या प्रश्नाचा विचार करून दुसऱ्या दिवशीही उत्तर दिले तर चालेल असे त्यांनी सांगितले. गांधीजी वैयक्तिक सत्याग्रहाची कल्पना विशद करून सांगत होते. ज्यांच्या जीवनात अहिंसेला जीवननिष्ठेचे स्थान असेल अशांनाच गांधीजी या सत्याग्रहात सहभागी होण्यासाठी परवानगी देणार होते.

गांधीजींचा हा प्रश्न म्हणजे स्वामीजींना आव्हान होते. त्यांच्या तत्त्वनिष्ठेची

जणू कसोटी होती. रात्रभर त्यांच्या मनात वेगवेगळ्या प्रश्नांचे काहूर माजले होते. प्रत्येक प्रश्न स्वामीजींच्या आत्मशोधाच्या प्रवासावरचे एक कसोटीचे पाऊल होते. स्वामीजी स्वत:शी विचार करू लागले. विधायक कार्यक्रमांचा उपयोग केवळ स्वत:ची सुटका करून घेण्यासाठी आहे का? ही सुटका क्लेशदायक लढ्यापासून तर नाही ना? अहिंसेचा स्वीकार आपण जीवननिष्ठा, तत्त्व म्हणून केला आहे का? का अहिंसेचे तत्त्वज्ञान आपण धोरण म्हणून स्वीकारले आहे?- असे प्रश्न स्वामीजींना विचारात टाकत होते. महात्माजींच्या प्रत्येक प्रश्नावर स्वामीजी विचार करू लागले, तरीही जीवननिष्ठा म्हणून आपला अहिंसेवर विश्वास आहे अशी खात्री वाटेना. महात्माजींनी लावलेल्या कसोटीला आपण उतरू शकतो का नाही याचा विचार करण्यात सारी रात्र घालवली. दुसऱ्या दिवशी उत्तर देण्याइतका आत्मविश्वास स्वामीजींच्या मनात निर्माण झाला. दुपारी गांधीजींच्या झोपडीत गेल्यानंतर त्यांनी गांधीजींना सांगितले की, ''मी जरी पूर्णपणे अहिंसावादी नसलो तरी या तत्त्वानुसार जन्मभर वागण्याचा प्रयत्न करीन.'' गांधीजींनी अंतर्भेदी दृष्टीने स्वामीजींकडे काही क्षण निरखून पाहिले. नंतर त्यांच्या चेहऱ्यावर प्रसन्न स्मित झळकले. आणि ''हैदराबाद स्टेट काँग्रेसवरील बंदीहुकूम मोडण्याची मी तुला परवानगी देईन.'' असे सांगितले. पुढे ते असेही म्हणाले की, हा सत्याग्रह वैयक्तिक स्वरूपाचा असेल. ज्यांना या सत्याग्रहात सहभागी व्हावयाचे असेल त्यांनी प्रथम गांधीजींची भेट घ्यावी व त्यांचे समाधान करावे. गांधीजींची अनुमती घेऊनच नंतर सत्याग्रह करावा अशी अट गांधीजींनी घातली.

या भेटीनंतर कार्यकर्ते हैदराबादला परतले. गांधीजींच्या सांगण्यानुसार स्वामीजी आठवडाभर सेवाग्राम आश्रमातच राहिले. गांधीजी प्रत्येक भेटीत सत्याग्रहाचा नवा अर्थ विशद करून सांगत होते. या सत्याग्रहात सत्याग्रहीच्या जीवननिष्ठेला महत्त्व होते. हा सत्याग्रह केवळ बंदीहुकूम मोडण्यापर्यंत मर्यादित नसून तो आत्मसमर्पणाच्या वृत्तीचे प्रतीक बनला पाहिजे अशी त्यांची भूमिका होती. संबंध देशासाठीच सत्याग्रहाचे एक नवे तंत्र ते विकसित करीत होते. आठवडा संपत आल्यानंतर गांधीजींनी स्वामीजींना हैदराबादला परत जाऊन बंदी हुकुमाचा भंग करण्याची परवानगी दिली. आपण स्टेट काँग्रेसचे सदस्य आहोत अशी घोषणा करणारे सरकारकडे पाठवावयाचे पत्र स्वामीजींना गांधीजींनी तयार करून दिले. नंतर स्वामीजी हैदराबादला परतले. हा सत्याग्रह वैयक्तिक सत्याग्रह या नावाने ओळखला जातो.

हैदराबादला पोहचल्यानंतर स्वामीजींनी पंतप्रधान सर अकबर हैदरी यांना पत्र पाठवून आपण बंदीहुकूम मोडून सत्याग्रह करीत असल्याचे कळवले. याच पत्रात आपण सत्याग्रह करण्यास का प्रवृत्त झालो हे सांगताना या सत्याग्रहाचे स्वरूप विशद केले.

हे पत्र मिळताच ११ सप्टेंबर १९४० रोजी मध्यरात्रीनंतर स्वामीजींना त्यांच्या क्लॉक-टॉवर समोरील घरात गाढ झोपेत असताना उठवून नेऊन अटक करण्यात आली. अंगावरच्या वस्त्रांखेरीज काहीही सामान घेऊ न देता त्यांना बंद वाहनातून अज्ञात स्थळी नेले. इतक्या घाईतही स्वामीजी गीतेची प्रत सोबत घेण्याला विसरले नाहीत. पहाटेपूर्वी स्वामीजींना निजामाबादच्या तुरुंगात दाखल करण्यात आले. परंतु त्यांना कोठे नेले याची कोणालाच कल्पना देण्यात आली नाही.

स्वामीजींना अटक झाल्यानंतर अच्युतभाई देशपांडे, हिरालाल कोटेचा, मोतीलाल मंत्री, देवराम चव्हाण या चौघांना गांधीजींनी वैयक्तिक सत्याग्रह करण्यास अनुमती दिली.

निजामाबाद हे हैदराबादपासून दूर असलेले मराठवाड्याच्या लगतचे जिल्ह्यातील ठिकाण आहे. येथल्या तुरुंगातील एका उंच टेकडीवरच्या खोलीत स्वामीजींना ठेवण्यात आले होते. जेलचे कर्मचारी सोडले तर इतर कैद्यांचा वा मनुष्यमात्रांचा वावर तेथे नव्हता. आजुबाजूच्या वृक्षराईमुळे पक्षी, खारी आणि फुलपाखरे यांची सोबत स्वामीजींना असे. परंतु त्यापेक्षा निकटचा सहवास मुक्तपणे वावरणाऱ्या साप आणि विंचू यांचा होता.

या खेपेचा तुरुंगवास दीर्घकाळचा असेल याची स्वामीजींना कल्पना होती. बाहेरची बातमी कळण्याचा संभव नव्हता. निसर्गाचा सहवास आणि चिंतनासाठी भरपूर मोकळा निवांत वेळ उपलब्ध होता. प्रार्थना आणि ध्यानधारणेला सुरुवात झाली. दररोज एकदा स्वामीजी स्वत: भात शिजवून घेत. अर्धा तास टकळीवर सूत कातत. तुरुंगवासातच त्यांनी गीतेसोबत उपनिषदांचे वाचन केले. त्यांचा बहुतेक वेळ आध्यात्मिक साधनेत व्यतीत होत असे. १९४१ सालची संक्रांत तुरुंगातच उजाडली. १४ जानेवारी १९४१ रोजी स्वामीजींनी आपल्या आठवणींमध्ये नोंद केली; ''मी निर्वैर आहे. अंत:करणातून वैराचा सर्वस्वी लोप झाला आहे... अनासक्त कार्यरत राहण्याची सवय निसर्गभूत झाली आहे. Attachment (आसक्ती) जवळजवळ नष्ट होत चालले आहे. ... जवळजवळ नष्ट होत चालले आहे असे म्हणण्याचे कारण एवढेच की, अद्याप अध्यात्ममार्गात साहाय्य केलेल्या

काही व्यक्तींबद्दल विशेष आपलेपणा वाटतो... पूर्ण अपरिग्रह आहे. ... मृत्यूचे भय यत्किंचितही वाटत नाही."

निजामाबाद तुरुंगातल्या पंधरा महिन्यांच्या वास्तव्यात स्वामीजी पूर्णतः अध्यात्मरत झाले होते.

३ डिसेंबर १९४१ रोजी खालसा मुलखातील वैयक्तिक सत्याग्रहात भाग घेतलेल्या सर्व सत्याग्रह्यांना सोडून देण्यात येत असल्याचे भारत सरकारने जाहीर केले. पाठोपाठ हैदराबादेतील वैयक्तिक सत्याग्रह्यांना सोडण्याचा निर्णय झाला. १६ डिसेंबर १९४१ रोजी स्वामीजी आणि अन्य चार सत्याग्रहींची सुटका करण्यात आली.

१९४० च्या सुमारास देशातील राजकीय परिस्थितीमध्ये वेगाने बदल होत होते. १९३९ मध्ये दुसरे महायुद्ध सुरू झाले. भारतात कॉंग्रेस, समाजवादी आणि कम्युनिस्ट पक्षातील लोकांच्या दृष्टीने हे युद्ध साम्राज्यवादी होते. या भूमिकेतून युद्ध-प्रयत्नांना कम्युनिस्ट, समाजवाद्यांनी विरोध करण्याला सुरूवात केली. म्हणून ब्रिटिश सरकारने या पक्षाच्या नेत्यांना अटक करण्याला प्रारंभ केला. ब्रिटिशांच्या या राजकीय भूमिकेचा फायदा घेऊन हैदराबाद संस्थानात निजाम सरकारने डिसेंबर १९४० मध्ये स्वामीजींचे निकटवर्ती स्टेट कॉंग्रेसचे कार्यकर्ते गोविंददास श्रॉफ, स. कृ. वैशंपायन, आ. कृ. वाघमारे, डी. एल. पाठक, रतिलाल जरीवाला, सय्यद हबीबुद्दीन इ. कार्यकर्त्यांना कम्युनिस्ट असल्याच्या वहिमावरून तुरुंगात टाकले. स्वामीजींच्या या निष्ठावंत सहकाऱ्यांच्या अटकेमुळे स्टेट कॉंग्रेसच्या चळवळीमध्ये शिथिलता येण्याची शक्यता निर्माण झाली.

१९४१ मध्ये हैदराबादच्या पंतप्रधानपदी सर अकबर हैदरी यांच्याजागी उत्तर प्रदेशातील एक नबाब अहमद सईद ऊर्फ सत्तारीचे नबाब यांची नेमणूक झाली. याच वर्षी जालना येथे मजलीसचे अधिवेशन झाले. या अधिवेशनाला दहा हजार सशस्त्र मुस्लिम स्वयंसेवक हजर होते. या अधिवेशनात दत्तेहादुलचे अध्यक्ष बहादुरयार जंग, पुढे चालून रझाकार संघटनेचे नेते झालेले कासीम रझवी यांची भाषणे झाली. दत्तेहादुलच्या वाढत्या कारवायांमुळे संस्थानातील धार्मिक, सामाजिक वातावरण दिवसेंदिवस तणावपूर्ण होत होते.

संस्थानामध्ये राजकीय संघटना स्थापन करण्याला सरकारने अद्याप परवानगी दिलेली नव्हती. वैयक्तिक सत्याग्रह संपला होता. परंतु अद्याप नव्या आंदोलनाची हाक गांधीजींनी दिलेली नव्हती. अशा परिस्थितीत पुढे कोणती पावले उचलावीत

याबद्दल गांधीजींचे मार्गदर्शन घ्यावे असे स्वामीजींना वाटणे स्वाभाविक होते. वैयक्तिक सत्याग्रहाबद्दल झालेल्या तुरुंगवासातून सुटका होताच स्वामीजींनी वर्धा येथे सेवाग्रामात जाऊन गांधीजींची भेट घेतली. संस्थानातील परिस्थितीची माहिती गांधीजींना सांगितली. आणि संस्थानातील चळवळीच्या पुढील कार्यक्रमांबद्दल गांधीजींचे मार्गदर्शन मागितले. त्यावर गांधीजींनी असा ,सल्ला दिला की, काँग्रेसवरील बंदी उठवण्याबाबत संस्थानात तूर्त सत्याग्रह करू नये. इतर कार्यकर्त्यांनी महाराष्ट्र परिषदेसारख्या प्रांतिक संघटनांमधून काम करीत राहावे.या वेळेस गांधीजींनी असाही सल्ला दिला की, स्वामीजींनी कुठल्याही प्रांतिक परिषदेमध्ये एखादे पद स्वीकारू नये. हा सल्ला देण्यामागे गांधीजींचा विशिष्ट दृष्टिकोन होता. तो असा की, स्वामीजींनी स्वत:च्या कार्याला एखाद्या प्रांतिक परिषदेपुरते सीमित न करता महाराष्ट्र, कर्नाटक, आंन्ध्र प्रदेशातील जनतेला स्टेट काँग्रेसच्या चळवळीत संघटित करावे व लोकशाहीच्या प्रस्थापनेसाठी व्यापक लढा उभा करावा व त्या लढ्याचे नेतृत्व करावे. याच वेळेस स्वामीजींनी आपण पुन्हा सत्याग्रह का करीत नाही ते स्पष्ट करणारे एक निवेदन तयार केले. या निवेदनात काही दुरुस्त्या करून गांधीजींनी ते निवेदन आपल्या संपादनाखाली निघणाऱ्या 'हरिजन' मधून प्रसिद्ध केले.

वर्ध्याहून गांधीजींचा निरोप घेऊन स्वामीजी परतले. वर्तमानपत्रातील एका बातमीवरून स्वामीजींना बीदर जिल्ह्यातील औराद शहाजनी येथे भीषण दंगल झाल्याचे समजले. ११ जून १९४२ रोजी स्वामीजींनी दंगलग्रस्त भागाला भेट दिली. भर बाजार पेठेतील दुकाने जाळून टाकण्यात आली होती. औरादला स्वामीजींच्या असे निदर्शनास आले की, पोलिसांनी या दंगलीचा तपास पक्षपातीपणाने केला आहे. शिवाय दंगलखोरांविरुद्ध कठोर उपाययोजनाही करण्यात आलेली नाही. औरादहून हैदराबादला पोहचल्यानंतर स्वामीजींनी पोलिसांच्या पक्षपाती भूमिकेचा धिक्कार करणारे एक पत्रक प्रसिद्ध केले. या दंगलीबद्दलचा अहवाल तयार करून गांधीजींकडे आणि प्रजा परिषदेच्या कार्यालयाकडे पाठवून दिला.

मे महिन्यात स्वामीजी सेवाग्रामला गांधीजींकडे गेले. सेवाग्रामला स्वामीजींचा दहा दिवस मुक्काम होता. हे दहा दिवस स्वामीजींच्या दृष्टीने अविस्मरणीय ठरले. गांधीजींबरोबर दररोज सकाळी फिरायला जात असताना अनेक विषयांवर चर्चा होत. देशात ब्रिटिश साम्राज्यशाहीविरुद्ध जनमत हळूहळू उग्र स्वरूप धारण करू लागले होते. राजकीय परिस्थितीमध्ये वेगाने स्थित्यंतरे होऊ लागली होती. या

परिस्थितीबद्दल चर्चा करण्यासाठी अनेक मोठमोठे नेते गांधीजींकडे येत. स्वामीजी सेवाग्रामला असतानाच काँग्रेस कार्यकारिणीचे काही सदस्य गांधीजींच्या भेटीसाठी आले होते. त्या वेळेस गांधीजींच्या सूचनेवरून स्वामीजींनी या सदस्यांना हैदराबाद प्रश्नांबद्दल माहिती दिली. गांधीजींनी स्वामीजींना असे सांगितले की, मुंबई येथे होणाऱ्या अ. भा. काँग्रेस महासमितीच्या अधिवेशनाला संस्थानातील आपल्या सहकाऱ्यांसह उपस्थित राहावे. मुंबई अधिवेशनाला उपस्थित राहण्याचे ठरवून स्वामीजी हैदराबादला परतले.

७ ऑगस्ट रोजी अ. भा. काँग्रेस महासमितीच्या अधिवेशनासोबतच अ. भा. संस्थानी प्रजा परिषदेच्या स्थायी समितीची बैठक झाली. या बैठकीत गांधीजी आणि नेहरू यांनी आपल्या भाषणांतून देशाचे भवितव्य ठरवणारा अंतिम लढा आता होणार असून संस्थानातील जनतेने सर्वशक्तिनिशी या लढ्यात उतरावे असे आवाहन केले. हैदराबाद संस्थानातील जनता आतापर्यंत जबाबदार राज्यपध्दतीच्या मागणीपुरता मर्यादित असा लढा देत होती. आता भारतातील जनतेसोबत संस्थानातील जनता खांद्यास खांदा लावून भारताच्या स्वातंत्र्यासाठी लढा देणार होती. संस्थानी जनतेच्या लढ्याचे उद्दिष्ट आता जबाबदार राज्यपद्धतीऐवजी संपूर्ण भारताचे स्वातंत्र्य हे झाले होते. स्वामीजी आणि त्यांचे सहकारी यांच्या दृष्टीने ही आनंदाची बाब होती.

गोवालिया टँकवर दुसऱ्या दिवशी काँग्रेसचे अधिवेशन झाले. या प्रसंगी दिलेल्या भाषणात गांधीजी म्हणाले ''मी तुम्हाला एक लहान मंत्र देतो. तो तुम्ही तुमच्या हृदयावर कोरून घ्या. तो मंत्र आहे: 'करा किंवा मरा'. आम्ही एक तर भारत स्वतंत्र करू किंवा त्या प्रयत्नात मरून जाऊ.'' मंडपातील हजारोंचा जनसमुदाय गांधीजींचा प्रत्येक शब्द अत्यंत लक्षपूर्वक ऐकत होता. त्या क्षणांचे स्वामीजीही साक्षीदार होते. त्यांच्या मनाला एक प्रश्न सतत छळत होता. तो हा की, गांधीजींच्या आदेशाप्रमाणे संस्थानात व्यापक चळवळ उभी राहील का? त्याला कारणही तसेच होते. स्वामीजींना तुरुंगातून सुटल्याला केवळ आठ दहा महिने झाले होते. चळवळीत सर्वस्व झोकून देणारे स्वामीजींचे आ. कृ. वाघमारे, गोविंददास श्रॉफ यांच्यासारखे निष्ठावंत सहकारी अद्याप तुरुंगातच होते. अधिवेशनास आलेल्या संस्थानातील कार्यकर्त्यांपैकी दिगंबरराव बिंदूंचा अपवाद वगळला तर अन्य कार्यकर्ते चळवळीत प्रत्यक्षपणे सहभागी होणाऱ्यांपैकी नव्हते. परंतु स्वामीजींच्या मनातील शंकेचे निरसन अधिवेशनातील गांधीजींच्या रात्रीच्या

भाषणातून झाले. गांधीजी आपल्या भाषणात म्हणाले की, एखाद्या भागात अगदी दोन तीन कार्यकर्त्यांची चळवळीत उतरण्याची इच्छा असेल तर तितक्या बळावर त्यांनी चळवळ उभी करण्यास हरकत नाही. अधिवेशनाचे कामकाज ८ तारखेस मध्यरात्री उशीरापर्यंत चालले होते. ९ ऑगस्टला पहाटेच गांधीजी आणि अन्य कार्यकर्त्यांना अटक करण्यात आली. या अधिवेशनामुळे संपूर्ण देशात चैतन्याचे वातावरण निर्माण झाले. सामान्य माणूस पेटून उठला.

९ तारखेस प्रजा परिषदेचे महत्त्वाचे कार्यकर्ते मुंबईच्या फोर्ट भागात भेटले. प्रजापरिषदेचे चिटणीस बलवंतराय मेहता यांच्या उपस्थितीत देशातील संस्थानिकांना संस्थानातील संघटनांच्या वतीने पाठवावयाच्या पत्राचा मजकूर तयार करण्यात आला. हा मजकूर घेऊन सर्व कार्यकर्ते आपापल्या संस्थानात परतले. ब्रिटिशांनी काँग्रेस कार्यकर्त्यांना अटक केल्यामुळे संस्थानामध्येही चळवळ उभी करू पाहणाऱ्या काँग्रेस कार्यकर्त्यांची धरपकड होण्याची शक्यता होती. त्यामुळे सर्व कार्यकर्त्यांनी आपल्याला अटक होण्यापूर्वीच आपल्या संस्थानिकांना पत्रे पोहचवण्याचा प्रयत्न करावा असे ठरले.

स्वामीजी मुंबईहून ९ तारखेच्या रात्रीच सोलापूरला पोहचले. निजामाला पाठवावयाचे पत्र तयार केले. त्याच्या काही प्रती तयार करून आपले सहकारी राघवेन्द्रराव दिवाण यांना त्या प्रती सोबत देऊन हैदराबादला पाठवले. दिवाणांनी पत्राच्या प्रती हैदराबादेतील प्रमुख कार्यकर्त्यांना द्याव्यात आणि त्या कार्यकर्त्यांनी त्या पत्रांवर सह्या करून ती पत्रे निजामाला पाठवावीत असा निरोप दिला. राघवेन्द्रराव हैदराबादहून सोलापूरला परतल्यावर स्वामीजींना राघवेन्द्ररावांकडून अशी माहिती कळाली की, हैदराबादेतील कार्यकर्ते काहीतरी सबबी पुढे करून निजामाला पत्र पाठवण्याची टाळाटाळ करीत आहेत. लगेच स्वामीजी अन्य तिघा सहकाऱ्यांसह सोलापूरहून हैदराबादकडे निघाले. प्रत्येकाकडे स्वामीजींनी निजामाला पाठवलेल्या पत्राची प्रत होती. स्वामीजींना अटक झाली तर अन्य अटक न झालेल्या कार्यकर्त्यांनी ती पत्रे निजामाला पोहचवावीत असे ठरले. स्वामीजींना हैदराबाद येथे नामपल्ली स्टेशनवर उतरताच पोलिसांनी अटक केली. स्वामीजींसोबतच्या तिघा कार्यकर्त्यांची नावे पोलिसांच्या यादीत नव्हती. त्यामुळे त्या तिघांना अटक झाली नाही.

स्वामीजींनी हैदराबादला ज्या कार्यकर्त्यांकडे निजामाला पाठवावयाच्या पत्राच्या प्रती पाठवल्या त्यापैकी बहुतेकांनी ती पत्रे निजामाला पाठवण्याची

टाळाटाळ केली असली तरी स्वामीजींचे निष्ठावंत सहकारी डॉ. जी. एस. मेलकोटे यांनी सही करून ते पत्र निजामाला पाठवले. या पत्रासोबत डॉ. मेलकोटे यांनी टीपही जोडली. निजामाला मेलकोटे यांनी पाठवलेल्या पत्राचा मजकूर पुढीलप्रमाणे होता.

''हैदराबाद स्टेट काँग्रेसच्या वतीने मी हे पत्र आपणांस सादर करू इच्छितो. संस्थानी प्रजाजनांची, वर्ण-जात-पंथनिरपेक्ष अशी सेवा करण्याच्या ध्येयाने बद्ध झालेली स्टेट काँग्रेस ही एक राष्ट्रीय संस्था आहे. आपण या पत्राचा शांतपणे, काळजीपूर्वक व सहानुभूतीपूर्वक विचार करावा अशी अत्यंत नम्रपणे मी विनंती करू इच्छितो.

हैदराबाद सरकारने, का कुणास ठाऊक, संस्थानात नागरी स्वातंत्र्याची गळचेपी केली व काही काळापूर्वी स्टेट काँग्रेस ही संस्था बेकायदेशीर आहे असे जाहीर केले. त्यामुळे नैसर्गिक सार्वजनिक जीवनाच्या निकोप व सुसंगत विकासावर विघातक असा परिणाम झाला. स्टेट काँग्रेसविरुद्ध असलेले आक्षेप सिद्धही झाले नाहीत किंवा मान्य झाले नाहीत. स्टेट काँग्रेसने आपल्यावरील बंदीहुकूम अमान्य करून, त्या संस्थेला चिरडून टाकण्याच्या प्रयत्नावर मात करून अस्तित्व टिकविले आहे. अस्तित्व टिकविण्याच्या दिव्यातून जाताना पुष्कळ जण सोडून गेले. त्यामुळे या पत्राची किंवा काँग्रेसकडून यापुढे होणाऱ्या कृतीची जबाबदारी जुन्या सदस्यांवर पडत नाही ही गोष्ट नमूद केली पाहिजे.

माननीय निजामाच्या छत्राखाली संपूर्ण जबाबदार राज्यपद्धतीची मागणी व नागरी स्वातंत्र्याचे रक्षण या दोन गोष्टींवर कुठल्याही बिकट परिस्थितीत सुद्धा आम्ही भर दिला, एवढेच नव्हे तर स्टेट काँग्रेसच्या कार्यक्रमात त्या गोष्टीना अग्रस्थान देण्यात आले आहे. त्यामुळे आता त्याचा वरचेवर उल्लेख करण्याची आवश्यकता नाही.

भारताचे प्रादेशिक व राजकीय ऐक्य अबाधित राखण्यावर स्टेट काँग्रेसचा भर आहे. आपला साम्राज्यवाद टिकवण्यासाठी ब्रिटनने जरी हिंदुस्थानात विविध राज्यप्रणाली निर्माण केल्या व टिकवल्या असल्या तरी एकाच राज्यपद्धतीखाली सर्व भाग आणून हिंदुस्थानचा समान विकास होणेच भारताला हितावह आहे, असे स्टेट काँग्रेस मानते. तसेच भारतातील प्रांतांतील सरकारांनी व संस्थानांतील सरकारांनी स्वतंत्र भारताच्या संघराज्याशी एकनिष्ठ राहिले पाहिजे असे स्टेट काँग्रेस मानते.

आंतरराष्ट्रीय क्षेत्रातील पेचप्रसंगाने हेच सिद्ध झाले आहे की, भारताच्या निरनिराळ्या भागांच्या संरक्षणाकरिता व विकासाकरिता भारताचे ऐक्य व अखंडत्व टिकविणे नितान्त आवश्यक आहे. सध्या देशापुढे निर्माण झालेल्या गंभीर समस्यांना तोंड देण्यासाठी देशात असलेल्या अर्थोत्पादनाच्या सर्व साधनांचा पूर्णपणे उपयोग करून घेणे अपरिहार्य बनले आहे.

सध्या अस्तित्वात असलेले बेजबाबदार एकसत्ताक मध्ययुगीन सरकार सर्व मानवी अथवा भौतिक साधनांचा आपल्या देशाच्या संरक्षणासाठी उपयोग करू शकत नाही, हे सरकार जाऊन त्या सरकारच्या जागी लोकशाही प्रातिनिधिक सरकार अस्तित्वात यायला हवे. या सर्व गोष्टींचा व हितांचा काळजीपूर्वक विचार करून स्टेट कॉंग्रेस या निर्णयाला आली आहे की, स्टेट कॉंग्रेसने घेतलेली भूमिका ही अगदी संयुक्तिक, अखंडनीय अशी आहे, म्हणून स्टेट कॉंग्रेस पुढील मागण्या आग्रहाने मांडू इच्छिते:

१. माननीय निझामाच्या छत्राखाली लगेच संपूर्ण जबाबदार राज्यपद्धती प्रदान करणे व त्याचबरोबर स्वतंत्र भारताच्या संघराज्यात दाखल होण्यास तयार असल्याची घोषणा करणे.
२. संपूर्ण नागरी स्वातंत्र्य देऊन हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसवरील बंदी उठविणे.
३. सर्व राजकीय बंद्यांची मुक्तता करणे.

अगदी शांततेने हाताळले जाण्यासारखे हे प्रश्न असताही कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांना नुकतीच घिसडघाईने विनाकारण अटक करून, (ते) गुंतागुंतीचे करून टाकण्यात आलेले आहेत ही खरोखर मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे. स्टेट कॉंग्रेसचे अध्यक्ष स्वामी रामानंद तीर्थ यांना काल रेल्वे-प्लॅटफॉर्मवर गाडीतून उतरत असतानाच अटक केल्याने परिस्थिती अधिक चिघळली. स्वामी रामानंद या मागण्या आपणांस सादर करण्यासाठी आपणाकडेच जाणार होते. असो, वरील मागण्या मान्य करून हा प्रश्न शांततेने निकालात काढावा असे स्टेट कॉंग्रेस अत्यंत नम्रतापूर्वक निवेदन करू इच्छिते.

''आपल्या राष्ट्राच्या इतिहासातील अत्यंत आणीबाणीच्या प्रसंगी सरकार शहाणपणाने व दूरदृष्टीने वागेल असा स्टेट कॉंग्रेसला मनोमन विश्वास वाटतो.''

डॉ. मेलकोटे यांचे पत्र सरकारला पोंहचताच स्वामीजींच्या पाठोपाठ डॉ. मेलकोटे यांनाही अटक करण्यात आली. स्वामीजी आणि मेलकोटे दोघांनाही चंचलगुडा जेलमध्ये ठेवण्यात आले. संस्थानात स्टेट कॉंग्रेसच्या अनेक

कार्यकर्त्यांना अटक करण्यात आली.

सर्व महत्त्वाचे नेते तुरुंगात गेले. संस्थानातील चळवळीला त्राता राहिला नाही. चळवळीला निर्नायकी अवस्था प्राप्त झाली.

-शीड नसलेल्या नावेसारखी चळवळीची स्थिती झाली.



# यशाचे पहिले शिखर

१९४२ च्या लढ्याचा जोर ओसरत चालला होता. संस्थानातील चळवळीला वैचारिक बैठक आणि नेतृत्व देणारी नेते मंडळी तुरुंगातच होती. स्टेट कॉंग्रेसवरची बंदी कायम होती. अशात २४ ऑक्टोबर १९४२ रोजी गोविंददास वगैरेची तुरुंगातून मुक्तता झाली. ४ नोव्हेंबर १९४२ रोजी हैदराबादेत रामाचारींच्या बंगल्यावर प्राप्त परिस्थितीत पुन्हा जोमाने चळवळ कशी उभी करता येईल यावर विचारविनिमय करण्यासाठी एक बैठक झाली. या बैठकीस कर्नाटक, आंध्र आणि मराठवाडा भागातून ३६ कार्यकर्ते हजर होते. या बैठकीत गोविंददासांनी 'आझाद हैदराबाद'ची जी कल्पना इत्तेहादुल मुसलमीन आणि कॉंग्रेसमधील मवाळांकडून मांडली जात होती तिचा धिक्कार केला व स्वतंत्र भारताचा हैदराबाद हा अविभाज्य भाग असला पाहिजे या स्टेट कॉंग्रेसच्या भूमिकेचा ठामपणे पुनरुच्चार करून जबाबदार राज्यपद्धतीचा लढा सुरू राहील असे सांगितले.

१९४३ च्या डिसेंबर महिन्यात स्वामीजींची चंचलगुडा तुरुंगातून सुटका करण्यात आली. पाठोपाठ स्थानबद्ध असलेल्या इतर नेत्यांचीही सुटका झाली १९४४च्या जानेवारी महिन्यात हैदराबाद येथे स्वामीजींच्या निवासस्थानी प्रमुख कार्यकर्त्यांची बैठक झाली. या बैठकीत हैदराबाद स्टेट कॉंग्रेसवरील बंदी उठविण्यासाठी उचलावयाची पावले, आंध्र, महाराष्ट्र, कर्नाटक प्रांतात काम करणाऱ्या प्रांतिक परिषदांचे एकत्रीकरण इ. विषयावर चर्चा झाली.

प्रांतिक परिषदांमधून होणारे ठराव व मागण्या हळूहळू निर्भयतेकडे आणि लोकशाहीच्या दिशेने कशा वाटचाल करीत होत्या ते काळजीपूर्वक पाहण्यासारखे

आहे. औरंगाबाद येथे महाराष्ट्र परिषदेचे अधिवेशन १९४३ च्या मे महिन्यात श्रीधर वामनराव नाईक यांच्या अध्यक्षतेखाली झाले. या अधिवेशनात जबाबदार राज्यपद्धतीचा ठराव करण्यात आला. त्यात 'निजामाच्या छायाछत्राखालील जबाबदार राज्य पद्धती' असा उल्लेख आढळत नाही. छायाछत्र व आसफिया घराण्याचे जे लोढणे लोकशाहीच्या गळ्यात अडकलेले होते ते या वेळी अलगद झुगारण्यात आल्याचे दिसते. खरे तर लोक स्टेट काँग्रेसवरची बंदी उठेपर्यंत वाट पाहण्याइतपत सोशिक राहिले नव्हते. अशी वाट न पाहता आंध्र, महाराष्ट्र, कर्नाटक भागातल्या प्रांतिक परिषदा लोकांनी कार्यक्षम करण्यास प्रारंभ केला. जबाबदार राज्यपद्धतीची आणि नागरिक स्वातंत्र्याची या परिषदा उघड उघड मागणी करू लागल्या. महाराष्ट्र परिषदेने तर उघडउघड जबाबदार राज्य पद्धती हे आपले ध्येय जाहीर केले. पाठोपाठ आंध्र, कर्नाटक प्रांतिक परिषदांनी असे ठराव केले. या तीनही प्रांतिक परिषदा एकत्र आणण्याचे प्रयत्न १९४२ पासून होत होते. या दृष्टीने २३ जून १९४४ रोजी हैदराबाद येथे तीनही परिषदांच्या कार्यकारिणीची बैठक होऊन संयुक्त समन्वय समिती नेमण्यात आली. जुलै १९४६ पर्यंत या तीनही प्रांतिक परिषदांनी आपापले विसर्जन करून स्टेट काँग्रेसमध्ये विलीन होण्याचा निर्णय घेतला. नागरिक स्वातंत्र्याची आणि जबाबदार राज्यपद्धतीची मागणी आता एकमुखाने केली जाऊ लागली. या परिषदा स्टेट काँग्रेसचेच कार्य करू लागल्या होत्या. या परिषदांवर बंदी घालण्याची सरकारची इच्छा असली तरी तसे पाऊल सरकारला उचलता येऊ नये असे वातावरण देशात निर्माण होत होते.

दुसरे महायुद्ध संपून दोस्त राष्ट्र विजयी झाले होते. क्रिप्स मिशन भारताला आणि हैदराबाद संस्थानला भेटी देऊन परतल्यानंतर स्टॅफर्ड क्रिप्स यांनी २९ एप्रिल १९४२ रोजी संसदेत एक भाषण केले. या भाषणात त्यांनी ब्रिटिश प्रशासनाने संस्थानांमध्ये प्रातिनिधिक संस्था विकसित करण्याचे प्रयत्न करावेत अशी सूचना केली. या सूचनेमुळे निजाम सरकारचे धाबे दणाणले. १९४५ मध्ये अ. भा. प्रजा परिषदेचे अधिवेशन उदयपूरला भरले. आपल्या अध्यक्षीय भाषणात पं. नेहरूंनी 'केवळ आकार मानानेच नव्हे तर नागरिक स्वातंत्र्याची गळचेपी करण्यात अग्रेसर' अशा शब्दांत हैदराबाद संस्थानची संभावना करून संस्थानात स्टेट काँग्रेसवर घालण्यात आलेल्या बंदीवर कडक शब्दांत टीकेची झोड उठवली. अशा घटनांमुळे निजाम सरकारवरची दडपणे दिवसेंदिवस वाढत होती. शेवटी सरकारने हैदराबाद संस्थानात अ. भा. काँग्रेस समिती आणि तिच्या शाखा

यांच्यावरील बंदी १५ नोव्हेंबर १९४५ रोजी उठवली. मात्र स्टेट काँग्रेसवरील बंदी कायम ठेवली. १९४६च्या जून महिन्यात दिल्ली येथे संस्थानी प्रजा परिषदेच्या स्थायी समितीची बैठक झाली. या बैठकीस स्वामीजी आणि तीनही प्रांतिक परिषदांचे प्रतिनिधी मोठ्या प्रमाणात हजर होते. या बैठकीत संस्थानात स्टेट काँग्रेसचे कार्य करण्याचा व पूर्ण नागरी हक्क प्रस्थापित करण्याचा नागरिकांना हक्क राहील असा ठराव करण्यात आला. निजाम सरकारला रेसिडेंटपासून पं. नेहरूंपर्यंत सर्वच जण स्टेट काँग्रेसवरील बंदी उठवण्याबाबत सल्ला देत होते. सरते शेवटी ३ जुलै १९४६ रोजी हैदराबाद स्टेट काँग्रेसवरील बंदी उठवण्यात आली.

स्वामीजींच्या नेतृत्वाखालील लढ्याने यशाचे एक शिखर काबीज केले होते!

स्टेट काँग्रेसवरील बंदी उठल्यानंतर १९ जुलै १९४६ रोजी कंदास्वामी बागेच्या पटांगणात हैदराबाद स्टेट काँग्रेसतर्फे पहिली जाहीर सभा झाली. या सभेच्या अध्यक्षीय भाषणात स्वामीजींनी लोकशाहीविरोधी सुधारणा अंमलात आणून सरकार जर हुकूमशाही कायम ठेवू इच्छित असेल तर ती नष्ट होईपर्यंत स्टेट काँग्रेस लढा देईल असा इशारा सरकारला दिला.

बंदी उठल्यानंतर स्वामीजींना दोन-तीन महत्त्वाची कामे हातावेगळी करणे आवश्यक होते. स्टेट काँग्रेसची रीतसर रचना करून स्टेट काँग्रेसमध्ये प्रांतिक परिषदांना सामावून घेणे आवश्यक होते. महाराष्ट्र आणि कर्नाटक प्रांतिक परिषदांना स्टेट काँग्रेसमध्ये सामील करण्यात फारशा अडचणी नव्हत्या. पण आंध्र प्रांतिक परिषदेचे सामीलीकरण अवघड झाले होते. तिन्ही प्रांतिक परिषदांमध्ये लोकजागृतीचे कार्य करणारे कार्यकर्ते विविध मतच्छटा असणारे होते. आंध्र महासभेत कम्युनिस्ट विचारसरणी असणारे परंतु स्वतःला राजकीय पक्षाचे अधिकृत कार्यकर्ते न म्हणवणारे कार्यकर्ते काँग्रेसजनांप्रमाणेच काम करीत होते. स्टेट काँग्रेसच्या स्थापनेसाठी १९३८ मध्ये सत्याग्रह करणारे रविनारायण रेड्डी आंध्रमहासभेच्या कार्यात अग्रेसर होते. रविनारायण रेड्डी आणि दुसरे नेते बद्दम यल्ला रेड्डी यांनी पूर्वीच्या नेमस्त नेतृत्वाला हटवून आंध्र महासभेत आपले वर्चस्व प्रस्थापित केले. हा गट राष्ट्रवादी विचाराचा, पुरोगामी विचारसरणी असलेला होता. या गटात जमलापूर केशवराव, कोदाटी नारायणराव, कोमरगिरी नारायणराव, हयग्रीवाचार्य, माडपाटी रामचंद्रराव, पी. व्ही. नरसिंहराव, के. व्ही. नरसिंहराव इ.

मंडळी होती. हे कार्यकर्ते स्वामीजींचे नेतृत्व मानणारे होते. तेलंगणच्या शेतकऱ्यांचे प्रश्न सोडविण्यासाठी सर्वशक्तिनिशी झटणारे कार्यकर्ते अशी या कम्युनिस्टांची ओळख आंध्र महासभेतील कार्यातून जनतेला झाली. आंध्र महासभेतील मवाळ नेते एम. नरसिंहराव यांनी वेगळी राष्ट्रीय आंध्र महासभा स्थापन केली. अशा रीतीने १९४४ मध्ये आंध्र महासभेची दोन शकले झाली. स्वामीजींना या दोन गटांत समझोता घडवून त्या दोघांचेही स्टेट कॉंग्रेसमध्ये विलीनीकरण करावयाचे होते. १९४२ च्या लढ्यात अ. भा. कॉंग्रेस समितीचे कम्युनिस्ट सदस्य चळवळीत सामील न होता स्वातंत्र्यलढ्याला विरोध करीत होते. त्यांच्या या कृत्याबद्दल त्यांना अ. भा. कॉंग्रेसमधून काढून टाकण्यात आले. आणि कनिष्ठ समित्यांना कॉंग्रेसमधील कम्युनिस्ट सदस्यांविरुद्ध अशीच कारवाई करण्याची सूचना केली गेली. हैदराबाद संस्थानातील स्टेट कॉंग्रेसमधील मवाळांनी कॉंग्रेसच्या या भूमिकेचा फायदा घेऊन कॉंग्रेसमधील कम्युनिस्टांना काढून टाकण्याची मागणी केली. असे झाले तर आंध्रात स्वामीजींचे जे नेतृत्व प्रस्थापित होत होते त्याला आपोआपच खीळ बसणार होती. आंध्र महासभेतील कम्युनिस्ट कार्यकर्त्यांनी नलगोंडा जिल्ह्यातील सूर्यपेठ तालुक्यातील शेतकऱ्यांना संघटित केले होते. या शेतकऱ्यांनी अधिकाऱ्यांच्या दडपशाहीचा कसून विरोध केला. निजाम सरकारने या भागातील बंडखोरांचा बंदोबस्त करण्यासाठी सशस्त्र सैन्य पाठवले. कम्युनिस्टांनी या भागातील शेतकऱ्यांना सैन्याचा मुकाबला लाठ्याकाठ्या, दगडधोंड्यांनी करण्यास सांगितले. शेतकऱ्यांच्या सशस्त्र प्रतिकाराचा बिमोड करताना सैनिकांनी शेतकऱ्यांवर अत्याचार केले. खेडुतांना ठार मारण्यात आले. स्वामीजींनी सूर्यपेठ भागाला भेट दिली. खेडुतांना हिंसेच्या मार्गावरून परावृत्त करण्याचे प्रयत्न केले. पीडितांचे अश्रू पुसले. हैदराबादला परत आल्यानंतर स्वामीजींनी एक निवेदन प्रसिद्ध केले. या निवेदनात सैन्याच्या बळाच्या अतिरेकी वापराचा निषेध करून त्या भागातून सैन्य काढून घेण्याची मागणी करण्यात आली होती. तसेच कम्युनिस्टांनी लोकांच्या मनात भरवून दिलेला हिंसात्मक कृतीचा विचार कसा चुकीचा होता हे स्पष्ट केले होते.

स्वामीजींच्या या निवेदनाचा आधार घेऊन कॉंग्रेसमधील मवाळांनी स्वामीजी हे कम्युनिस्टांचे सहप्रवासी आहेत आणि स्वामीजींचे सहकारी गोविंदभाई श्रॉफ यांचे नेतृत्व मानणारा गट हा कम्युनिस्ट आहे असा प्रचार करण्यास सुरुवात केली. या मुद्द्यावरील संघर्षाला काशीनाथराव वैद्य यांच्या पत्रकामुळे प्रथम जाहीर तोंड फुटले. नलगोंडा जिल्ह्यातील कम्युनिस्टांच्या हिंसेचा निषेध करू नये असे महाराष्ट्र

परिषदेच्या काही कार्यकर्त्यांचे मत असल्याची चर्चा स्वामीजींच्या उपस्थितीत झाली आहे असे नमूद करणारे हे पत्रक वैद्यांनी स्थायी समितीच्या सर्व सदस्यांना पाठवले. स्वामीजींच्या नेतृत्वाविरुद्ध मवाळांनी सुरू केलेल्या लढ्याचे हे पहिले पाऊल होते.

या परिस्थितीबद्दल मार्गदर्शन घेण्यासाठी स्वामीजी गांधीजींना भेटले आणि कम्युनिस्टांना संघटनेबाहेर काढण्याची जी मागणी मवाळांकडून केली जात होती त्याबद्दल सल्ला विचारला. गांधीजींना केवळ कार्यकर्ते कम्युनिस्ट आहेत म्हणून त्यांना संघटनेबाहेर काढले जावे हे मान्य नव्हते. परंतु हे कार्यकर्ते संघटनेचे आदेश मानत नसतील तर अशा कार्यकर्त्यांना काढण्यास संमती होती. या चर्चेचा गोषवारा टंकलिखित करण्यात आला होता. तो कम्युनिस्टांच्या हाती लागला. तो कम्युनिस्ट नेते पी. सी. जोशी यांच्या पुस्तकात प्रसिद्ध झाला. मवाळांनी हा गोषवारा स्वामीजीनीच कम्युनिस्टांना उपलब्ध करून दिला असा आरोप केला. कारण ही घटना स्वामीजींना कम्युनिस्टधार्जिणे ठरवण्यास पुरावा म्हणून उपयुक्त ठरणारी होती. या प्रकारामुळे स्वामीजी फार व्यथित झाले. त्यांनी आपली व्यथा व्यक्त करणारे पत्र गांधीजींना पाठवले. त्यांच्या पत्राला गांधीजींनी उत्तर पाठवून स्वामीजींची समजूत काढली व अभय दिले. त्या पत्रातील प्रत्येक शब्दाशब्दातून स्वामीजींवरील निश्चल विश्वास, प्रेम व लोभ व्यक्त होत होता.

स्टेट काँग्रेसची संघटना एकीकडे मवाळांच्या कारवाया तर दुसरीकडे संस्थानी सरकार जे नानाविध अडचणी उभ्या करीत होते त्यांना तोंड देत देत बळकट करणे हे स्वामीजींपुढचे आव्हान होते. जून १९४७ पर्यंत सभासद नोंदणी झाली. अपेक्षेपेक्षा कितीतरी जास्त लोकांनी स्टेट काँग्रेसचे सभासदत्व स्वीकारले. स्टेट काँग्रेसच्या अध्यक्षपदाची निवड करण्याची वेळ आली. मवाळांनी बी. रामकृष्णराव यांना स्वामीजींच्याविरुद्ध उभे केले. हैदराबाद स्टेट काँग्रेसच्या बैठकीत अध्यक्ष म्हणून अत्यंत चुरशीच्या निवडणुकीत स्वामीजी २५३ मतांनी निवडून आले. आणि १६, १७ व १८ जून १९४७ रोजी स्टेट काँग्रेसचे पहिले अधिवेशन झाले. हैदराबादच्या चिकडपल्ली भागातील मैदानावर हे अधिवेशन झाले. लोकांच्या उत्साहाला सीमा नव्हती. सर्व वातावरण चैतन्यमय होते. तीस-पस्तीस हजार लोकांनी मंडप गच्च भरलेला होता. संस्थानात नेहमी असणाऱ्या दहशतीच्या भीतीचा लवलेशही लोकांच्या चेहऱ्यावर दिसत नव्हता. शंकरराव देव, सुचेता कृपलानी, एम. जी. रंगा, एस. निजलिंगप्पा आदी नामवंत मंडळी उपस्थित होती. अधिवेशनाचे इतके भव्य स्वरूप सरकारला सुखावह वाटण्याचा तीळमात्र संभव

नव्हता. सरकारकडून काहीतरी खुसपट काढले जाणार हे अपेक्षितच होते. अधिवेशन सुरू झाल्यावर दुसऱ्याच दिवशी त्या वेळचे गृहखाते सांभाळणारे अली यावर जंग यांनी स्वामीजींना बोलावून घेतले. आणि त्यांच्या अध्यक्षीय भाषणात काही भाग आक्षेपार्ह असल्याचे सांगितले. आणि या अधिवेशनासाठी बाहेरून आलेल्या पाहुण्यांना भाषणे करू देऊ नयेत असेही सांगितले. यावर स्वामीजींनी स्पष्टपणे सांगितले की, सरकारच्या सूचना मान्य करता येणे अशक्य आहे. सरकार याबद्दल वाटेल ती कारवाई करू शकते. स्वामीजी आणि अलियावरजंग यांची मुलाखत सुरू असताना संमेलनस्थळी अशी अफवा पसरली की, स्वामीजींना अटक झाली असून संमेलनाचे पुढील कामकाज होणार नाही. काही काळ लोकांमध्ये चलबिचल झाली. जनसमुदाय अस्वस्थ झाला. पण स्वामीजी अधिवेशनस्थळी येताच लोकांनी सुटकेचा श्वास सोडला.

आपल्या अध्यक्षीय भाषणात स्वामीजींनी इंग्रजांची भारतातील सत्ता गेल्यानंतर संस्थानिक पुन्हा सार्वभौम होणार नाहीत, तर सर्वोच्च सत्ता जनताच धारण करील हे सांगून संस्थानिकांच्या मनात घोळत असलेल्या अलग स्वातंत्र्याच्या कल्पनेला भारताचे ऐक्य अबाधित राखण्याच्या दृष्टीने विरोध करण्याची नितांत गरज असल्याचे सांगितले. संस्थानातील इत्तेहादुल मुसलमीनच्या स्वतंत्र हैदराबाद कल्पनेला देशातील सर्व मुस्लिमांचा पाठिंबा असल्याचा जो देखावा मुस्लिम लीग करत होती त्यातील विसंगती दाखवून स्वामीजी म्हणाले, ''आम्ही मुस्लिम राज्य किंवा हिंदू राज्य या भूमिकेतून विचारच करीत नाही. धर्म, वंश, किंवा वर्ण यांचा विचार न करता सर्वांना समान संधी उपलब्ध करून देणारे लोकराज्य आम्हाला हवे आहे.''

खुल्या अधिवेशनात हैदराबाद संस्थान भारतीय संघराज्यात सामील व्हावे म्हणून अंतिम लढ्याचे आवाहन करणारा ठराव बी. रामकृष्णराव यांनी मांडला आणि दिगंबरराव बिंदूंनी अनुमोदन दिले. हा ठराव चर्चेस टाकताना स्वामीजी आपल्या भाषणात म्हणाले, ''मी एवढेच सांगू इच्छितो की, जो ठराव आता आपण संमत करणार आहात त्याला हैदराबादच्या चळवळीच्या इतिहासात फार महत्त्वाचे स्थान आहे. आपण हा ठराव संमत करण्यापूर्वी हे लक्षात घ्याल अशी मला आशा आहे.'' 'महात्मा गांधी की जय' 'स्वतंत्र भारत की जय' अशा घोषणांच्या निनादात तो ठराव संमत झाला.



# अंतिम लढा

स्टेट कॉंग्रेसच्या अधिवेशनानंतर सरकारची दडपशाहीची चक्रे फिरू लागतील आणि कार्यकर्त्यांच्या अटकेनंतर चळवळ दिशाहीन होऊ शकेल याची कल्पना स्वामीजींना होती.

अधिवेशन संपल्यानंतर लगेच २९ जून ते १ जुलै १९४७ या कालावधीत स्टेट कॉंग्रेसच्या नव्या कार्यकारिणीची बैठक स्वामीजींच्या अध्यक्षतेखाली सोलापूर येथे झाली. या बैठकीत स्वामीजींनी आपण सत्याग्रह करून लवकरच तुरुंगात जाणार असल्याचा आपला निर्णय सांगितला. आपण तुरुंगात गेल्यानंतर लढा सुरू ठेवण्यासाठी कृतिसमितीची नियुक्ती केली. ही कृतिसमिती अशी होती- दिगंबरराव बिंदू (अध्यक्ष), जमलापूर केशवराव (त्यांना अटक झाल्यास माडपाटी रामचंद्रराव), जी. एस. मेलकोटे (त्यांना अटक झाल्यास जे. के. प्राणेशाचार्य) आणि गोविंददास श्रॉफ, स्वामीजींनी आपल्याला अटक झाली तर स्टेट कॉंग्रेसच्या अध्यक्षपदाचे अधिकार दिगंबरराव बिंदू यांनी वापरावेत असे अधिकारपत्र लिहून ठेवले.

याच बैठकीत संघटनेचे कार्य दोन मार्गांनी करावे असे ठरवून कार्यकर्त्यांचे दोन गट करण्यात आले. एका गटातील कार्यकर्त्यांनी सत्याग्रह करून तुरुंगात जावे तर दुसऱ्या गटातील कार्यकर्त्यांनी सत्याग्रह करून स्वत:ला अटक करवून न घेता भूमिगत राहून संघटनेने ठरवून दिलेले कार्यक्रम पार पाडावेत असे सामान्यत: ठरविण्यात आले. संघटनेने कार्यकर्त्यांना दिलेल्या कार्यक्रमात गावोगावी जाहीर सभा व बैठका घेऊन संस्थानातील जनतेला अधिवेशनातील ठराव समजावून

सांगणे, भारतीय संघराज्यात हैदराबादने सामील व्हावे या मागणीचा प्रचार करणे, याच प्रचाराचा भाग म्हणून घटना समितीचे अध्यक्ष डॉ. राजेन्द्र प्रसाद, हंगामी सरकारचे पंतप्रधान पं. नेहरू, उपपंतप्रधान सरदार पटेल, प्रजा परिषदेचे अध्यक्ष पट्टाभि सीतारामय्या यांना पत्रे व तारा पाठवून विलीनीकरणाच्या मागणीचा पाठपुरावा करावा यासाठी जनतेने प्रयत्न करणे इ. बाबींचा समावेश होता.

स्टेट कॉंग्रेसच्या दृष्टीने या लढ्याचे स्वरूप व्यापक होते. हा लढा भारतीय स्वातंत्र्य आंदोलनाचा भाग होता. त्यामुळे मोठ्या संख्येने संस्थानातील जनतेने या आंदोलनात सहभागी झाले पाहिजे असे स्वामीजी आणि त्यांच्या सहकाऱ्यांना वाटत होते. १९३७-३८ चा लढा हा कार्यकर्त्यांचा लढा होता. मात्र ४७-४८ चा लढा हा सर्वसामान्य जनतेचा व्यापक लढा झाला पाहिजे असे स्टेट कॉंग्रेसला वाटत होते. त्या दृष्टीने सर्वसामान्य जनतेला लढ्यात सहभागी होता येईल असे कार्यक्रम कॉंग्रेस कार्यकारिणीने सोलापूर येथील बैठकीत दिले. ते असे होते-

७ ऑगस्ट 'संघ राज्य सामीलीकरण दिन' म्हणून साजरा करावा. या दिवशी प्रभात फेऱ्या, सभा, ध्वजवंदन इ. कार्यक्रम आयोजित करावेत व हैदराबाद संस्थानाने संघराज्यात सामील व्हावे अशी मागणी करावी. स्थानिक स्वराज्य संस्था व सरकारी समित्यांच्या सभासदांनी आपल्या पदांचे राजीनामे देऊन सरकारशी असहकार पुकारावा. निजाम सरकारने संस्थानात ताडीची, शिंदीची झाडे तोडण्यावर मनाईहुकूम बजावला होता. कारण यापासून सरकारला उत्पन्न मिळत असे. परंतु या झाडांमुळे शेताची वहिती करणे कठीण होत असे. याबद्दल स्टेट कॉंग्रेसने असा कार्यक्रम दिला की, सरकारचा आबकारी कायदा मोडून ताडीची. शिंदीची झाडे तोडावीत. हरताळ, संप करावेत. खेड्यापाड्यांत तलाठी, पोलिस पाटील, कुलकर्णी इ. मंडळी जनतेकडून करवसुली करून निजाम सरकारचे प्रशासन चालविण्यास मदत करतात. या मंडळींचे काम येनकेन प्रकाराने थांबवून शासन व्यवस्था खिळखिळीत होईल असे प्रयत्न करावेत.

स्टेट कॉंग्रेसकडून कार्यक्रम मिळताच संस्थानातील लोक उत्साहाने कामास लागले.

७ ऑगस्टच्या सामीलीकरण कार्यक्रमाचा प्रारंभ स्वामीजींनी आपले कर्नाटकातील निष्ठावंत सहकारी मवाळांचे नेते जी. रामाचारी यांचे बंधू कृष्णाचार्य जोशी यांच्यासह हैदराबादेत केला. सायंकाळी सुलतान बाजारातील टॉवरपाशी जमलेल्या लोकांना उद्देशून स्वामीजींनी भाषण केले व मिरवणूक काढण्याचा प्रयत्न

केला. पोलिसांनी या मिरवणुकीवर लाठीमार केला. स्वामीजी आणि कृष्णाचार्य यांना अटक करून ताबडतोब सोडून देण्यात आले. औरंगाबाद येथे प्रभातफेरीत सामील झालेल्यांवर लाठीमार करण्यात आला. याच जिल्ह्यातील लाडसावंगी गावात निरपराध लोकांवर गोळीबार करण्यात आला. त्यात दोन माणसे मरण पावली. स्टेट काँग्रेसने लेव्ही वसुली, शेतसारा प्रश्नांवर यापूर्वी खेड्यापाड्यांतून उग्र लढे दिले होते. त्यामुळे ग्रामीण तरुणांना ही चळवळ आपली वाटू लागली होती. परिणामी स्वामीजींचा आदेश मानून खेड्यापाड्यांत सामीलीकरण दिन व इतर आंदोलने मोठ्या प्रमाणात उभी राहिली.

स्टेट काँग्रेसच्या कार्यक्रमांमध्ये १५ ऑगस्टचा भारताचा स्वातंत्र्य दिन आणि २ सप्टेंबर रोजी राष्ट्रध्वज दिन साजरे करणे या कार्यक्रमांचा समावेश होता. १४ ऑगस्ट १९४७ रोजी रात्रीपासूनच देशभर स्वातंत्र्याचा जल्लोष सुरू होता. हैदराबादेत जागोजाग लोक रेडिओभोवती गर्दी करून बसले होते. लोकांच्या उत्साहाला उधाण आले होते. स्वामीजी रात्री बराच वेळ आपल्या बालाजी मंदिराच्या निवासस्थानामध्ये जागे होते. १४ ऑगस्टच्या मध्यरात्रीनंतर स्वामीजींना गाढ झोपेतून उठवून पोलिसांनी अटक केली आणि चंचलगुडा जेलमध्ये त्यांची रवानगी करण्यात आली. याचवेळी डॉ. मेलकोटे आणि कृष्णाचार्य जोशी यांनाही अटक करून त्या दोघांचीही तुरुंगात रवानगी करण्यात आली.

निजाम सरकारने भारत हे वेगळे राष्ट्र आहे म्हणून त्याचा राष्ट्रध्वज संस्थानात लावण्यावर बंदी घातली. निजाम सरकारच्या अधिकारकक्षेबाहेर असलेल्या रेल्वे, पोस्ट, खात्यांना ही बंदी लागू होणारच नव्हती. संस्थानातील पोस्ट कार्यालयांवर भारताचे राष्ट्रध्वज लावण्यात आले. पण हे राष्ट्रध्वज पहाताच पित्त खवळणाऱ्या इत्तेहादच्या कार्यकर्त्यांनी परभणी, लातूर येथील भारतीय पोस्ट कार्यालयांवरील भारताचे राष्ट्रध्वज काढून टाकले. संस्थानी हद्दीतून जाणाऱ्या मुंबई-मद्रास एक्सप्रेसवर चिकटवलेले कागदी राष्ट्रध्वज गुलबर्गा रेल्वे स्टेशनवर पोलिस आणि रझाकार यांनी पाण्याचा मारा करून खरवडून काढले.

सरकारच्या या संतापजनक कृत्याची तमा न बाळगता नागरिकांनी आपल्या घरांवर राष्ट्रध्वज लावले. उस्मानिया विद्यापीठाच्या इमारतीवर काही विद्यार्थ्यांनी गुपचूप ध्वज फडकावला होता. तो काढून त्याच्या चिंध्या करण्यात आल्या. गावोगावी सत्याग्रह्यांनी राष्ट्रध्वज हाती घेऊन सत्याग्रह केला तेव्हा पोलिसांनी सत्याग्रह्यांवर अमानुष लाठीहल्ले केले आणि राष्ट्रध्वजाचा अवमान केला.

सरकारची दडपशाही आणि रझाकारांचे संस्थानातील निरपराध लोकांवरील अत्याचार यांच्यामध्ये १९४६ पासून विशेष वाढ झाली. निजामाच्या सत्तेला सुरूंग लावणारी राजकीय परिस्थिती जसजशी संस्थानाबाहेर भारतात आकार घेत जात होती त्या त्या प्रमाणात संस्थानातील निरपराध जनता आणि स्टेट काँग्रेसचे कार्यकर्ते पोलिस आणि रझाकार यांच्या अत्याचाराचे लक्ष्य बनत होते. इत्तेहादचे कार्यकर्तेही संस्थानात आपल्या भाषणांतून, सभा संमेलनांमधून संस्थानातील मुस्लिमांना आक्रमक होण्यासाठी चिथावणी देत होते.

२२ मार्च १९४७ रोजी वेव्हेल यांच्या जागी शेवटचे व्हॉईसरॉय म्हणून लॉर्ड माऊंटबॅटन भारतात आले. २० फेब्रुवारी १९४७ रोजी तत्कालीन ब्रिटिश पंतप्रधान क्लेमंट ॲटली यांनी एक निवेदन ब्रिटिश संसदेत सादर केले. त्यात आपण भारतातील सत्ता ३० जून १९४८ पूर्वी सोडून जाऊ असे जाहीर केले गेले. भारताला लवकरच स्वातंत्र्य मिळणार हे स्पष्ट होताच निजामाने संस्थानात ११ जून १९४७ रोजी एक फर्मान काढून आपण भारत किंवा पाकिस्तान यापैकी कुठल्याही राष्ट्रात सहभागी न होता स्वतंत्र राहू असे जाहीर केले. निजामाच्या स्वातंत्र्याला, सार्वभौमत्वाच्या कल्पनेला विरोध करणाऱ्या संस्थानातील संघटना आणि कार्यकर्ते यांच्या चळवळी वाटेल त्या दहशतीच्या मार्गांनी, दडपशाहीने बंद पाडण्याचे धोरण इत्तेहादने स्वीकारले. ९ जून १९४७ रोजी मजलिसचे एक नेते रऊफ यांनी एक पत्रकार परिषद घेऊन ''संस्थानातील मुस्लिमांना ऐतिहासिक आणि सांस्कृतिक परंपरेने जे अधिकार आहेत ते कदापिही नष्ट करू दिले जाणार नाहीत आणि गरज पडली तर त्यांच्या रक्षणार्थ बळाचाही वापर करू. त्यासाठी आम्ही सरकारवर अवलंबून राहणार नाही. आमची संघटनाच मजबूत होऊन शस्त्रे हाती घेईल'' अशी धमकी दिली.

याच दरम्यान इत्तेहादचे पूर्वाध्यक्ष बहादूर यार जंग यांनी मांडलेल्या कल्पनेतून साकार झालेल्या रझाकार संघटनेचे नेतृत्व कासिम रझवी याच्याकडे आले. अलिगढ विद्यापीठातून एलएल. बी. होऊन लातूर येथे वकिली करणारा, भडक भाषणांनी संस्थानातील मुस्लिमांना चिथावणी देणारा हा प्रभावी वक्ता होता. कासिम रझवीने त्याला नेतृत्व मिळताच रझाकार संघटनेला धर्मांध आणि आक्रमक स्वरूप देण्यास प्रारंभ केला. संघटनेच्या संस्थानभर शाखा उघडण्यात आल्या. लष्करी कवायतीचे शिक्षण देणारी केन्द्रे उघडण्यात आली. संघटनेतील मुस्लिम तरुणांच्या डोक्यात आपणच या संस्थानाचे जन्मसिद्ध राजे आहोत. हे मुस्लिम राष्ट्र सुरक्षित

ठेवणे आपले परमकर्तव्य आहे. त्यासाठी प्राणाची आहुती पडली तरी चालेल हा विचार बिंबवण्यात आला. परिणामी या तरुणांमध्ये कडवी धर्मांधता जोपासली गेली. रझवीने इत्तेहादला अत्यंत भडक, अतिरेकी, धर्मांध रूप दिले आणि तिला माथेफिरू, धर्मांध रझाकार सैनिकांची जोड दिली. या संघटनेने १९४६ पासून संस्थानातील खेड्यापाड्यांतून अक्षरश: धुमाकूळ घालण्यास प्रारंभ केला. लोकांचे वित्त व जीवित असुरक्षित झाले. स्त्रियांची अब्रूसुद्धा असुरक्षित झाली. रझाकारांचा हा नंगानाच पोलिस ॲक्शनपर्यंत चालला. जनसामान्य असहाय्य अवस्थेत मुठीत जीव घेऊन जगत होते. अशा वातावरणात भयमुक्त करू पाहणारे स्टेट काँग्रेसचे अधिवेशन सामान्य माणसाला संजीवनीसारखे वाटू लागले. तो जीवाच्या आकांताने धडपडू लागला.

हे सर्व सरकार मुकाटपणे पाहत बसले नव्हते. सरकारने आपल्या परीने तयारी केली. गावोगावी 'अमनसभा' (शांतता समिती) कायम केल्या. यात सरकारधार्जिणे नागरिक, वकील, सावकार, धनिक यांचा समावेश करण्यात आला. त्यांच्या दिमतीला इत्तेहाद आणि रझाकार देण्यात आले. दडपणे आणि दहशत यांचा एकत्रित प्रयोग करण्यात आला.

अशा स्फोटक वातावरणात लढ्याची तयारी करणे, लोकांचे मनोबल खचू न देता त्यांना निर्भयपणे लढ्यात सहभागी होण्यास प्रवृत्त करणे हे महाकठीण काम होते. स्वामीजी आणि स्टेट काँग्रेसचे कार्यकर्ते कामाला लागले. संस्थानात संघटनेची चळवळ सरकार चालू देणार नाही हे स्वामीजी आणि इतर कार्यकर्त्यांना माहीत होते. म्हणून भूमिगतांच्या बरोबरीने संस्थानाबाहेर सरहद्दीलगत स्टेट काँग्रेसच्या लढ्याची कार्यालये उभी करणे आवश्यक होते. हैदराबादचा प्रश्न हा फक्त संस्थानापुरता मर्यादित प्रश्न नव्हता तर तो भारतीय स्वातंत्र्याला पूर्णत्व मिळवून देणारा होता. यासाठी स्वामीजी व आ. कृ. वाघमारे यांनी मध्यप्रांत व विदर्भाचा दौरा केला. मध्यप्रांताचे मुख्यमंत्री रविशंकर शुक्ल, गृहमंत्री द्वारकाप्रसाद मिश्र, ना. रा. कृ. पाटील यांनी सर्वतोपरी सहकार्य व मदत देण्याचे मान्य केले. मुंबईत जयप्रकाश नारायण यांनी सुप्रसिद्ध समाजवादी विचारवंत बॅ. पुरूषोत्तम दास त्रिकमदास यांच्याकडून २५ हजारांची मदत चळवळीसाठी स्वामीजींना मिळवून दिली. मनमाड, मुंबई, मद्रास, सोलापूर, नागपूर, विजयवाडा येथे लढ्याची कार्यालये सुरू करण्यात आली.

संस्थानात निरपराध नागरिकांवर सशस्त्र रझाकारंचे हल्ले दिवसेंदिवस वाढत

होते. दररोज जाळपोळ, लुटालूट यांच्या बातम्या येत होत्या. स्टेट काँग्रेसच्या कार्यकर्त्यांवरही रझाकाराचा दात होताच. सरकारकडून या प्रकारांना आळा घालणे तर लांबच, पण अप्रत्यक्षपणे प्रोत्साहनच मिळत होते. अशा परिस्थितीत लढ्याचे स्वरूप काय असावे याबद्दल सर्वांसमोर प्रश्नचिन्ह होते. आतापर्यंत लढ्याचे मार्गदर्शन करणारे गांधीजी आणि स्वामीजी दोघेही अहिंसेवर श्रद्धा ठेवणारे होते. नेहमीच्या सत्याग्रहाचा मार्ग अवलंबिला तर कार्यकर्ते तुरुंगात जातील आणि रझाकारांना जनतेवर हिंसक अत्याचारांसाठी रान मोकळे मिळेल असे काही कार्यकर्त्यांना वाटत होते. शिवाय संस्थानातील रानटी शासनयंत्रणेला अहिंसेच्या मार्गाने चाललेल्या सत्याग्रहामागचे सुसंस्कृत तत्त्वज्ञान कळण्यापलिकडे होते. अशा परिस्थितीत सशस्त्र प्रतिकार करावा म्हणजे रझाकारांच्या गुंडगिरीला जरब बसेल असे काही कार्यकर्त्यांना वाटत होते. स्वामीजींना मात्र सशस्त्र प्रतिकारचा मार्ग पसंत नव्हता. हे आंदोलन अहिंसेच्याच मार्गाने चालावे असे त्यांना मनोमन वाटत होते. अहिंसा ही त्यांनी जीवननिष्ठा मानली होती. हजारो लोकांच्या जीविताचे आणि मालमत्तेचे रक्षण करणे हा प्रश्नही तितकाच महत्त्वाचा वाटत होता. तरीही सशस्त्र प्रतिकाराच्या मार्गाला मान्यता देण्यासाठी त्यांचे मन तयार होत नव्हते.

निजामाने हैदराबाद संस्थान स्वतंत्र राहील असे जरी घोषित केले होते तरी संस्थानात स्वामीजींच्या नेतृत्वाखाली सुरू झालेले आंदोलन आणि संघराज्यात सामील होण्याची जनतेची जी मागणी दिवसेंदिवस वाढत होती त्याची तीव्रता वाढते आहे याची कल्पना निजाम आणि त्याच्या अधिकाऱ्यांना होती. ही चळवळ दडपून टाकणे अशक्यप्राय आहे याचीही मनोमन पुरेपूर जाणीव होती. आपल्या स्वातंत्र्याला संस्थानातील जनतेचा पाठिंबा आहे असे चित्र रेखाटल्याशिवाय संस्थानाबाहेर हैदराबाद संस्थानाला स्वतंत्र राष्ट्र म्हणून मान्यता मिळण्याची शक्यता नव्हती. म्हणून सरकारने संस्थानातील उद्योगपती मीर लायक अली आणि एक धनिक पन्नालालजी पित्ती यांच्या मध्यस्थीने स्वामीजी तुरुंगात असतानाच त्यांच्याशी विशिष्ट मुदतीसाठी संस्थानातील मंत्रिमंडळाच्या रचनेविषयी आणि राजकीय धोरणांसंबंधी बोलणी करण्यास प्रारंभ केला . स्वामीजींनी कार्यकारिणीशी सल्ला मसलत केल्याशिवाय बोलणी करण्यास नकार दिला. ३० नोव्हेंबर १९४७ रोजी स्वामीजींची व स्टेट-काँग्रेसच्या कार्यकारिणींच्या सदस्यांची तुरुंगातून सुटका करण्यात आली.

निजामाने १९४६ मध्ये सर वॉल्टन मॉक्टन यांची घटनाविषयक सल्लागार म्हणून नियुक्ती केली होती. त्यांनी ब्रिटिश सरकारशी १९४७ पासून वाटाघाटी

सुरू केल्या. आणि ब्रिटिश सरकारकडे आपल्याला स्वतंत्र वसाहतीचा दर्जा मिळावा अशी मागणी निजामाच्या वतीने केली. भारत स्वतंत्र होईल तेव्हा ब्रिटिशांचे संस्थानांवर असलेले सार्वभौमत्वाचे अधिकार भारताला मिळणार नाहीत. हे ठरवताना संस्थानांना भारत किंवा पाकिस्तान यापैकी कुठल्या तरी राष्ट्रात सामील व्हावेच लागेल असे ब्रिटिश सरकारने निश्चित केले होते. त्यामुळे एखाद्या संस्थानाच्या स्वतंत्र अस्तित्वाला ब्रिटिश सरकारकडून मान्यता किंवा संरक्षण मिळणे शक्य नव्हते. म्हणून लॉर्ड माऊंटबॅटन यांनी निजामाची हैदराबाद संस्थानाला स्वतंत्र वसाहतीचा दर्जा देण्याची मागणी फेटाळून लावली. हैदराबादच्या शिष्टमंडळाने वऱ्हाडचा प्रदेश हा निजामाच्या मालकीचा आहे. तो ब्रिटिशांनी निजाम सरकारला परत करावा अशी ब्रिटिशांकडे मागणी केली. त्यावर भारतीय अधिकाऱ्यांनी निजामाला असे सुचवले की, त्याने भौगोलिक ऐक्य टिकवण्यात सहकार्य दिले तर निजामाने केलेल्या मागण्यांपैकी काही मागण्यांचा सहानुभूतिपूर्वक विचार केला जाण्याची शक्यता आहे. वाटाघाटींचे गुऱ्हाळ बरेच दिवस चालू राहिले. शेवटी २९ नोव्हेंबर १९४७ रोजी भारतातील ब्रिटिश सत्ता आणि निजाम यांचे पूर्वी जसे संबंध होते तसेच एक वर्ष मुदतीसाठी नव्या भारत सरकारबरोबर निजामाचे संबंध असावेत असे मान्य करणारा 'जैसे थे' करार झाला.

या करारामुळे संस्थानातील परिस्थितीत कुठलाही फरक पडला नाही. भारतीय ध्वज संस्थानात फडकावण्यावर बंदी होती. भारतीय चलन संस्थानात बेकायदा ठरविण्यात आले होते. पोलिस मग्रुरपणे दडपशाही करीतच होते. रझाकार धर्मांधतेचे विष पसरवत होते. कासिम रझवी याने एका भाषणात'' ..तो दिवस दूर नाही. ज्या दिवशी बंगालचा उपसागर आमच्या सार्वभौम राजाचे पद-प्रक्षालन करील आणि दिल्लीच्या लाल किल्ल्यावर आसफजाही ध्वज फडकेल'' अशी दर्पोक्तीची भाषा केली होती. संस्थानातील हिंदूंचे मनोधैर्य खचवणे हाच उद्देश या वल्गनेमागे होता. त्याचबरोबर हिंसक कारवाया करणाऱ्या रझाकारांना भडकावण्याचाही हेतू होता. अर्जापूर येथे स्टेट काँग्रेसचे कार्यकर्ते गोविंदराव पानसरे यांचा २१ ऑक्टोबर १९४६ रोजी खून करण्यात आला. इत्तेहाद व रझाकार यांना विरोध करणाऱ्या व जबाबदार राज्यपद्धतीचा पुरस्कार करणाऱ्या 'इमरोज' वृत्तपत्राचे संपादक शोएबुल्लाखान यांचा २२ ऑगस्ट १९४८ रोजी मध्यरात्री भररस्त्यावर दोन्ही हात तोडून खून करण्यात आला. या प्रकारांमुळे संस्थानातील जनता, स्टेट काँग्रेसचे कार्यकर्ते अधिकाअधिक प्रक्षुब्ध होऊ लागले.

प्रतिकारासाठी सज्ज झाले. दिगंबरराव बिंदू यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन झालेल्या कृतिसमितीने प्रतिकार शिबीरे संघटित केली होती. ही शिबीरे संस्थानाच्या सरहद्दीलगत संस्थानाबाहेर होती. या शिबीरातील कार्यकर्ते संस्थानात येऊन रझाकार केंन्द्रे, पोलिस ठाणी, जकात नाके यांच्यावर सशस्त्र हल्ला करीत. त्यामुळे एकीकडे शासनव्यवस्था खिळखिळी होऊ लागली तर दुसरीकडे जनतेचे मनोधैर्य वाढू लागले. अशातच ३० जानेवारी १९४८ रोजी उमरी येथील स्टेट बँकेवर भरदिवसा हल्ला करून मोठी रक्कम लुटण्यात आली. यामुळे तर सरकारचे धाबेच दणाणले.

हैदराबादेत अंतिम लढ्याचे पर्व सुरू झाले तेव्हा संस्थानात घडणाऱ्या घडामोडींची माहिती देण्यासाठी स्वामीजींनी डिसेंबर १९४७ मध्ये गांधीजींची दिल्लीत भेट घेतली व सर्व वृत्तांत सांगितला. सशस्त्र लढ्याचे वृत्तही त्यांच्या कानी घातले. गांधीजी मृदू पण निर्धार व्यक्त करणाऱ्या सुरात म्हणाले, ''होय, लोक अशा प्रसंगात भित्र्यासारखे पळून गेले नाहीत हे योग्यच झाले. हिंसात्मक मार्गाने का होईना ते शूरासारखे वागले आहेत.'' अहिंसेला जीवननिष्ठा मानणाऱ्या स्वामीजींना जनसामान्यांच्या संरक्षणासाठी हिंसेला परवानगी मागावी लागली आहे हे गांधीजींनी समजून घेतले होते. स्वामीजींनी सशस्त्र प्रतिकाराच्या लढ्याला अप्रत्यक्षपणे गांधीजींची संमती मिळवली होती.

चळवळीने जानेवारी १९४८च्या दरम्यान विलक्षण गती घेतली होती. स्टेट काँग्रेसच्या आंदोलनाचे लोण खेड्यापाड्यापर्यंत पोहचले होते. सरकार व रझाकार अधिकाधिक आक्रमक होत होते. हैदराबादजवळच्या बिबीनगर येथे रझाकारांनी रेल्वे स्टेशनवर व बाजूच्या खेड्यावर हल्ला केला. त्यात २६ जण जखमी झाले. दिवसेंदिवस वाढणाऱ्या या प्रकारांनी स्वामीजी अस्वस्थ झाले. त्यांनी २३ जानेवारी १९४८ रोजी निजामाला एक पत्र लिहून बिबीनगर घटनेची चौकशी करण्यासाठी आयोग नेमण्याची मागणी केली. सरकारकडून या पत्रावर काय प्रतिक्रिया होते याची वाट पाहून एक पत्रकार परिषद बोलावून त्यांनी आपल्या सत्याग्रहाचा निर्णय घोषित करण्याचे ठरवले. पण त्या अगोदरच सरकारने २६ जानेवारी १९४८ रोजी स्वामीजींना अटक केली आणि चंचलगुडा तुरुंगाऐवजी त्यांची हैदराबादजवळील संगारेड्डीच्या तुरुंगात रवानगी केली.

केवळ चारच दिवसांनी महात्माजींची हत्या झाल्याचे वृत्त स्वामीजींना तुरुंगात समजले. या बातमीमुळे स्वामीजींवर दु:खाचा डोंगर कोसळला. स्वामीजींच्या दृष्टीने

गांधीजी केवळ राजकीय चळवळीचे, स्वातंत्र्यलढ्याचे त्यांचे मार्गदर्शक नव्हते; तर त्यांच्या आदर्श जीवनसाधनेच्या मार्गावरचे प्रकाशदूत होते. आपले मन, जीवन अधिकाधिक शुद्ध ठेवण्याचे स्वामीजी जे प्रयत्न करीत होते त्याची प्रेरणा गांधीजीच होते. नैतिकतेवर अधिष्ठित राजकारण कसे करावे याचा आदर्श स्वामीजींच्या-समोर गांधीजींच्या राजकारणाच्या रूपाने होता. गांधीजींच्या हत्येमुळे स्वामीजींना निराधार झाल्यासारखे वाटत होते. स्वामीजींनी दोन दिवस उपवास केला. संगारेड्डी तुरुंगातून तीन आठवड्यानंतर त्यांना गुलबर्गा येथील जेलमध्ये नेण्यात आले.

एकीकडे सरकार भारत सरकारशी वाटाघाटी चालल्याचा देखावा करून केवळ वेळकाढूपणाच्या धोरणाने वागत होते. तर दुसरीकडे संस्थानात रझाकार आणि पोलिस यांच्या अत्याचारांना खंड नव्हता. सशस्त्र रझाकार आणि गुंड यांना कारागृहात प्रवेश देऊन सत्याग्रह्यांना अमानुषपणे मारझोड करण्याचे प्रकार सुरू झाले होते. निजामाबाद तुरुंगात ११ जानेवारी १९४८ रोजी झालेल्या हल्ल्यात १२३ सत्याग्रही जखमी झाले. १४ एप्रिल १९४८ रोजी गुलबर्गा तुरुंगात झालेल्या हल्ल्यात भीमसेन देसाई या सत्याग्रह्याचा मृत्यू झाला.

अशा परिस्थितीत हल्लेखोरांवर जरब बसवून हिंसाचाराला लगाम घालण्याचे काम संस्थानाच्या सरहद्दीपलीकडे स्थापन केलेल्या कॅम्पसमधील कार्यकर्ते सशस्त्र लढा देऊन करीत होते. या कार्यकर्त्यांसाठी शस्त्रास्त्रे मिळविण्याचे प्रयत्न स्टेट काँग्रसचे नेते करीत होते. या कामी अनेक अडचणींना तोंड द्यावे लागे. मुंबई, मद्रास व मध्य प्रांतात विनापरवाना शस्त्र जवळ बाळगणे कायद्याने गुन्हा होता. त्यामुळे बेकायदेशीररित्या शस्त्रे विकणाऱ्यांकडून जबरदस्त किंमत देऊन शस्त्रे विकत घ्यावी लागत. अशाच प्रयत्नांत असलेल्या स्टेट काँग्रेसच्या कार्यकर्त्यांना गांधीहत्येनंतर मुंबईत पकडण्यात आले होते. उलट मध्य प्रांतात शस्त्रास्त्रे उपलब्ध करून देण्याच्या कामी मध्य प्रदेशचे गृहमंत्री द्वारकाप्रसाद मिश्र, रा. कृ. पाटील या मंत्र्यांचे मोलाचे सहकार्य स्टेट काँग्रेसला लाभले. रा. कृ. पाटील यांनी स्टेट काँग्रेसच्या कार्यकर्त्यांना ५०, ६० हजार रुपयांचा निधी उपलब्ध करून दिला. मध्य प्रदेश सरकार संस्थानातील स्टेट काँग्रेस कार्यकर्त्यांना सरळ सरळ शस्त्रास्त्रे देऊ शकत नव्हते. नवीन शस्त्रे पोलिसांना दिली व जुनी निकामी झाली असे कागदोपत्री दाखवून स्टेट काँग्रेस कार्यकर्त्यांना शस्त्रे पुरविली जात. मँगनीज खाणमालकांना देण्यात येणाऱ्या डिटोनेटर्सपैकी आणि दारूगोळ्यांपैकी काही भाग सरहद्दीवरील कार्यकर्त्यांना देण्यात येई. हा शस्त्रसाठा वाहून नेण्यासाठी वाहनाची आवश्यकता

भासे. एका मंत्र्याने एक गाडी विकत घेतली आणि नागपूर येथे असलेल्या कमलताई होस्पेट यांच्या मातृसेवा मंदिराच्या नावावर त्या गाडीची नोंदणी करून स्टेट काँग्रेसला शस्त्रास्त्रांची ने-आण करण्यासाठी देण्यात आली. नागपूरमध्ये काँग्रेस कार्यकर्त्यांना शस्त्रे हाताळण्याचे प्रशिक्षण देण्यात आले. पुण्यात रा. ज. देशमुख यांच्या घरात बाबासाहेब परांजपे हात बाँबचे शेल्स व त्यात भरावयाची स्फोटके तयार करीत. स्टेट काँग्रेसचे कार्यकर्ते सर्व प्रकारची जोखीम पत्करून परिस्थितीचा निग्रहाने प्रतिकार करीत होते. सशस्त्र लढ्यातील या कार्यकर्त्यांनी जवळपास शंभर करोडगिरी नाके, पोलिस ठाणी, चौक्या, रझाकार केंद्रांवर हल्ले केले.

संस्थानातील काही वकिलांनी 'प्लीडर्स प्रोटेस्ट कमिटी' स्थापन केली. आणि उच्च न्यायालयाच्या मुख्य न्यायमूर्तींना निवेदन देऊन संस्थानातील ढासळलेल्या कायदा व सुव्यवस्थेचा निर्देश केला व जबाबदार राज्यपद्धती स्थापन झाल्याशिवाय परिस्थितीत सुधारणा होणार नाही आणि परिस्थितीत सुधारणा होईपर्यंत आम्ही कोर्टाच्या कामकाजावर बहिष्कार टाकत आहोत असे कळवले. यापैकी काही वकिलांनी संस्थानातील गावोगावी फिरून रझाकारांनी केलेल्या अत्याचारांची माहिती गोळा केली. लोकांची निवेदने नोंदवून घेऊन ती भारत सरकारकडे पाठवली. या दरम्यानच स्टेट काँग्रेसचे कार्यकर्ते भेटी, पत्रव्यवहार यांच्या माध्यमातून संस्थानात चिघळत चाललेल्या परिस्थितीचा वृत्तांत नेहरू, सरदार पटेल यांच्यापर्यंत वेळोवेळी पोहचवत होते.

भारताप्रमाणेच हैदराबाद संस्थानाचे स्वातंत्र्य दृष्टिपथात येऊ लागले होते. त्यामुळे हैदराबाद मुक्तिसंग्रामात प्रत्यक्षपणे सहभागी नसणारी मंडळी स्टेट काँग्रेसवर ताबा मिळविण्यासाठी प्रयत्नशील झाली होती. सरकार अय्यंगार समितीने सुचवलेल्या सुधारणांबाबत स्टेट काँग्रेसशी वाटाघाटी करण्याचा प्रयत्न करीत होते. या सुधारणा फेटाळण्याचा निर्णय प्रांतिक परिषदांमध्ये पूर्वीच झाला होता. मात्र मवाळांपैकी जी. रामाचारी, वैद्य वगैरे मंडळी सरकार आणि इत्तेहादुल यांच्याशी व्यक्तिगत पातळीवर या संदर्भात वाटाघाटी करीत होती. स्टेट काँग्रेसच्या स्थायी समितीने काँग्रेसच्या नियुक्त प्रतिनिधीशिवाय सरकार व इत्तेहादुल यांच्याशी अन्य कोणीही बोलणी करू नयेत अशा सूचना दिल्या. तरीही ही मवाळ मंडळी सरकार आणि इत्तेहादुल यांच्याशी वैयक्तिक पातळीवर बोलणी करीतच होती. मवाळांचे हे कृत्य संघटनेच्या शिस्तीच्या विरुद्ध तर होतेच; शिवाय यामुळे

संघटनेच्या ऐक्यावरही प्रतिकूल परिणाम होण्याची शक्यता होती. म्हणून स्टेट काँग्रेसच्या २० मे १९४८ रोजी मद्रास येथे झालेल्या कृतिसमितीच्या बैठकीत बी. रामकृष्णराव, काशीनाथराव वैद्य, व्यंकट रंगा रेड्डी, लक्ष्मी निवास गणेरीवाल यांचे स्टेट काँग्रेस आणि तिच्या सर्व समित्यांवरील सदस्यत्व रद्द करणारा ठराव कृतिसमितीने पास केला. या घटनेचे हैदराबादच्या राजकारणावर नंतर दूरगामी परिणाम झाले. या वेळी स्वामीजी गुलबर्ग्याच्या जेलमध्ये होते. नंतर दोन दिवसांनी २२ मे १९४८ रोजी स्वामीजींना चंचलगुडा जेलमध्ये हलविण्यात आले. मद्रास येथे कृतिसमितीच्या बैठकीत पास झालेल्या बडतर्फीच्या ठरावामुळे स्टेट काँग्रेसमध्ये मवाळ-जहाल यांच्यात उघड उघड संघर्ष सुरू झाला.

'जैसे थे' करारानंतरच्या परिस्थितीचा आढावा घेण्यासाठी गृहमंत्री वल्लभभाई पटेल यांनी एक बैठक २१ फेब्रुवारी १९४८ रोजी बोलावली. या बैठकीस मुंबई, मध्य प्रांत, मद्रास प्रांतांचे पंतप्रधान, हैदराबादेतील भारताचे एजंट कन्हैयालाल मुन्शी हजर होते. या बैठकीत सरदारांनी हे स्पष्ट केले की, हैदराबाद सरकारने सोनेचांदीची संस्थानाबाहेर निर्यात करण्यावर बंदी घालणारा वटहुकूम काढला आहे. भारत सरकारचे चलन संस्थानात बेकायदा ठरवले आहे. संस्थानी सरकारचे हे वटहुकूम 'जैसे थे' कराराच्या गाभ्याशी विसंगत आहेत. संस्थानातील हिंदूवरील वाढत्या अत्याचारांचा वल्लभभाईंनी बैठकीत गांभीर्यपूर्वक उल्लेख केला आणि भविष्यात कोणत्याही घटनेसाठी आपण तयार राहिले पाहिजे असे सांगितले. ही पोलिस अॅक्शनची सूचक नांदीच होती!

२५ मे १९४८ रोजी लॉर्ड माऊंट बॅटन आणि लायक अली यांची दिल्ली येथे बैठक झाली. या बैठकीत निजाम भारतीय संघराज्यात सामील होण्यासाठी तयार नाही हे अंतिमतः स्पष्ट झाले. सामीलीकरणाऐवजी 'इन्स्ट्रुमेंट ऑफ असोसिएशन' या नावाने नवा करार करावा असा प्रस्ताव लायकअलींनी ठेवला. निजामाच्या बऱ्याच मागण्या मान्य करणारा करार निजामाने स्वीकारावा असा सल्ला लायकअली आणि मॉक्टन यांनी दिला असतानाही निजामाने तो करार फेटाळला.

हैदराबादचा प्रश्न सरळपणे सुटत नाही हे जून १९४८ मध्ये स्पष्ट झाले. या प्रकरणी पंडित नेहरू यांनी गव्हर्नर जनरल चक्रवर्ती राजगोपालाचारी यांना पत्र पाठवून अशी प्रतिक्रिया व्यक्त केली की, ''मोठ्या संघर्षाकडे आपली वाटचाल होत आहे असे दिसते. हा संघर्ष टाळता येईल असे मला वाटत नाही. कारण हैदराबादच्या मंडळींची डोकीच फिरलेली दिसतात. जास्तीत जास्त करता

येण्यासारखे एवढेच आहे की, तो संघर्ष काहीतरी घडण्याच्या अपेक्षेने पुढे ढकलावा. परंतु असा उशीर करणेही दिवसेंदिवस, कठीण होत आहे.''

हैदराबाद संस्थानाच्या आभाळात ढग जमा होत चालले होते. हे ढग केव्हा कोसळतील याकडे संस्थानातील जनसामान्यांचे लक्ष लागले होते.



# 'ऑपरेशन पोलो!'

हैदराबाद आणि अन्य एकदोन संस्थानांचा अपवाद वगळता इतर संस्थाने भारतीय संघराज्यात विलीनीकरणाच्या करारानुसार सहभागी झाली होती. हैदराबाद संस्थान मात्र वाटाघाटी आणि समजुतीच्या मार्गाने भारतीय संघराज्यात सामील होत नव्हते. उलट त्याच्या हालचाली भारताच्या एकात्मतेला धोका निर्माण करण्याच्या दिशेने होत होत्या. निजामाने २६ जून १९४७ आणि २७ ऑगस्ट १९४७ या दोन दिवशी दोन फर्माने काढली. या फर्मानांच्याद्वारे असे घोषित केले की, १५ ऑगस्ट १९४७ पासून हैदराबाद हे स्वतंत्र व सार्वभौम राष्ट्र झाले आहे. स्वतंत्र राष्ट्र म्हणून घोषित केल्यानंतर आपले लष्करी बळ वाढवणे निजामाला आवश्यक वाटू लागले. 'जैसे थे' कराराप्रमाणे संस्थानांना भारत सरकारमार्फतच शस्त्र खरेदी करणे बंधनकारक होते. या कराराचा भंग करून निजामाने झेकोस्लोव्हाकिया, पोर्तुगीज सरकारकडून शस्त्र खरेदी केली. चोरट्या मार्गाने ही शस्त्रे भारत सरकारच्या प्रतिबंधाला न जुमानता संस्थानात आणण्यात आली व बीदर, वरंगल येथील विमानतळांवर उतरून घेण्यात आली. ब्रिटिश सरकारने संस्थानांनी किती सैन्य ठेवावे याबद्दल काही निर्बंध संस्थानांवर घातले होते. त्यांचा भंग करून निजामाने आपल्या संस्थानातील सैन्याच्या संख्येत वाढ करण्यास सुरुवात केली. या घटना भारताच्या एकात्मतेला धोका निर्माण करणाऱ्या होत्या.

याच दरम्यान 'इत्तेहादुल मुसलमीन' या रझाकारांच्या संघटनेचा प्रमुख कासिम रझवी याने रझाकारांची संख्या व बळ वाढवून गावोगावी मोठ्या प्रमाणात अनन्वित अत्याचार करण्यास सुरुवात केली. राजकीय विरोधकांबरोबरच गोरगरिबांच्या

हत्या होऊ लागल्या. दंगली, लूटमार करून संस्थानातील गैरमुस्लिम जनतेत दहशत निर्माण केली जाऊ लागली. भारतीय लष्करावर निजाम पोलिस, रझाकार यांनी हल्ले केले. सोलापूर जिल्ह्यातील बार्शी तालुका सर्व बाजूंनी निजामी मुलखाने वेढलेला होता. सोलापूर-बार्शी मार्गावर लष्करी तुकडी गस्त घालीत असताना नान्नज या गावाजवळ भारतीय लष्करी तुकडीवर निजाम पोलिस आणि रझाकारांनी हल्ला केला. अशाच प्रकारचे हल्ले याच भागातील खारे टाकळी, कांबी या गावांजवळ भारतीय लष्करावर करण्यात आले.

हैदराबादचा प्रश्न सामोपचाराच्या मार्गाने निजाम मिटवण्यास तयार नाही हे जवळपास स्पष्ट झाले होते. त्यामुळे लष्करी बळाचा वापर करणे अपरिहार्य झाले होते. जवाहरलाल नेहरूंसारखे भारतीय नेते हैदराबाद संस्थानात भारत सरकारने हस्तक्षेप केला तर त्याची आंतरराष्ट्रीय प्रतिक्रिया काय होईल या चिंतेने लष्करी कारवाई टाळण्याचे आटोकाट प्रयत्न करीत होते. परंतु निजामाच्या हालचाली भारताच्या एकात्मतेला धोका निर्माण करणाऱ्या आहेत, संस्थानातील बहुसंख्य जनतेचे जीवित व वित्त सुरक्षित राहिलेले नाही हे लक्षात येताच भारत सरकारसमोर 'जैसे थे' कराराचा आधार घेऊन हैदराबादेत लष्करी कारवाई करण्याशिवाय अन्य मार्ग शिल्लक राहिला नाही. या दरम्यानच हैदराबादचे पंतप्रधान मीर लायक अली यांनी भारत सरकारला पत्र पाठवून हैदराबादचा प्रश्न शांततेने सुटावा म्हणून हैदराबाद सरकार हा प्रश्न संयुक्त राष्ट्र संघात नेत असल्याचे कळवले. संयुक्त राष्ट्र संघाकडे हैदराबादचा प्रश्न नेऊन त्याला आंतरराष्ट्रीय स्वरूप देण्याच्या निजामाच्या प्रयत्नांमुळे अंतिमत: पोलिस कारवाई करण्याचा निर्णय दिल्लीत ९ सप्टेंबर १९४८ रोजी घेण्यात आला. स्वामीजी तर फेब्रुवारी १९४८ पासूनच भारताच्या लष्करी हस्तक्षेपाची अपेक्षा करीत होते.

भारत सरकारने दिलेल्या आदेशानुसार भारतीय सैन्याने लष्करी कारवाईस दि. १३ सप्टेंबर १९४८ रोजी प्रारंभ केला. या कारवाईचे सांकेतिक नाव होते 'ऑपरेशन पोलो!'

१३ सप्टेंबर १९४८ रोजी भारतीय सैन्य संस्थानामध्ये पाच वेगवेगळ्या ठिकाणांहून घुसले. या कारवाईचे नेतृत्व ले. ज. राजेन्द्रसिंह यांच्याकडे होते. त्यांच्या नेतृत्वाखाली मेजर जनरल जयंतीनाथ चौधरी, मे.ज.डी.एस.ब्रार, मे.ज.ए.ए. रूद्र, ब्रिगेडियर शिवदत्त सिंग, एअर व्हाईस मार्शल मुखर्जी यांनी 'ऑपरेशन पोलो' ही कारवाई पूर्णत्वास नेली.

पहिली चढाई सोलापूर ते हैदराबाद मार्गावरून करण्यात आली. याचे नेतृत्व मे. ज. चौधरी यांनी केले. दुसरी चढाई विजयवाडा मार्गाने झाली. तिचे नेतृत्व मे. ज. रूद्र करीत होते. त्या शिवाय आदिलाबादकडून, चाळीसगाव मार्गे औरंगाबाद कडून, वाशिम मार्गे हिंगोलीतून, बुलडाणा मार्गे जालन्यातून, सोलापूर मार्गे उस्मानाबाद लातूरकडून, गदग आणि रायपूरकडून अशा निरनिराळ्या मार्गांनी भारतीय सैन्य संस्थानात घुसले.

दिनांक १३ सप्टेंबर रोजी सैन्याची एक तुकडी सोलापूर मार्गे नळदुर्गपासून २३ कि.मी. अंतरावर पोहचली. या तुकडीच्या दृष्टीने नळदुर्गचा पूल ताब्यात घेणे आवश्यक होते. कारण निजामाचे सैनिक हा पूल उडवून भारतीय सैन्याच्या मार्गात अडथळा निर्माण करण्याची शक्यता होती. निजामी सैन्यातील ब्रिटिश अधिकारी लेफ्टनंट टी. टी. मूर एका जीपमध्ये स्फोटके घेऊन नळदुर्गकडे निघाला होता. पण त्यापूर्वीच भारतीय सैन्याने या पुलावर ताबा मिळवला होता. या तुकडीला तुळजापूर-नळदुर्ग मार्गावर थोडा प्रतिकार झाला. या चकमकीत निजामाचे दोनशे सैनिक आणि दोन अधिकारी मारले गेले. नळदुर्गच्या किल्यावरील उपळी बुरूजावर लपून बसलेल्या निजामी सैन्याच्या एका तुकडीलाही भारतीय सैन्याने जेरबंद केले. या दिवशी भारतीय सैन्याने आदिलाबाद, जळकोट, तुरूरी ही गावे मिळवली. याच दिवशी उस्मानाबाद जिल्ह्यात तुळजापूर, परभणी जिल्ह्यात माणिकगढ आणि कनेरगाव, आणि विजयवाड्याजवळचे बोनाकल ही गावे भारतीय सैन्याने पहिल्याच दिवशी काबीज केली.

चाळीसगावाहून कूच केलेल्या भारतीय सैन्य तुकडीने १४ सप्टेंबर रोजी औरंगाबाद जिल्ह्यातील कन्नड, दौलताबाद ही गावे ताब्यात घेतली. तिकडे जनरल चौधरी यांच्या नेतृत्वाखालील फौजा राजेश्वरमार्गे सूर्यपिठपर्यंत पोहोचल्या. तेथून सिकंदराबादचे अंतर केवळ ६० कि.मी. होते. याच दिवशी वरंगल आणि बीदर, बेगमपेठ येथील विमानतळ भारतीय सैन्याने बॉंबहल्ले करून उध्वस्त केले. १५ सप्टेंबर रोजी रात्री भारतीय सैन्याने औरंगाबाद शहर काबीज केले. आणि तेथील रेडिओ केंन्द्र ताब्यात घेतले. रेडिओवरून भारतीय राष्ट्रगीत वाजू लागले. त्यामुळे या केन्द्रावरून भारतीय सैन्याची पीछेहाट होत आहे असा जो खोटा प्रचार निजामाकडून सतत केला जात होता तो थांबला.

१५ सप्टेंबरला पहाटे उस्मानाबाद जिल्ह्यातील मुरूड येथे असलेल्या निजामी

सैनिकांनी लातूररोडपर्यंत माघार घेतली.

निजामी सैनिक आणि रझाकार यांनी बीदर-जहिराबाद मार्गावर भारतीय सैन्याला कडवा प्रतिकार केला. पण भारतीय सैन्य चिवटपणे जहिराबाद पासून ८ कि.मी. अंतरावर पोहचले. आणि १६ सप्टेंबर रोजी जहिराबाद गाव भारतीय सैन्याने काबीज केले. मुनिराबाद रेल्वे स्टेशन ताब्यात घेऊन मोठा शस्त्रसाठा जप्त करण्यात आला.

१७ सप्टेंबर रोजी हैदराबादच्या भोवती असलेल्या निजामी सैनिकांनी लिंगमपल्लीपर्यंत माघार घेतली. भारतीय सैन्य हैदराबादच्या दिशेने सदाशिवपेठपर्यंत पोहचले. भारतीय सेनाधिकाऱ्यांनी निजामचे सैन्यप्रमुख जनरल अल इद्रुस यांना शरणागती पत्करावी असा संदेश दिला. या संदेशाची अंमलबजावणी निजामाच्या सैन्य प्रमुखाकडून झाली नाही तर दुसऱ्या दिवशी हैदराबाद शहरावर अंतिम हल्ला करण्याची पूर्वतयारी भारतीय सैन्य करू लागले.

'ऑपरेशन पोलो' ची कारवाई सुरू करताना या योजनेचे दक्षिण विभाग प्रमुख राजेन्द्र सिंहजी यांची विविध भाषांमधील मुद्रित निवेदने विमानामधून संस्थानाच्या विविध भागांमध्ये टाकण्यात आली होती. या निवेदनात भारत सरकार आणि भारतातील जनतेच्या सदिच्छेने हैदराबादेत कायद्याचे राज्य प्रस्थापित करून सर्वांना सारखे संरक्षण देण्याचा मनोदय व्यक्त करण्यात आला होता. हा संदेश संस्थानातील सर्वसामान्य माणसापर्यंत पोहचल्याने नागरी लोकमत लष्करी कारवाईला अनुकूल झाले होते. निजाम सैन्याकडूनही म्हणावा तसा फारसा प्रतिकार होत नव्हता. म्हणून केवळ चार दिवसात भारतीय सैन्याने हैदराबादपर्यंत सहज मुसंडी मारली.

इकडे निजाम किंग कोठीत चिंताग्रस्त आणि अस्वस्थ होता. आपले सैन्य किती काळ टिकाव धरू शकेल यांची त्याला चिंता वाटत होती. आंतरराष्ट्रीय सुरक्षा समिती काही हस्तक्षेप करील काय याची वाट निजाम पहात होता. निजामाने हैदराबाद संस्थानाबद्दल केलेल्या तक्रारीवर विचार करण्यासाठी पॅरिसमध्ये संयुक्त राष्ट्रसंघाची बैठक १६ तारखेस होणार होती. म्हणून निजामाला थोडीफार आशा वाटत होती. परंतु या बैठकीत निजामाची तक्रार दाखल करून घेण्यात आली. आणि पुढील विचार विनिमय २० सप्टेंबर रोजी करण्याचे ठरले. इकडे भारतीय सैन्य दाराशी येऊन ठेपले होते. निजामापुढे शरणागतीशिवाय दुसरा मार्ग नव्हता. शेवटी निजामाने १७ सप्टेंबर रोज सायंकाळी आपली शरणागती जाहीर केली.

१८ सप्टेंबर रोजी भारतीय सैन्याने एका साध्या समारंभात निजामी सैन्याची शरणागती स्वीकारली. १९ सप्टेंबर रोजी मेजर जनरल जयंतीनाथ चौधरी यांनी लष्करी प्रशासक म्हणून सूत्रे हाती घेतली.

सातवा निजाम नबाब मीर उस्मान अलीखान 'एच्.ई.एच.' 'रूस्तुमे दोराँ' 'फतहजंग' 'जिल्ले सुबानी' याला स्वतःच्या हाताने हैदराबाद संस्थानाचे विसर्जन करावे लागले. संस्थानाचे सार्वभौम मुस्लिम राष्ट्र निर्माण करण्याचे निजामाचे स्वप्न धुळीला मिळाले. त्याची धूर्तता, राजकीय डावपेच, पाताळयंत्रीपणा हे सारे गुण निष्प्रभ ठरले.

दोनशे चोवीस वर्षे गुलामगिरीच्या अंधारात खितपत पडलेल्या संस्थानाच्या क्षितिजावर स्वातंत्र्याचा सूर्य उगवत होता. स्वातंत्र्य सूर्याचा प्रकाशदूत, संस्थानातील जनतेचा मुक्तिदाता-स्वामी रामानंद तीर्थ-चंचलगुड्याच्या तुरुंगात स्वातंत्र्याच्या प्रभात किरणांचे स्वागत करण्यासाठी अनिमिष नेत्रांनी मार्गप्रतिक्षा करीत होता.



# शांतता प्रस्थापनेचे प्रयत्न

हैदराबाद संस्थानातील नागरिक आपल्या स्वातंत्र्याचा जल्लोष व्यक्त करीत होते. आनंद व्यक्त करीत होते. तेव्हा स्वामीजी चंचलगुड्याच्या बराकीत होते. सोबत इतरही सत्याग्रहीही होते. १७ सप्टेंबर १९४८ रोजी दुपारी पोलिस खात्याचा अधिकारी स्वामीजींच्या बराकीत आला. आणि स्वामीजींची ताबडतोब सुटका करण्याबद्दल आदेश आला असल्याचे सांगितले.

स्वामीजींनी कैदेतील राजबंद्यांना निजामाच्या शरणागतीची बातमी स्वत:च सांगितली. राजबंद्यांच्या बराकीमध्ये आनंदाला, उत्साहाला उधाण आले.

हिंदुस्थानी सेना संस्थानात बऱ्याच आतपर्यंत आल्या असल्याचे स्वामीजींना कळाले होते. परंतु संस्थानातले वातावरण नेमके कसे आहे याबद्दल काहीच समजले नव्हते. रझाकार या परिस्थितीला कसे सामोरे जातील याचा अंदाज येत नव्हता. अविचारी, माथेफिरू रझाकार सैनिक आणि त्यांचा नेता कासिम रझवी आपली होत असलेली पीछेहाट आणि विसर्जनाच्या कडेलोटापाशी येऊन ठेपलेली राजवट हे वास्तव सोशिकपणे स्वीकारण्याचा समजूतदारपणा दाखवतील अशी अपेक्षा करणे अवघड होते. पराभवाने खचून सुडाच्या भावनेने पेटलेले रझाकार गुंड तुरुंगातील सत्याग्रह्यांवरही हल्ला करू शकतील असे स्वामीजींना वाटत होते. या वाटण्याला सबळ कारणही होते. काही आठवड्यांपूर्वीच चंचलगुडा तुरुंगात सत्याग्रह्यांवर हल्ला करण्यासाठी काही शस्त्रे आणून ठेवण्यात आली होती. पण तुरुंगाधिकारी सय्यद मोहम्मद हसन यांच्या सतर्कतेमुळे हे संकट टळले होते. त्यामुळे स्वामीजींचे मन सहकारी सत्याग्रह्यांना सोडून तुरुंगाबाहेर जाण्यासाठी

धजेना. तुरुंगाधिकाऱ्यांनी स्वामीजींना सांगितले की, हिंदू फौजा शहराचा ताबा घेण्यास किमान २४ तास तरी लागतील. अशा परिस्थितीत बाहेर लोकांना स्वामीजीच आवरू शकतील. अद्याप लोकांजवळ शस्त्रे होती. हिंदू-मुस्लिम दोघेही प्रक्षुब्ध होते. संस्थानातील सामान्य जनता विजायोन्मादाने भारून गेली होती. परिस्थिती स्फोटक होती. अशा अवस्थेत सरकारी अधिकारी हतबल झाले होते. कायदा व सुव्यवस्था राखणे त्यांच्या कुवतीबाहेरचे होते. ही सर्व परिस्थिती लक्षात घेऊन स्वामीजींनी तुरुंगातील सत्याग्रह्यांचा निरोप घेतला. व १७ सप्टेंबर रोजीच तुरुंगाबाहेर आले. सुलतान बाजारातील आपल्या निवासस्थानाकडे ते निघाले. रस्त्यावर हजारोंच्या संख्येने लोक जमले होते. भारतमाता, गांधीजी, स्वामीजी यांचा जयघोष करीत होते. लोक कमालीचे निर्भय झाले होते. रझाकारांच्या भीतीचा लवलेश कुणाच्या चेहऱ्यावर दिसत नव्हता. स्वामीजींनी जनसमुहापुढे छोटेसे भाषण करून लोकांचे अभिनंदन केले. लोकांना शांतता ठेवण्याचे व सध्याच्या परिस्थितीत जातीय सलोखा कायम ठेवण्याचे व कायदा आणि सुव्यवस्था राखण्याचे आवाहन केले.

स्वामीजींच्या पाठोपाठ इतर सहकाऱ्यांची हळूहळू सुटका होत होती. संस्थानाबाहेरील सरहद्दीवरील शिबीरे बंद करण्यात आली. सैनिक आपापल्या गावी परतत होते. या सैनिकांकडील शस्त्रे लष्कराला परत केली जावीत याबद्दल स्वामीजी जातीने लक्ष देत होते.

जातीय सलोखा दृढ राहावा, लोकांची मने एकसंघ राहावीत यासाठी स्वामीजींनी संस्थानातील विविध भागात दौरे काढले. लोक हजारोंच्या संख्येने सभेला हजर राहात. स्वामीजींचा शब्दन् शब्द कानात प्राण आणून टिपून घेत. अशीच एक अविस्मरणीय सभा उस्मानाबादला झाली. या सभेतील भाषणामधून स्वामीजींच्या मनात स्वातंत्र्योत्तर काळातील समाजरचनेबद्दल कशा स्वरूपाचे विचार घोळत होते यावर प्रकाश पडतो. स्वामीजी आपल्या भाषणात म्हणाले, ''आम्ही स्वातंत्र्य मिळवले ते केवळ हिंदूंचे नाही. विजय मिळाला तो हिंदूंचा नव्हे, तसेच पराजय झाला तो मुसलमानांचा नव्हे. हा लोकशाहीचा विजय आहे. लोकशाही मानणाऱ्या सर्वांचाच विजय आहे. विजयसंपादनाच्या उत्साहात कुणी गुंडगिरी करण्याचा प्रयत्न करील तर त्याला शासन करण्याचे पूर्ण सामर्थ्य सरकारमध्ये आहे. पीडा करणाऱ्यांचे निर्दालन, निरपराधांना अभय, दुष्टपणाचा द्वेष व सदाचाराचे प्रेम हे आमचे धोरण आहे.'' स्वामीजींचे स्वप्न जातिधर्म-निरपेक्ष

लोकशाही प्रस्थापित व्हावी, समताधिष्ठित समाज निर्माण व्हावा हे होते. या दृष्टीने त्यांची पावले पडत होती.

निझामी राजवटीच्या शेवटच्या दोन वर्षात रझाकार आणि पोलिस यांनी अनेक खेड्यांवर संघटित हल्ले केले. हिंदूच्या घरादारांची लूट केली. स्त्रियांवर बलात्कार केले या गोष्टींचा प्रतिकार करणाऱ्यांची निर्घृण हत्या केली. अनेक कुटुंबे दहशतीमुळे संस्थानाबाहेर आश्रयासाठी गेली होती. पोलिस कारवाईनंतर ती आपापल्या गावी परतू लागली. पोलिस कारवाईनंतरच्या आठ दहा दिवसांत मुस्लिमांवरही अत्याचार झाले होते. त्यामुळे अनेक मुस्लिम कुटुंबे हैदराबादेत आश्रयाला आली होती. या सर्व कुटुंबांचे पुर्नवसन, त्यांना रोजगार उपलब्ध करून देणे ही तातडीची कामे होती. त्या दृष्टीने सरकार हालचाली करीत होते. एक पुनर्वसन समिती स्थापन करण्यात आली होती. स्वामीजींच्या आदेशानुसार स्टेट काँग्रेसचे कार्यकर्ते समितीच्या सभासदांना पुनर्वसनाच्या आणि मदतवाटपाच्या कामात सहकार्य करीत होते. ज्या खेड्यांमध्ये अधिक तणाव होता तेथे स्वामीजींनी आपल्या विश्वासू कार्यकर्त्यांवर विशेष जबाबदारी सोपवली. मे १९४८ मध्ये रझाकारांनी गोरठा गावी १२५ हिंदूंची घरे जाळली आणि २०० माणसांची हत्या केली होती. या हल्यात जवळच असलेल्या घोडवाडी गावातील मुस्लिमांनी भाग घेतला होता. याचा सूड म्हणून पोलिस कारवाई आटोपल्यावर घोडगावच्या मुस्लिमांवर हल्ला करण्यात आला. अनेक मुस्लिम गाव सोडून पळून गेले. स्वामीजी, माडपाटी रामचंद्रराव, जाफर हुसेन, मुरलीधरराव कामतीकर वगैरे कार्यकर्ते त्या गावी गेले. दोन्ही जमातीच्या लोकांशी त्यांनी चर्चा केली. मुरलीधरराव व जाफर हुसेन यांच्यावर स्वामीजींनी अशी जबाबदारी सोपविली की, त्यांनी या गावी राहून पुर्नवसनाच्या कामात लक्ष घालावे. आणि दोन्ही जमातींमध्ये विश्वास निर्माण करावा. त्याप्रमाणे ते दोघेही तीन आठवडे त्या भागात राहिले. स्वामीजी अनेक खेड्यांमधून फिरत होते. कृश प्रकृती, अधू पाय या साऱ्यांकडे दुर्लक्ष करून मैलोगणती पायपीट करीत होते. पीडितांचे अश्रू पुसत होते. दुभंगलेल्या मनांना जोडण्याचे प्रयत्न करीत होते.

निजामी राजवटीत हरिजनांना हिंदूपासून वेगळे करण्यात संस्थानी सरकारला यश आले होते. २४ ऑक्टोबर १९४८ रोजी हैदराबाद येथे स्वामीजींच्या अध्यक्षतेखाली स्टेट काँग्रेस कार्यकारिणीची बैठक झाली. या बैठकीत अस्पृश्यता व सामाजिक विषमता नष्ट करण्याचा निश्चय करण्यात आला. अस्पृश्यतेविरुद्धच्या

लढ्याचा भाग म्हणून मंदिर प्रवेशाचा कार्यक्रम हाती घेण्यात आला. काँग्रेस कार्यकर्त्यांच्या प्रयत्नाने या कालावधीत शंभराहून अधिक मंदिरे हरिजनांसाठी खुली करण्यात आली. पैठणचे नाथ मंदिर स्वामीजींच्या पुढाकाराने १२ नोव्हेंबर १९४८ रोजी हरिजनांसाठी खुले करण्यात आले.

हैदराबाद संस्थानात कम्युनिस्ट कार्यकर्त्यांनी १९४५ मध्ये तेलंगणातील वतनदार व जमीनदार यांच्या विरोधात श्रमिक मजुरांचा लढा संघटित केला. जमीनदारांच्या अन्यायाचा सामना करण्यासाठी सशस्त्र प्रतिकार करावा अशी प्रेरणा श्रमिक शेतमजुरांना दिली. यातून तेलंगणात सशस्त्र लढ्याची चळवळ उभी राहिली. जनजीवन भयग्रस्त होऊ लागले. निजामाच्या राजसत्तेचा कणाच जमीनदार, वतनदार होते. त्यामुळे तेलंगणात जमीनदारांच्या विरोधात कम्युनिस्टांनी उभारलेला लढा मुकाटपणे पाहणे सरकारला शक्यच नव्हते. निजाम सरकारने १९४६ मध्ये संस्थानात कम्युनिस्ट पक्षावर बंदी घातली. आणि बंडाचा बीमोड करण्यासाठी १९४७ मध्ये सैन्याच्या काही तुकड्या तेलंगणात पाठवल्या. कम्युनिस्ट कार्यकर्त्यांची धरपकड करून त्यांना तुरुंगात टाकण्यात आले. याच काळात स्वामीजी चंचलगुडा तुरुंगात होते. तेथेच स्थानबद्ध केलेल्या कम्युनिस्ट कार्यकर्त्यांना ठेवण्यात आले.

२८ फेब्रुवारी ते ६ मार्च १९४८ या काळात कलकत्यात भारतीय कम्युनिस्ट पक्षाची दुसरी काँग्रेस भरली. या काँग्रेसमध्ये भारताला मिळालेले स्वातंत्र्य खरे स्वातंत्र्य नाही. टाटा-बिर्लांसारख्या भांडवलदारांच्या अधिपत्याखाली भारताला नेणारे हे स्वातंत्र्य आहे. म्हणून क्रांतिवादी तरुणांची आघाडी करावी. व लढा उभारून खरे स्वातंत्र्य मिळवण्याचे आवाहन करण्यात आले. कम्युनिस्टांच्या या बदललेल्या भूमिकेमुळे कम्युनिस्ट पक्ष स्वतंत्र भारतातील नेहरू सरकारच्या विरोधात गेला होता. भारत सरकारही निजामाच्या दृष्टीने शत्रूस्थानीच होते. शत्रूचा शत्रू तो आपला मित्र या न्यायाने निजामाने ४ मे १९४८ रोजी संस्थानातील कम्युनिस्ट पक्षावरची बंदी उठवली. तुरुंगात असलेल्या कम्युनिस्टांना सोडण्याचा निर्णय घेतला.

स्वामीजीं बरोबरच तुरुंगात असलेले कार्यकर्ते तुरुंगात असताना अपसात चर्चा करीत. भारत हा साम्राज्यशाहीचा बालेकिल्ला आहे. नेहरू त्याची बटीक आहे. हे सरकार कुठल्याही परिस्थितीत, कुठल्याही मार्गाने उलटून टाकले पाहिजे अशा प्रकारची ही चर्चा असे.

स्वामीजींची तुरुंगातून सुटका झाल्यानंतर सात-आठ महिन्यानंतर कम्युनिस्ट स्थानबद्धांना तुरुंगातून हळूहळू १९४८ मध्ये सोडण्यात आले. याच दरम्यान तेलंगणातील कम्युनिस्टांच्या लढ्याने उग्र रूप धारण केले. हजारो एकर जमिनीवर मालकी हक्क असणारे धनदांडगे जमीनदार आणि या जमीनदारांच्या शेतावर वर्षानुवर्षे राबणारे शोषित, वेठबिगार शेतमजूर यांच्यातील विषम परिस्थितीमुळे कम्युनिस्टांना तेलंगणामध्ये लढ्यासाठी अनुकूल वातावरण लाभले होते. तुरुंगातून सुटलेले कम्युनिस्ट कार्यकर्ते तेलंगणाच्या लढ्यात सहभागी झाले. जमीनदारांचे खून, धान्याच्या कोठारांची लूट, गवताची गंजी, गुरांचे गोठे यांना आगी लावणे हे प्रकार घडू लागले. सर्वसामान्य माणसे भयाच्या, दहशतीच्या सावटाखाली आयुष्य कंठू लागली. कम्युनिस्टांना सहकार्य न देणाऱ्या निरपराध लोकांची हत्या केली जाऊ लागली. तर कम्युनिस्टांना मदत केल्याच्या संशयावरून पोलिस, लष्कराचे लोक सामान्य माणसांवर अत्याचार करू लागले. या भागात दिवसा सैनिकांची तर रात्री कम्युनिस्टांची दहशत होती. कम्युनिस्टांच्या या हिंसक कारवायांना स्टेट काँग्रेसचे तेलंगणातील कार्यकर्ते विरोध करीत होते. त्यामुळे कम्युनिस्ट स्टेट काँग्रेसच्या कार्यकर्त्यांवरही हल्ले करीत होते.

स्वामीजींना तुरुंगातून बाहेर आल्यावर तेलंगणातील परिस्थिती समजली. दहशतीच्या वातावरणातही स्वामीजी आपल्या सहकाऱ्यांसोबत नलगोंडा, सियालगुडा, हुजूरनगर या पीडित भागात फिरले. कम्युनिस्टांच्या आणि सैनिकांच्या अत्याचारांना बळी पडलेल्या निरपराध स्त्री-पुरुषांचे अश्रू पुसले. त्यांना दिलासा दिला. नंतर जानेवारी १९५१ मध्ये स्वामीजी पुन्हा नलगोंडा जिल्ह्यात गेले. मिरयाल-गुडा तालुक्यातील चिल्लेपल्ली गावातील हरिजन वस्तीजवळ एक झोपडी उभी केली. दररोज जवळपासच्या खेड्यांमधून फिरू लागले. लोकांना दहशतीतून मुक्त करण्याचे प्रयत्न सुरू केले. हिंसेला नकार देण्याचे बळ पीडित, आदिवासी लोकांच्या मनात निर्माण केले. या दौऱ्यात स्वामीजींनी केलेले महत्त्वाचे काम म्हणजे लमाण, कोया, चेंचू या आदिवासींच्या मनात आत्मविश्वास निर्माण करण्यासाठी तांड्यातांड्यावर जाऊन लोकांच्या भेटी घेतल्या. लोकांना बोलते केले.

या दौऱ्यात स्वामीजी तेलंगणातील लोकांचे हलाखीचे जीवन, त्यांचे दारिद्र्य, अज्ञान जवळून पाहत होते. वर्षानुवर्षे या भागातील शेतमजुरांच्या होत असलेल्या शोषणाची विविध रूपे जवळून पाहत होते. त्यांच्या सुखदु:खाशी समरस होत होते. जनतेच्या समस्यांमागील कारणांचा शोध घेत होते. त्यांना असे दिसून आले की,

तेलंगणातील जमीनदारी, देशमुखी या सरंजामी व्यवस्थेने कुळांचे आणि शेतमजुरांचे जे वर्षानुवर्षे शोषण केले आहे त्यातूनच या भागातील श्रमिक शेतमजुरांचे दुःख निर्माण झाले आहे. पोलिसांच्या किंवा कम्युनिस्टांच्या शस्त्रबळाने तेलंगणातील शेतमजुरांचे प्रश्न सुटणार नाहीत. त्यासाठी शेतमजुरांचे जमीनदारांकडून होणारे शोषण थांबवणे हाच उपाय आहे या निष्कर्षाप्रत स्वामीजी आले होते. हा उपाय म्हणजे शेती कसणाऱ्या मजुराला त्या शेतीवर हक्क मिळवून देणे हा आहे असे स्वामीजींना वाटत होते. स्वामीजींच्या संपादनाखाली निघणाऱ्या 'व्हिजन' साप्ताहिकाच्या १० एप्रिल १९५० च्या अंकात एक लेख लिहून स्वामीजींनी तेलंगणातील शेतमजुरांची समस्या आणि त्यावरची उपाययोजना मांडली.

७ ते १४ एप्रिल १९५० या काळात हैदराबाद येथे सर्वोदय कार्यकर्त्यांचे तिसरे संमेलन झाले. या संमेलनासाठी आचार्य विनोबा भावे आले होते. या वेळेस विनोबांनी तेलंगणातील अशांत असलेल्या भागांमधून पदयात्रा काढली. विनोबांचा हेतू अशांत असलेल्या भागांत शांती प्रस्थापित करणे, त्या भागातील लोकांना भयमुक्त करणे हा होता. काही ठिकाणी विनोबांच्या सोबत स्वामीजी गेले. प्रकृती बरी नसल्याने स्वामीजी विनोबांच्या सोबत सर्वच ठिकाणी जाऊ शकले नाहीत. पदयात्रेत पोचमपल्ली या गावी विनोबाजी गेले असताना त्यांना अचानकपणे शंभर एकर जमिनीचे दान मिळाले. या ठिकाणीच भूदानाच्या क्रांतिकारी चळवळीचा उदय झाला.

हैदराबाद संस्थान मुक्त झाल्यावर स्वामीजी आणि स्टेट काँग्रेसमधील कार्यकर्ते लोकांची दुभंगलेली मने सांधण्यात गुंतले होते. गोरगरीब जनतेच्या आर्थिक आणि सामाजिक अभ्युदयासाठी अहोरात्र धडपडत होते. तर निजामी राजवटीत निजामाबद्दल वेळोवेळी राजनिष्ठा व्यक्त करून त्याच्या कृपादृष्टीसाठी तळमळणारे मवाळ कार्यकर्ते बदललेल्या परिस्थितीत सत्तास्थाने काबीज करण्यासाठी वेगवेगळ्या डावपेचांची योजना करीत होते. स्वातंत्र्यलढ्यात फारशी सहभागी नसणारी ही मवाळ मंडळी संस्थान स्वतंत्र होताच सत्तास्थानाभोवती पिंगा घालू लागली. त्यांना प्रमुख अडसर होता तो स्वामीजी, गोविंदभाई श्रॉफ अशा जहाल कार्यकर्त्यांचा! हैदराबाद लढ्याचे स्टेट काँग्रेसला मार्गदर्शन करणाऱ्या नेहरू-वल्लभभाई पटेल यांच्यापैकी पटेलांचे स्वामीजींबद्दल मत कलुषित करण्यात मवाळांनी यश मिळवले. स्वामीजी, श्रॉफ मंडळी कम्युनिस्टधार्जिणी असल्याची पटेलांची ठाम समजूत मवाळांनी करून दिली. परिणामी पटेलांनी स्वामीजींना

डावलून दिगंबरराव बिंदू यांना १९४९ मध्ये स्टेट काँग्रेसचे अध्यक्ष केले. हैदराबाद स्वातंत्र्यलढ्यात स्वामीजींसोबत निष्ठावंत सहकारी म्हणून खांद्यास खांदा देऊन लढणाऱ्या बिंदूंनी स्वामीजींची अध्यक्षपदाची निवडणूक लढविण्याची इच्छा असतानाही, स्वत: अध्यक्षपद स्वीकारावे याचे स्वामीजींना दु:ख झाले. बिंदूंची अध्यक्षपदी निवड हा आपला पराभव आहे असे अनेक पुरोगामी कार्यकर्त्यांना वाटू लागले. पक्षात आता आपले स्थान राहिलेले नाही. आपले पुरोगामी कार्यक्रम आता पक्षात राहून राबवणे शक्य नाही असे या कार्यकर्त्यांना वाटू लागले. हे सर्व कार्यकर्ते स्वामीजींचे अनुयायी होते. या सर्व कार्यकर्त्यांनी गोविंददास श्रॉफ यांच्या नेतृत्वाखाली काँग्रेस पक्ष सोडून 'लीग ऑफ सोशॅलिस्ट वर्कर्स' हा नवा पक्ष स्थापन केला. पक्ष सोडून जाणाऱ्यांत बहुसंख्य मराठवाड्यातील कार्यकर्ते होते. स्वामीजींचे बलस्थानच मराठवाडा होते. मराठवाड्यातले बहुसंख्य कार्यकर्ते काँग्रेस सोडून गेल्यामुळे स्वामीजींची अवस्था पंख छाटलेल्या पक्ष्यासारखी झाली. अशातच १२ मार्च १९५० रोजी दिगंबरराव बिंदूंनी त्यांचे कार्यकारी मंडळ जाहीर केले. त्यात मवाळांचे नेते बी. रामकृष्णराव गटाच्या लोकांची संख्या निम्म्याहून अधिक होती. स्वामीजींवर निष्ठा असलेल्या केवळ चार जणांचा समावेश कार्यकारिणीत करण्यात आला होता. स्वामीजींचा तर या कार्यकारिणीत समावेशही करण्यात आला नव्हता. एकेकाळी इत्तेहादुल मुसलमीनचे अध्यक्ष असलेले अबुल हसन सय्यद अली यांचा मात्र कार्यकारिणीत समावेश करण्यात आला होता. स्वातंत्र्यासाठी लढा देऊन आपली लोकशाहीवरील निष्ठा सिद्ध करणाऱ्या कार्यकर्त्यांना डावलून संधिसाधू सत्तालोलुपांची काँग्रेसमध्ये चलती सुरू झाली आहे हे स्वामीजींच्या ध्यानात येण्यासाठी या घटना पुरेशा होत्या.

१९५२ च्या जानेवारी महिन्यात हैदराबादच्या विधिमंडळाच्या निवडणुका झाल्या. लीग ऑफ सोशॅलिस्ट वर्कर्सतर्फे स्वातंत्र्यलढ्यात प्राण संकटात घालून सहभागी झालेल्या कार्यकर्त्यांनी निवडणूक लढवली. ते सर्वच्या सर्व कार्यकर्ते पराभूत झाले. काँग्रेसला काठावरचे बहुमत मिळाले. स्वामीजी गुलबर्गा मतदार संघातून ५६ हजार मते मिळवून निवडून आले. नंतर स्वामीजींनी पं. नेहरूंना पत्र पाठवून स्टेट काँग्रेसला अपेक्षित यश न मिळण्याची कारणे विशद केली.

राजकारणाचे बदलते रूप, निष्ठावंतांना डावलले जाणे, पक्षात संधिसाधूंचा वाढणारा सुळसुळाट आणि मवाळांचे काँग्रेस पक्षावर वाढत चाललेले निरंकुश वर्चस्व यांचा स्वामीजींना कमालीचा त्रास होत होता. राजकारणाचा दिवसेंदिवस

उबग येत चालला होता. फेब्रुवारी १९४९ मध्ये बी. रामकृष्णराव यांना पाठवलेल्या पत्रात स्वामीजींनी लिहिले की, ''मी माझ्या परीने व शक्यतेनुसार स्वातंत्र्य मिळवण्याच्या चळवळीत देशाची सेवा केली आहे. कदाचित मी भावी काळासाठी अयोग्य असेन. अपमानास्पद वागणूक सहन करण्याऐवजी मला सन्मानाने निवृत्त होऊ द्या.'' स्टेट काँग्रेसच्या निजामाबाद येथे १९५० मध्ये झालेल्या दुसऱ्या अधिवेशनात तडजोडीतून आलेले नवे अध्यक्ष दिगंबरराव बिंदू यांच्या हाती कार्यभार देताना स्वामीजींनी जे भाषण केले ते जवळपास राजकारण क्षेत्राचा निरोप घेणारेच भाषण होते.

१९३८ मध्ये योगेश्वरी शिक्षणसंस्थेतून राजकारणात प्रवेश करताना स्वामीजींनी आपल्या मनाशी काही उद्दिष्टये निश्चित केली होती. हैदराबाद संस्थानातील गुलामगिरी नष्ट करणे, नागरिक स्वातंत्र्याची प्राप्ती, जबाबदार राज्यपद्धती, लोकशाहीच्या पायावर आधारित राज्यकारभार अशी उद्दिष्टे मनाशी बाळगून स्वामीजींनी स्वातंत्र्य लढ्याचा महायज्ञ उभारला. तो पूर्णत्वास नेला. ही उद्दिष्टये साध्य झाली. परंतु अजून एक स्वप्न शिल्लक राहिले होते. हैदराबाद राज्याचे स्वतंत्र अस्तित्व न ठेवता त्याचे भाषावर त्रिभाजन करणे. हे स्वप्न पूर्ण होईपर्यंत राजकीय क्षेत्राचा कितीही उबग आला तरी स्वामीजींना राजकीय प्रवाहात राहणे भागच होते.

स्वामीजींची भूमिका अशी होती की, हैदराबाद संस्थानाचे विसर्जन करून 'तेलंगण' आंध्र राज्यात, 'मराठवाडा' महाराष्ट्रात आणि कर्नाटकाचे तीन जिल्हे कर्नाटक राज्यात विलीन करण्यात यावेत. याबाबतीत स्वामीजींसमोर एक अडचण होती. अशा प्रकारच्या भाषिक तत्त्वावर हैदराबाद संस्थानाची पुनर्रचना करण्यास पं. नेहरूंचा विरोध होता. स्वामीजी नेहरूंचे नेतृत्व मानत होते. तरीही नेहरूंचा विरोध पत्करून स्वामीजींनी भाषावार प्रांतरचनेचा आग्रह धरला. नेहरूंशी विरोध घेणे स्वामीजींना यातनादायी होते. तरी त्यांनी ते केले भाषिक तत्त्वावर राज्य पुनर्रचनेच्या प्रश्नावर जनमत अनुकूल करून घेतले. आणि राज्य पुनर्रचनेचे विधेयक विधानसभेत पास करून घेतले. भाषावार प्रांतरचनेची जनतेची मागणी धुडकावून १ नोव्हेंबर १९५६ रोजी विशाल द्विभाषिकाचे नवे राज्य अस्तित्वात आले. द्विभाषिक राज्याचा निर्णय स्वामीजींना मान्य नव्हता. द्विभाषिक राज्य फार दिवस चालणार नाही. त्यासाठी लोकशाही पद्धतीने द्विभाषिकाचा निर्णय बदलून घ्यावा लागेल आणि मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र निर्माण व्हावा यासाठी लढा दिला पाहिजे अशी

स्वामीजींची भूमिका होती. हैदराबाद विधानसभेत मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र, कर्नाटक व विशाल आंध्र अशी तीन राज्ये निर्माण व्हावीत याबद्दल सर्वसाधारणतः सर्वांचे एकमत होते.

१९५३ मध्ये हैदराबाद येथे अ. भा. कॉंग्रेसचे ५८ वे अधिवेशन झाले. त्या आधी १९५२ सालच्या सप्टेंबर-ऑक्टोबर महिन्यात कॉंग्रेसच्या संघटनात्मक निवडणुका झाल्या. या निवडणुकीत मवाळांचे नेते जनार्दनराव देसाई यांचा पराभव करून स्वामीजी पुन्हा अध्यक्षपदी निवडून आले. स्वामीजींना ९२ मते मिळाली. १६ ते १८ जानेवारी या कालावधीत हैदराबाद येथे झालेल्या अ. भा. कॉंग्रेस अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष म्हणून भाषण करताना स्वामीजींनी नेहरूंच्या उपस्थितीत भाषावार प्रांतरचनेची आग्रही मागणी केली. स्वामीजींच्या भाषणातील हैदराबादच्या भाषिक तत्त्वावर विभाजनाच्या मागणीवर नेहरू अंतर्यामी अस्वस्थ झाले होते.

१९५४ मध्ये प्रदेश कॉंग्रेसच्या अध्यक्षपदाची निवडणूक लढवायची नाही असा निर्णय स्वामीजींनी घेतला. आणि हैदराबाद राज्यातील कॉंग्रेस संघटनेचे नेतृत्व १७ जानेवारी १९५४ रोजी सोडून दिले. आणि पुन्हा पक्षात कधीच कुठलेच पद स्वीकारले नाही.

पंडित नेहरू आणि स्वामीजींचे संबंध फार विश्वासाचे होते. स्वामीजींच्या भाषावर प्रांतरचनेच्या मागणीमुळे नेहरू नाराज होते, हे खरे असले तरी लोकसभेत जेव्हा जेव्हा भाषिक पुनर्रचनेची चर्चा होई तेव्हा नेहरू स्वामीजींचे भाषण ऐकण्यासाठी आवर्जून उपस्थित राहत. परंतु शेवटपर्यंत भाषिक पुनर्रचनेचे नेहरू विरोधकच राहिले. स्वामीजींच्या भाषिक पुनर्रचनेच्या भूमिकेबद्दल विरोध परंतु स्वामीजीच्या निस्पृह ध्येयनिष्ठेबद्दल विश्वास अशी नेहरूंची स्थिती होती. म्हणूनच १९५७ च्या सार्वत्रिक निवडणुकीत स्वामीजींनी उभे राहिलेच पाहिजे असा आग्रह नेहरूंनी धरला. स्वामीजींचा मात्र निर्णय होत नव्हता. राजकारणातून त्यांना हळूहळू निवृत्त व्हावयाचे होते. परंतु अद्याप हैदराबाद संस्थानाच्या विभाजनाचा निर्णय झाला नव्हता. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचे स्वप्न अद्याप अपूर्णच होते. म्हणून इच्छा असूनही त्यांना राजकारणापासून सर्वस्वी मुक्त होणे शक्य नव्हते. स्वामीजी औरंगाबाद मतदार संघातून निवडणुकीस उभे राहिले. त्यांच्या विरोधात मुंबईचे कम्युनिस्ट नेते एस. एस. मिरजकर उभे होते. ७६,२७४ मते मिळवून स्वामीजी निवडून आले. १९५८ सालापासून द्विभाषिक राज्याच्या पुनर्विचाराच्या मागणीने पुन्हा जोर धरला. जनमताचा दबाव वाढू लागला. राज्य पुनर्रचना विधेयकात आवश्यक

ती दुरुस्ती करणारे विधेयक लोकसभेत सादर होऊन ते ५१ सदस्यांच्या चिकित्सा समितीकडे सुपूर्द करण्यात आले. त्या समितीत स्वामीजींचा समावेश होता. यावर चर्चा होऊन १४ एप्रिल १९६० रोजी दुरुस्ती विधेयक संमत झाले. स्वामीजींचे संयुक्त महाराष्ट्राचे स्वप्न साकार झाले. स्वामीजींच्या दृष्टीने हा आनंदाचा, समाधानाचा परमोच्च बिंदू होता. विधेयक संमत झाल्यावर नेहरू स्वामीजींच्या आसनाजवळ आले आणि स्वामीजींना म्हणाले, ''स्वामीजी तुम्ही जिंकलात; मी हरलो'' नेहरूंच्या उदारतेने स्वामीजींचे मन भरून आले. स्वामीजींच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले. नेहरूंचे हात त्यांनी क्षणभर हाती घेतले. लोकसभेच्या सभागृहाच्या निर्जीव भिंतीही या नेत्यांच्या मनांची थोरवी पाहून अचंबित झाल्या असाव्यात.

संयुक्त महाराष्ट्राचे स्वामीजींचे स्वप्न पूर्ण झाले. आता राजकारणातून पूर्णत: निवृत्त होण्याचा क्षण समीप आला होता. स्वामीजींच्या ध्येयनिष्ठ राजकारणाचे प्रयोजन संपले होते. १९६२ साली स्वामीजींची लोकसभेची मुदत संपणार होती. त्यानंतर लोकसभेसाठी पुन्हा उभे राहावयाचे नाही असे स्वामीजींनी ठरवले. नेहरूंना तसे पत्राने कळवले. नेहरूंनी जड अंत:करणाने स्वामीजींच्या निर्णयाला संमती दिली. एप्रिल १९६१ मध्ये स्वामीजींनी खादी कार्यकर्त्यांच्या सभेत बोलताना आपल्या राजकारणनिवृत्तीचा निर्णय जाहीर केला आणि आपण विधायक कार्यास वाहून घेत आहोत असे जाहीर केले.

स्वामीजींच्या नेतृत्वाने शोषित, श्रमिक शेतमजुरांच्या जीवनातही परिवर्तन घडवून आणले. स्वामीजींच्या सततच्या पाठपुराव्यामुळे तेलंगणच्या जमिनीच्या मालकीवर मर्यादा आली. भारतातील पहिला कुळवहिवाटीचा पुरोगामी कायदा झाला. शेकडो वर्षे जहागीरदार, जमीनदार यांच्या शेतांवर अखंड राबणाऱ्या आणि दारिद्र्याच्या अंध:कारात खितपत पडलेल्या शेतमजुरांच्या जीवनात सूर्यप्रकाशाचे किरण डोकावू लागले होते. पण स्वामीजींच्या बोलण्यातून आत्मकर्तृत्वाचा शब्दही डोकावत नव्हता. आपल्या संन्यस्त धर्माला शोभेल अशा वृत्तीने ते फक्त राजकारणातूनच नव्हे; तर आपल्या राजकीय कर्तृत्वाच्या स्मृतींपासूनही पूर्णत: विरक्त झाले होते. तुकारामांच्या 'संसारा आगी लावोनिया हाती, वळुनी मागुती पाहू नये' या उक्तीप्रमाणे पूर्वकर्तृत्वाकडे वळूनही त्यांनी कधी पाहिले नाही.

निजामी राजवटीत गांधीप्रणीत सर्व चळवळींवर सरकारचे निर्बंध होते. तरी १९३१ मध्ये जवाहरलाल नेहरूंच्या हस्ते पहिल्या खादी भांडाराचे उद्घाटन झाले.

१५ एप्रिल १९५१ मध्ये स्वामीजींच्या अध्यक्षतेखाली 'हैदराबाद खादी समिती' स्थापन करण्यात आली. आणि खादीच्या व्यवस्थापनाचे कार्य स्वामीजींनी स्वीकारले. त्यामुळे तेलंगणच्या भागात मेहनतीवर जगणाऱ्या सामान्य मजुरांना आर्थिक दिलासा मिळाला. हैदराबाद शहरातील अनेक मुस्लिम स्त्रियांना अंबर चरख्यावर सूतकताई करण्याचे काम मिळाले आणि त्या स्त्रियांना दोन रुपये मजुरी दररोज मिळू लागली. १९५२-५३ मध्ये राज्यात ८ लक्ष रुपयांची खादी विक्री झाली होती. ती पाच वर्षात २२ लक्ष रुपयांवर गेली. पहिल्या वर्षी ३ लक्ष वार खादीचे उत्पादन होत होते. पाच वर्षानंतर २५ लक्ष वार खादी उत्पादित होऊ लागली. १ मे १९६७ पासून मराठवाड्याचे खादी उत्पादनाचे काम स्वतंत्रपणे सुरू झाले. हैदराबादला भाग्यनगर खादी समिती व्यवस्थापनाचे कार्य करू लागली. औसा, उमरगा, नांदेड, बीड, उदगीर अशा अनेक ठिकाणी धडाक्यात खादी उत्पादनाचे काम सुरू झाले.

मराठवाड्यातील खादी चळवळीची अजून एक महत्त्वाची लक्षणीय फलश्रुती होती. स्वामीजींचे निष्ठावंत सहकारी स्टेट काँग्रेसचे कार्यकर्ते आणि नांदेडचे वकील नागनाथराव परांजपे यांनी विज्ञानाच्या अंगाने प्रयोग करून शाईमुळे ज्या कागदावर परिणाम होत नाही, जो शिसाच्या रसाच्या उष्णतेमुळे खराब होत नाही असा कागद तयार केला. विद्युत रोधनासाठी वापरला जाणारा कागदही नांदेडला तयार होऊ लागला. या वैज्ञानिक संशोधनाने खादी चळवळीला विज्ञान युगाला सन्मुख केले. ही क्रांतिकारक घटना होती.

स्वामीजींनी स्वातंत्र्याची प्रेरणा देण्यासाठी शिक्षण कसे उपकारक ठरते ते अनुभवले होते. स्वातंत्र्यानंतर सुसंस्कृत जबाबदार नागरिक घडविण्यासाठी शिक्षण उपयोगी पडेल अशी स्वामीजींची श्रद्धा होती. शिक्षण व शिक्षणसंस्थांची उभारणी या गोष्टीत स्वामीजींना विशेष आस्था होती. म्हणून हैदराबाद मुक्त झाल्यानंतर त्यांनी शिक्षणक्षेत्राकडे विशेष लक्ष देण्यास प्रारंभ केला. पोलिस कारवाईपर्यंत मराठवाड्यात इंटरपर्यंत शिक्षण देणारे एकमेव महाविद्यालय औरंगाबाद येथे होते. तेथे पदवीपर्यंतचे वर्ग वाढावेत या दृष्टीनी स्वामीजींनी प्रयत्न केले. सीताराम पप्पू, म. द. पाध्ये यांच्या सहकार्याने १९५० मध्ये नांदेड येथे पीपल्स कॉलेजची स्थापना केली.

मराठवाड्यासाठी स्वतंत्र विद्यापीठ स्थापन व्हावे अशी अनेक वर्षापासून या भागातील लोकांची इच्छा होती. स्वत: स्वामीजीही स्वतंत्र विद्यापीठ मागणीला नुसते

अनुकूलच नव्हे; तर त्या दृष्टीने प्रयत्नशील होते. या संदर्भात मराठवाड्याचे प्रतिनिधी तत्कालीन शिक्षणमंत्री हितेन्द्र देसाई यांना भेटलेही होते. २७ एप्रिल १९५७ रोजी न्या. श्रीपतराव पळनीटकर यांच्या अध्यक्षतेखाली विद्यापीठ स्थापनेसाठी एक समिती नेमण्यात आली.

मराठवाड्यात विविध शाखांचे शिक्षण देणारी महाविद्यालये स्थापन झाल्याखेरीज विद्यापीठ स्थापनेच्या मागणीला तसा अर्थ नाही हे लक्षात घेऊन स्वामीजींनी पूर्वीच हैदराबाद राज्याचे शिक्षणमंत्री श्री. गोपाळराव एकबोटे यांच्याकडून नांदेडला आयुर्वेद महाविद्यालय आणि परभणीला कृषी महाविद्यालय मंजूर करवून घेतले. आणि ती महाविद्यालये सुरूही झाली होती. राष्ट्रीय चळवळीच्या मागे सदैव उभे असणारे लातूरचे धनिक पूरणमलजी लाहोटी यांच्या स्मरणार्थ लातूरला एक तंत्र शिक्षण महाविद्यालय काढावे अशी सूचना स्वामीजींनी मांडली. स्वामीजींच्या स्नेहीमंडळींना ही कल्पना मनोमन आवडली. कामाला गती आली. स्वामीजींचा समावेश असलेले विश्वस्त मंडळ नेमण्यात आले. आणि तंत्र शिक्षण महाविद्यालयास प्रारंभ झाला.

स्वामीजींच्या सूचनेवरूनच अंबाजोगाईच्या शिक्षणसंस्थेने २९ जून १९५६ रोजी विज्ञान महाविद्यालय सुरू केले. नंतर आर्टस्, कॉमर्स शाखांचे वर्गही सुरू करण्यात आले. वाढती विद्यार्थिसंख्या लक्षात घेऊन नंतर प्रत्येक शाखेचे महाविद्यालय वेगळे करण्यात आले.

या शिक्षण संस्थांमधून निवडले जाणारे शिक्षक विषयात तज्ज्ञ असतील याची दक्षता घेण्यात काही वावगे नव्हते. पण स्वामीजी या शिक्षकांच्या ठिकाणी सामाजिक बांधिलकी आहे काय याचीही चाचपणी करीत. शिक्षण संस्थांचा खर्च काटकसरीने चालला पाहिजे याबद्दल दक्ष असत. भव्य टोलेजंग इमारती बांधण्याऐवजी उपयुक्ततेची दृष्टी ठेवून त्या बांधल्या जातील याकडे स्वामीजी जातीने लक्ष देत. मुळातच मराठवाडा शैक्षणिक दृष्ट्या मागासलेला होता. त्यातून मुलींच्या शिक्षणाचे प्रमाण कमी होते. हे लक्षात घेऊन स्वामीजींनी मुलींच्या शिक्षणाला अनुकूल वातावरण निर्माण व्हावे या दृष्टीने जाणीवपूर्वक प्रयत्न केले. नांदेडच्या पीपल्स कॉलेजमध्ये स्वामीजींनी धोंडो केशव कर्व्यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त त्या वर्षात महाविद्यालयात प्रवेश घेणाऱ्या मुलींना त्या महाविद्यालयात असेपर्यंत मोफत शिक्षण द्यावे असा प्रस्ताव मांडला आणि कार्यकारिणीने तो प्रस्ताव मंजूर केला.

मराठवाड्यासाठी स्वतंत्र विद्यापीठ स्थापन व्हावे अशी मागणी अगदी प्रथम स्वामीजींनी केली. हैदराबादच्या तत्कालीन सरकारसमोरही स्वामीजींनी ही मागणी आग्रहपूर्वक मांडली होती. १९५९ मध्ये मराठवाडा विद्यापीठ प्रत्यक्ष अस्तित्वात आले. औरंगाबाद हे मराठवाड्याचे शैक्षणिक केंद्र झाले. निजामी राजवटीपासून शैक्षणिक सोयीसाठी आसुसलेल्या मराठवाड्यातील तरुणांना शिक्षणाची कवाडे स्वामीजींच्या प्रयत्नांमुळे सताड उघडी झाली. याचे श्रेय निर्विवादपणे स्वामीजींकडे जाते. हे ऋण व्यक्त करण्यासाठी मराठवाडा विद्यापीठाने कार्यकारिणीचे सदस्य ॲड. नरेंद्र चपळगावकर यांच्या सूचनेचे स्वागत करून १० फेब्रुवारी १९७० रोजी स्वामीजींना 'डॉक्टर ऑफ लॉज' ही सन्मानदर्शक पदवी देऊन स्वामीजींचा गौरव केला.

स्वामीजी शिक्षण, खादी, ग्रामोद्धार अशा विविध विधायक कार्यामध्ये गुंतले होते. वेगवेगळ्या संस्था उभ्या राहिल्या होत्या. त्या उद्दिष्टांनुसार वाटचाल करीत होत्या. हळूहळू स्वामीजी अंतर्यामी विधायक कार्याच्या लिप्ताळ्यातूनही मुक्त होत होते. त्यांचे मन पुन्हा चित्तशुद्धी, आत्मशुद्धी या प्रांताकडे वळू लागले होते. या स्थितीबद्दल त्यांनी लिहिले आहे की, ''आता सांधा बदलला आहे. गूढतर अशा एकांतात राहण्याची मला आंतरिक प्रेरणा होऊ लागली आहे. याचा अर्थ कोणत्याही कार्याचा अभाव असा नाही. पण त्या कार्याचे रूप बदलण्याची शक्यता आहे.'' निवृत्तीची भावना उत्तरोत्तर तीव्र होत होती. रामतीर्थांच्या आश्रमाची स्वामीजींना अतीव ओढ वाटू लागली होती आणि १९६५ मध्ये आंध्र प्रदेशातील पूर्वगोदावरी जिल्ह्यात काकीनाडापासून जवळच असलेल्या पीठापूरम् येथील रामतीर्थांच्या आश्रमाकडे स्वामीजींनी प्रयाण केले.



# शांति-आश्रम

स्वामी रामतीर्थ ही स्वामी रामानंद तीर्थ यांची आध्यात्मिक चेतना होती. आत्मशुद्धीच्या मार्गावरची प्रकाशज्योत होती. त्यांचा आश्रम स्वामीजींसाठी कैवल्यनिधान होते. स्वामी ओंकार यांनी पीठापुरम् येथे उभारलेला 'शांति-आश्रम' रामतीर्थांच्या विचारांनी प्रभावित झालेल्या व्यक्तीने स्थापन केलेले चिंतनगृह म्हणून देशभर परिचित होता.

स्वामीजींना स्वामी ओंकार आणि शांति आश्रम यांच्याबद्दल नारायण-स्वामींकडून बरीच माहिती मिळाली होती. आश्रमातर्फे चालवल्या जाणाऱ्या Peace या इंग्रजी मासिकात स्वामीजींनी बरेच लेखन केले होते. स्वामी ओंकार यांचा औपचारिक परिचयही होता.

१९६३ मध्ये स्वामी ओंकार आजारी असताना स्वामीजी त्यांना भेटण्यास गेले. या भेटीत स्वामी ओंकारांनी स्वामीजींना शांति-आश्रमात येण्याचे निमंत्रण दिले. १९६४ च्या ऑगस्ट महिन्यात स्वामीजी दहा दिवसांसाठी शांति आश्रमात जाऊन राहिले. आश्रमात प्रार्थना हाच उपासनेचा एकमेव मार्ग होता. आतापर्यंतचे स्वामीजींचे आयुष्य वेगवेगळे प्रश्न, तणाव, राजकीय उलाढाली या गर्तेतच गेले होते. शांति आश्रमातील प्रसन्न, निवांत वास्तव्य स्वामीजींना शांतपणे गतायुष्याकडे वळून पाहण्याची संधी देणारे होते. आत्मशोधाचा सतत प्रयत्न करू पाहणाऱ्या स्वामीजींना येथील वातावरण चिंतनाला उद्युक्त करणारे होते.

येथल्या वास्तव्यात स्वामीजी आपल्या चिंतनातून या निर्णयापर्यंत आले होते की, विज्ञान आणि आध्यात्मिकता यांची सांगड घालणे नितांत आवश्यक आहे.

अशी सांगड घातली नाही तर मानवजातच नष्ट होऊ शकेल. म्हणून विज्ञान आणि अध्यात्म यांना मानवजातीच्या हितासाठी हातात हात घालून वाटचाल करणे आवश्यक आहे. या विचारांचा पाठपुरावा करणारी ''स्वामी रामतीर्थ इन्स्टिटयूट ऑफ पीस'' ही संस्था स्वामीजींनी २१ जानेवारी १९६७ रोजी स्वामी ओंकारांच्या जन्म दिनी स्थापन केली. या संस्थेचे उद्घाटन श्री जयप्रकाश यांच्या हस्ते करण्यात आले. देशातील समाजसेवा करू इच्छिणाऱ्या तरुणांना पितापुरम् आश्रमात एकत्रित आणावे. त्यांच्यावर विज्ञान आणि अध्यात्म यांचे संस्कार करावेत या दिशेने स्वामीजी या संस्थेच्या माध्यमातून प्रयत्न करीत होते. या संस्थेचा अभ्यासक्रम स्वामीजींनी जयप्रकाशजी आणि विनोबाजी यांच्याशी चर्चा करून तयार केला. प्रारंभी तीन महिने व एक वर्ष कालावधीचे वर्ग सुरू करण्यात आले. नंतर या संस्थेच्या वतीने दक्षिण भारत हिंदी प्रचारसभेची आंध्र प्रदेश शाखा, पूर्व गोदावरी व आजूबाजूच्या जिल्ह्यांतील ग्रामपातळीवरचे कार्यकर्ते, खादी ग्रामोद्योग क्षेत्रातील कार्यकर्ते यांच्यासाठी आठदहा दिवसांची उद्‌बोधन शिबिरे घेण्यात येत. स्वत: स्वामीजी या वर्गामध्ये व्याख्याने देत.

दक्षिणेप्रमाणेच उत्तेरतही स्वामी रामतीर्थांचा मोठा शिष्यसंप्रदाय होता. लालबहादुर शास्त्री, संपूर्णानंद हे रामतीर्थांच्या शिष्यवरांपैकी होते. या सर्वांना एकत्र आणून स्वामी रामतीर्थ मिशन देशभर सक्रिय करण्याचा स्वामीजींचा मानस होता. लखनौ येथे स्वामी रामतीर्थांचा मुख्य आश्रम आहे. तेथे उपलब्ध असलेले रामतीर्थांचे वाङ्मय प्रकाशित करण्याची योजना स्वामीजींनी लखनौ येथे कार्यान्वित केली.

१९६८ च्या दरम्यान स्वामीजींची प्रकृती बिघडली. काही दिवस हैदराबाद येथे येऊन बेगमपेठला त्यांनी विश्रांती घेतली. हिंडता फिरता येऊ लागल्यावर ते पीठापुरमला परतले. पण प्रकृती ठणठणीत बरी होत नव्हती. किरकोळ कुरबुरी सुरूच होत्या.

दिवसेंदिवस स्वामीजी थकत चालले होते. इच्छाशक्ती प्रबळ होती. परंतु शरीर दिवसेंदिवस झिजत चालले होते. ऑगस्ट १९७१ मध्ये त्यांना हृदयविकाराचा झटका आला. हैदराबादच्या उस्मानिया हॉस्पिटलमध्ये उपचार घेतल्यानंतर त्यांनी काही दिवस अंबाजोगाईत विश्रांती घेतली. नंतर ऑक्टोबर महिन्यात शांति-आश्रमात परतले. स्वामीजींचा मुक्काम अखेरचाच ठरावा अशी नियतीने जणू योजना केली होती.

स्वामीजी आश्रमात परतले. शरीर क्षीण होत चालले होते. मुळातच त्यांची शरीरयष्टी कृश होती. पायाच्या पंगुत्वाने अनेक वर्षांपासून सोबत केली होती. वरचेवर बिघडणाऱ्या प्रकृतीमुळे शरीर मनाप्रमाणे काम करेनासे झाले होते. असेच काही दिवस लोटले. आणि पुन्हा अस्वस्थ वाटू लागले. चारपाच दिवस तातडीने उपचार घेतल्यानंतर पुढील उपचारांसाठी स्वामीजी हैदराबादला परतले. त्यांचे सहाय्यक दामोदर पांगरेकरांनी स्वामीजींना सुलतान बाजार येथील खादी भांडारात आणले. साधी हालचाल करतानाही स्वामीजींना त्रास होत होता. उस्मानिया हॉस्पिटलमध्ये स्वामीजींना दाखल करण्यात आले. स्वामीजींच्या आजाराची बातमी कळताच कार्यकर्ते जमू लागले. पांगरेकर, काशीनाथ जोशी आळीपाळीने स्वामीजींसोबत असत. स्वामीजींचे बंधू बेथूजी गुरुजी काही दिवस येऊन राहिले. स्वामीजींचे हैदराबाद लढ्यातील सहकारी आणि आंध्राचे मुख्यमंत्री असलेले पी. व्ही. नरसिंहराव एकदोन दिवसाआड येऊन भेटून जात. त्यांनी अद्ययावत उपचार उपलब्ध करून देण्याचे आदेश डॉक्टरांना दिले. स्वामीजींचे शरीर कुठल्याच उपचारांना दाद देत नव्हते. क्षणोक्षणी शरीर अधिकाधिक अशक्त होत होते. स्वामीजींच्या मिटलेल्या डोळ्यांसमोर जणू गतायुष्यातल्या घटना एखाद्या चित्रपटातल्या रीळासारख्या उलगडत जात असाव्या. तेलंगणातल्या दौऱ्यात पी. व्ही. नरसिंहराव यांच्या आवाजात ऐकलेला मालकंस राग... नांदेडच्या पीपल्स कॉलेजच्या मदतीसाठी हैदराबाद येथे झालेल्या कार्यक्रमातील लता मंगेशकरांचे झुळझुळणारे स्वर..... हिप्परग्याला संन्यास धर्माची दीक्षा घेतली तो ओढ्याचा काठ.. औदुंबर... निकराने लढलेला हैदराबाद मुक्तिसंग्राम... सहकाऱ्यांच्या कडूगोड आठवणी..... गांधीजींच्या सहवासातले क्षण.. नेहरूंचा अश्वासक स्नेह आणि त्यांचे रागलोभ... आपल्या शब्दांवर विसंबून स्वातंत्र्य लढ्यात जीवावर उदार होऊन उडी घेणारे असंख्य कार्यकर्ते.... जणू पूर्वायुष्याचा ताळेबंदच मिटल्या डोळ्यांनी स्वामीजी मांडत होते. खाटेजवळ गीतेची प्रत होती. रामतीर्थांचा In woods of God-Realization हा ग्रंथ होता. पण वाचण्याचे श्रम होत नव्हते. १९ जानेवारी १९७२ रोजी त्यांना हॉस्पिटलमधून खादी भांडारात आणण्यात आले. पुन्हा प्रकृती बिघडल्यामुळे २२ तारखेस हॉस्पिटलमध्ये हलविण्यात आले. अंतिम क्षण समीप येतो आहे हे जवळपास सर्वांच्या लक्षात आले होते. सकाळीच राज्यपाल खंडुभाई देसाई, मुख्यमंत्री पी. व्ही. नरसिंहराव, डॉ. मेलकोटे, दिगंबरराव बिंदू वगैरे मंडळी हॉस्पिटलमधून स्वामीजींना भेटून जड अंतःकरणाने

परतली होती.

सूर्य आभाळात चढत होता. मध्यान्हाकडून पश्चिमेकडे हळूहळू मार्गक्रमणा करू लागला आणि इकडे हॉस्पिटलमध्ये स्वामीजींची प्राणज्योत दुपारी ३.३० वाजता मालवली. २२ जानेवारी १९७२ हा दिवस हैदराबाद शहराला शोक सागरात लोटणारा ठरला.

मावळतीच्या दिशेने जाणाऱ्या सूर्याच्या पाठोपाठ एक परिव्राजक अंतहीन यात्रेला निघाला होता. त्याची पावले अज्ञाताच्या दिशेने पडत होती.

२३ तारखेस सकाळी स्वामीजींची अंत्ययात्रा खादी भांडारापासून निघाली. आंध्र, कर्नाटक, महाराष्ट्र प्रदेशातील स्वातंत्र्य लढ्यातील जुने सहकारी शोकाकुल भावनेने अंत्ययात्रेत सहभागी झाले होते. बेगमपेठ येथील स्वामीजींच्या निवासस्थानाच्या आवारात समाधिसंस्कार करण्यात आले. आंध्र प्रदेश सरकारने हा अंत्यविधी सरकारी इतमामात केला. आंध्र मंत्रिमंडळातील अनेक मंत्री यावेळी हजर होते.

एक पर्व संपले. अगणित जनमानसाच्या ठिकाणी स्वातंत्र्योर्मींना जन्म देऊन मृत्यूच्या कुशीत जाणाऱ्या स्वामीजींच्या जीवनकार्याची नोंद इतिहास चक्राने केली.

....काळाचा अखंड प्रवास पुढे पुढे सरकतच राहिला.



# 'विदवत्-संन्यासी' : स्वामीजी

स्वामीजींनी आपल्या आठवणीत असे लिहिले आहे. ''संन्यासी असून राजकारणाच्या भोवऱ्यात मी कसा ओढला गेलो? असा प्रश्न पुष्कळांनी मला अनेकदा विचारला आहे. मला वाटते ही पृच्छा रास्तच आहे. संन्याशाने असल्या गोष्टींपासून अलिप्त राहिले पाहिजे असा दृढ समज आहे.'' एक सर्वसामान्य समजूत अशी आहे की, संन्यासी हा सर्वसंगपरित्यागी असतो. सर्व ऐहिक लोभ-आकांक्षा यांच्यापासून तो मुक्त असतो. त्याने आपले जीवन ईशसाधना, मोक्षप्राप्ती यांच्यामध्ये व्यतीत करावे. त्याने निःसंग, विरक्त, निवृत्त असावे. राजकारण तर पूर्णतः ऐहिक इच्छा-आकांक्षाशी निगडित असते. प्रवृत्तिपर असते. म्हणून संन्याश्याने राजकारणात पडण्याचे काहीच कारण नाही. मग स्वामीजी संन्यासी असूनही राजकारणात कसे आले?

भारतातच नव्हे; तर संपूर्ण जगात संन्याशांच्या दोन परंपरा असल्याचे दिसून येते. एक परंपरा अशी की, आपले जीवन परमेश्वराला समर्पित करावे, आपल्या परमेश्वर भक्तीचे स्वरूप सर्वसाधारण भक्तापर्यंत पोहचवावे. दुःखी माणसांना दुःखमुक्त करण्यासाठीच आपले आयुष्य वेचावे असे मानणारी निवृत्तिवादी संन्याशांची ही परंपरा आहे.

या शिवाय संन्यांशांची दुसरी एक परंपरा आहे. या परंपरेतील साधू-संन्यासी यांची ईश्वरावर दृढ श्रद्धा असतेच; स्वार्थातून मुक्त होण्याचे त्यांचे प्रयत्नही सुरूच असतात. पण त्याचबरोबर या संन्याशांना सामाजिक दायित्वाचेही भान असते. हे जगच परमेश्वरस्वरूप आहे. या जगातील मानवाची सेवा हीच ईश्वरसेवा आहे असे

या परंपरेतील संन्याशांना वाटते. मानवाला दु:खमुक्त करून त्याचे कल्याण साधण्याचा प्रयत्न करणाऱ्या कोणत्याही सामाजिक, राजकीय चळवळी असोत त्यांना मार्गदर्शन करणे, योगदान करणे हे आपले कर्तव्यच आहे असे ही परंपरा मानते. या परंपरेतील संन्यासी स्वार्थाचा त्याग करून वैयक्तिक जीवनाची उभारणी वैराग्यावरच करण्याबाबत प्रयत्नशील असतो. या बाबतीतील आपली सेवा मानवसेवेतच सफल झाली पाहिजे या दृष्टीने या परंपरेतील संन्यासी लोकसेवेची जबाबदारी अंगावर घेऊन ती पार पाडण्यासाठी देह व मन झिजवतात. भारतीय परंपरेत विद्यारण्य माधवाचार्य, गुरु गोविंदसिंह, समर्थ रामदास, विवेकानंद, रामकृष्ण परमहंस हे सत्पुरुष याच दृष्टीने कार्यरत असल्याचे दिसून येते. आधुनिक भारतामध्ये हजारो भारतीयांना राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठी जीवित अर्पण करण्याची प्रेरणा स्वामी दयानंद, स्वामी विवेकानंद, स्वामी रामतीर्थ यांनी दिली. स्वामी रामानंद तीर्थांच्या संन्यस्त धर्माचे नाते या दुसऱ्या परंपरेशी आहे. याच परंपरेतील स्वामी रामतीर्थ यांचे शिष्य नारायणस्वामी यांच्याकडून स्वामी रामानंद तीर्थांनी संन्यास धर्माची दीक्षा घेतली होती.

स्वामीजींनी १९३२ मध्ये हिप्परगा येथे संन्यास धर्माची दीक्षा घेतली. ही दीक्षा देताना नारायणस्वामींनी कुटीचक, बहुदक, हंस, परमहंस हे संन्यासप्रकार टाळले. हे सर्व संन्यासप्रकार आचारधर्माशी, बहिरंगाशी संबंधित व त्यावर आधारलेले आहेत. नारायण स्वामींनी हे संन्यासप्रकार सोडून दूरदर्शीपणाने स्वामीजींसाठी विदवत्-संन्यासाची योजना केली. फळाची आशा न करता केलेली कर्मे म्हणजे काम्यकर्माचा ज्याने त्याग केला आहे तो खरा संन्यासी होय. अशा संन्याशाला विद्वत-संन्यासी म्हणतात. या संन्यासाचा संबंध मनाच्या अवस्थेशी आहे. बाह्य जीवनाचे परिवेष, नियम, कर्मकांड यांच्याशी नाही. स्वामीजींनी कधीच पूजा-अर्चा, कर्मकांड, देवदर्शन वगैरे प्रकार केले नाहीत. या संन्यास धर्माचा महत्त्वाचा आचारधर्म म्हणजे निरासक्त वृत्तीने मानवधर्माची सेवा करणे होय. संन्यास घेतल्यानंतर स्वामीजींनी जनता हाच माझा परमेश्वर आणि जनसेवा हीच ईश्वरसेवा हे ब्रीद आयुष्यभर पाळले. एकांतात असताना ते भगवद्गीता वाचत. प्रारंभीच्या काळात अमृतराय, सूरदास, मीराबाई यांची पदे म्हणत. इतकाच काय तो अध्यात्माचा आणि धर्मप्रवणतेचा प्रभाव स्वामीजींवर होता.

स्वामीजींना बालपणापासून साधू-बैरागी यांचे आकर्षण होते. त्यांचे वडील भवानराव यांच्या आध्यात्मिक वृत्तीचे संस्कार स्वामीजींवर बालपणीच झाले होते.

शिक्षणासाठी जेव्हा ते सोलापूरात आले तेव्हा त्यांचा खऱ्या अर्थाने बाहेरच्या जगाशी संबंध आला. देश गुलामगिरीत खितपत असल्याचे भान आले. लोकमान्य टिळकांचे भाषण ऐकण्याचे भाग्य लाभले. गांधीजींचे दर्शन झाले. मनात राष्ट्रीय वृत्तीचे बीज रोवले गेले. गुलामगिरीविरुद्ध बंड करून उठण्याची प्रेरणा लाभली. आपले आयुष्य देशसेवेसाठी घालविण्याचा स्वामीजींनी निश्चय केला. त्यांच्या मूळच्या आध्यात्मिक वृत्तीला राष्ट्रीय वृत्तीची, देशप्रेमाची जोड लाभली. याच वयात स्वामीजींची आत्मशुद्धीची धडपड सुरू झाली होती. त्या दिशेने ते प्रयत्नही करीत होते. याच काळात महात्मा गांधीजींचे व्यक्तित्व आणि त्यांचे लेखन यांचा स्वामीजींच्या व्यक्तिमत्त्वावर सखोल परिणाम झाला. नैतिक राजकारणाचे महत्त्व उमगले. अहिंसा हे केवळ धोरण नसून जीवननिष्ठा आहे हा संस्कार मनावर झाला. राजकारणातील नैतिकतेचे महत्त्व आणि अहिंसेचा जीवननिष्ठा म्हणून स्वीकार या गांधीजीप्रणित मूल्यांचा स्वामीजींच्या राजकारणावर फार मोठा प्रभाव पडला. किंबहुना स्वामीजींच्या राजकारणाचा तो प्रेरणास्रोत होता.

तात्कालिक लाभासाठी राजकीय तडजोड न करता सद्सद् विवेकबुद्धीला पटेल अशीच भूमिका घेणे आणि त्यांच्या परिणामांची तयारी ठेवणे ही नैतिक भूमिका घेऊन स्वामीजींनी नेहरूंचा विरोध पत्करूनही भाषावार प्रांतरचनेचा आग्रह धरला. वास्तविक नेहरू स्वामीजींचे पाठीराखे होते. पंतप्रधानपदी होते. आपल्या सद्सद्विवेकबुद्धीला मुरड घालून स्वामीजींनी राजकीय सोय म्हणून काहीशी तडजोड पत्करली असती तर भविष्यात काही राजकीय लाभ स्वामीजींच्या पदरात पडण्याचा संभव होता. पण स्वामीजींनी सद्सद्विवेकबुद्धीचा कौल महत्त्वाचा मानला. त्यांच्या राजकारणात सत्तेच्या मोहाला यत्किंचितही स्थान नव्हते.

स्वामीजींनी आपले आयुष्य समाजसेवा आणि देशसेवा यांच्यासाठी वेचण्याचे ठरवले तेव्हा आपले जीवन नि:स्वार्थ, निरीच्छ, मोहमुक्त असले पाहिजे. पूर्णवेळ देशसेवेत घालवायचा असेल तर कुठल्याही प्रकारचे पाश असता कामा नयेत असे त्यांना प्रकर्षाने वाटू लागले. त्यासाठी संन्यास उपयुक्त ठरू शकेल असे त्यांचे मत झाले. आणि त्यांनी संन्यास घेण्याचा निर्णय घेतला. ईशप्राप्ती, मोक्षप्राप्ती यांच्यासाठी त्यांनी संन्यास घेतलेला नाही हे सतत लक्षात ठेवावे लागते.

स्वामीजींच्या व्यक्तिमत्त्वाच्या जडणघडणीत बालपणापासूनच वैराग्य, निवृत्तिपरता या घटकांचा फार मोठा प्रभाव होता. या प्रवृत्तींमधूनच स्वामीजी गांधीजींची विचार प्रणाली, त्यांनी सांगितलेल्या साधनेकडे आकर्षित झाले.

गांधीजींच्या गांधीवादातच स्वामीजींना आपल्या अध्यात्माची आणि निवृत्तीची परिपूर्णता जाणवली. गांधीवादी विचारप्रणालीच्या प्रभावातून समाजाचा पायाभूत घटक असणारा माणूस मूलतः सद्भावनेचा वाहक आहे अशी स्वामीजींची धारणा झाली होती. आध्यात्मिक भाषेत याचेच वर्णन परमेश्वरी अंश अथवा चैतन्य असे केले जाते. स्वामीजी प्रत्येक मनुष्यमात्रात एकाच परमेश्वराचा अंश आहे असे मानत. स्वामीजींच्या ठिकाणी असलेल्या या जाणिवेचा एक परिणाम असा झाला की, हैदराबादचा मुक्तिसंग्राम हा फक्त हिंदूंचा स्वातंत्र्यसंग्राम झाला नाही, तर जे जे शोषित, पीडित, अन्यायग्रस्त, गुलामीत पिचलेले आहेत- मग ते हिंदू असोत वा मुस्लिम असोत- या सर्वांसाठी दिलेला मुक्तिलढा झाला. या लढ्याचे स्वरूप हिंदू विरुद्ध मुस्लिम असे झाले नाही. तर या लढ्याला एक व्यापक अधिष्ठान लाभले. याचे संपूर्ण श्रेय स्वामीजींच्या नेतृत्वाला जाते. स्वामीजींचे नेतृत्व संस्थानातील जनतेने किती मनोमन स्वीकारले होते याचे प्रत्यंतर याच लढ्यात आले. वास्तविक हैदराबाद मुक्तिलढ्याला हिंदु-मुस्लिम लढ्याचे स्वरूप यावे असे वातावरण संस्थानात होते. राजा मुस्लिम होता. त्याने हिंदूंवर ते केवळ हिंदू आहेत या कारणामुळेच अनेक जाचक निर्बंध लादले होते. हिंदूंच्या सणांवर, व्रतवैकल्यांवर बंधने आणली होती. शेवटी शेवटी रझाकार संघटनेने संस्थानातील हिंदूंवर अनन्वित अत्याचार केले. अगणित प्राणहत्या, वित्तहानी केली होती. तरीही स्वामीजींचा आदेश शिरसावंद्य मानून लढ्यात सहभागी झालेल्या हजारो नागरिकांनी या लढ्याचे स्वरूप नागरिक हक्कांच्या प्राप्तीसाठी दिलेला लढा असेच ठेवले. स्वामीजींचे नेतृत्व संस्थानातील जनतेने किती अंतःकरणपूर्वक स्वीकारले होते हे यावरून लक्षात येऊ शकेल. स्वामीजींच्या राजकीय, सामाजिक विचारप्रणालीचा पाया स्वातंत्र्य, शोषणमुक्त समाजरचना या उद्दिष्टांतून घडला होता. ही उद्दिष्टे गांधीवादी विचार प्रणालींचा अवलंब करूनच प्राप्त करून घेता येतील यावर त्यांची नितांत श्रद्धा होती. अहिंसेचे तत्त्व स्वामीजींनी जीवननिष्ठा म्हणून स्वीकारले होते. त्यासाठी सर्वस्वाचे बलिदान करण्याची त्यांची मानसिक तयारी होती. मूळची विरक्त वृत्ती, 'स्व' बद्दलची उदासीनता, विद्वत् संन्यासामुळे अंगी बाणलेली फलाची अपेक्षा न धरता कार्य करण्याची वृत्ती या गुणवैशिष्ट्यांमधूनच त्यांच्या जीवनकार्याची वाटचाल झाल्याचे दिसून येते. शोषणमुक्त समाजरचनेच्या निष्ठेतूनच स्वामीजींनी तेलंगणाच्या जमिनीच्या मालकीच्या प्रश्नांवर कुळांची बाजू घेऊन कुळकायद्याचा आग्रह धरला. या प्रश्नी स्वामीजींना परंपरावादी सरंजामदार,

जमीनदार यांचा कडवा विरोध पत्करावा लागला. कम्युनिस्टांच्या हिंसक चळवळीने पेटलेल्या तेलंगणच्या ग्रामीण भागातून, खेड्यापाड्यांतून स्वामीजी जीवाची तमा न बाळगता फिरले. एकीकडे कम्युनिस्टांची दहशत तर दुसरीकडे भारतीय लष्कर आणि पोलिस यांची दडपशाही या कोंडीत दडपला गेलेला ग्रामीण शेतमजूर स्वामीजींनी आपल्या वैशिष्ट्यपूर्ण गांधीवादी पद्धतीने पुनरुज्जीवित केला.

स्वामीजींच्या संन्यासी वृत्तीची जडणघडण स्वामी विवेकानंद, रामकृष्ण परमहंस, स्वामी रामतीर्थ यांच्या वैचारिक संस्कारांमधून झाली होती. या सत्पुरुषांच्या विचारप्रणालींमध्ये राष्ट्र प्रेम आणि सामाजिक दायित्व यांना मध्यवर्ती स्थान होते. या संस्कारांना गांधीवादी विचारप्रणालीची जोड लाभल्यामुळे स्वामीजींच्या राजकारणाला, समाजकारणाला अहिंसा, नैतिकतेवर अधिष्ठित राजकारण, मूल्यनिष्ठा यांचे भक्कम अधिष्ठान लाभले. संपूर्ण आयुष्य शोषणमुक्त मानवी समाजाचे एकात्म दर्शन भारतीय समाजाच्या रूपाने घडावे या ध्येयाने प्रेरित होऊन आयुष्याचा क्षण न् क्षण स्वामीजींनी वेचला. आणि जुने वस्त्र टाकून नवे वस्त्र धारण करावे इतक्या सहजपणे या विद्वत्-संन्याशाने आपला पार्थिव देह येथेच सोडला.

✿

# स्वामी रामानंद तीर्थ यांचा संक्षिप्त जीवनपट

१९०३ : ३ ऑक्टोबर रोजी सिंदगी (जि. विजापूर) येथे जन्म. सिंदगी व गाणगापूर येथे प्राथमिक शिक्षण. सोलापूर येथील नॉर्थकोर्ट हायस्कूलमध्ये माध्यमिक शिक्षण. याच काळात लोकमान्य टिळक यांच्या भाषणाने प्रभावित होऊन राष्ट्रसेवेसाठी जीवन समर्पित करण्याचा दृढ निश्चय.

१९२१ : मुंबई विद्यापीठाच्या मॅट्रिक परीक्षेऐवजी टिळक महाराष्ट्र विद्यापीठाची प्रवेश परीक्षा देऊन जुलैमध्ये उत्तीर्ण व अंमळनेर येथील राष्ट्रीय महाविद्यालयात प्रवेश. या वास्तव्यात महात्मा गांधी, स्वामी विवेकानंद, स्वामी रामतीर्थ यांचे ग्रंथ वाचून त्यांच्या विचारांनी प्रभावित. वादविवाद सभा स्थापन करून त्या सभेत भाषणे. चरख्यावरील सूतकताई, स्वयंसेवक दल, संचलन यात सहभाग.

१९२३ : अंमळनेरच्या राष्ट्रीय महाविद्यालयातून इंटर परीक्षा उत्तीर्ण. पुढील शिक्षणासाठी पुण्याच्या टिळक महाराष्ट्र विद्यापीठात प्रवेश.

१९२४ : टिळक महाराष्ट्र विद्यापीठाची 'वाङ्मय विशारद' पदवी प्रथम श्रेणीत उत्तीर्ण.

१९२६ : टिळक महाराष्ट्र विद्यापीठाची 'वाङ्मय पारंगत' पदवी प्राप्त. या पदवीसाठी 'लोकशाहीचा विकास' या विषयावर प्रबंधलेखन.

: एप्रिल महिन्यात कामगार नेते ना. म. जोशी यांच्या 'टेक्सटाईल लेबर युनियन'चे मुंबईतील उपसंघटक. नंतर ना. म. जोशी यांचे खाजगी सहाय्यक.

१९२७ : जानेवारी महिन्यात दिल्ली येथे पक्षाघाताने आजारी.

१९२८ : उपचारानंतर रुग्णालयातून मुक्तता. सोलापूर येथे कामगार संघटन. ऑगस्ट महिन्यात कापड गिरणीसमोर निरोधन. सात दिवस साध्या कैदेची शिक्षा.

१९२९ : ९ जून रोजी हिप्परगा येथील राष्ट्रीय शाळेत मुख्याध्यापक म्हणून रुजू. येथील वास्तव्यात निजामी राजवटीतील अन्याय अत्याचारांची पालकांकडून माहिती. अनंतराव कुलकर्णी यांच्या आध्यात्मिक विचारसरणीचा प्रभाव.

१९३२ : नारायण स्वामी यांच्याकडून संन्यास दीक्षा. 'स्वामी रामानंद तीर्थ' हे नवे नामकरण.

१९३५ : मार्च महिन्यात हिप्परग्याची शाळा सोडून मोमीनाबाद (अंबाजोगाई) येथे आगमन.

: मे महिन्यात अंबाजोगाई येथील योगेश्वरी नूतन विद्यालयाचे पुनरुज्जीवन.

: २० नोव्हेंबर रोजी प्रजा शिक्षण परिषदेच्या हैदराबाद येथील अधिवेशनात मॅकेंझी समितीच्या अहवालावर भाषण.

१९३७ : १ ते ३ जून रोजी महाराष्ट्र परिषदेच्या परतूड येथे झालेल्या पहिल्या अधिवेशनात उपस्थिती.

१९३८ : महाराष्ट्र परिषदेच्या लातूर येथे जूनमध्ये झालेल्या दुसऱ्या अधिवेशनात उपस्थिती. महाराष्ट्र परिषदेच्या अस्थायी समितीचे चिटणीस म्हणून निवड.

: ९ जून रोजी योगेश्वरी शिक्षण संस्थेचा राजीनामा देऊन पूर्णवेळ राजकारणासाठी हैदराबादला प्रयाण.

: २९ जुलै रोजी हैदराबाद स्टेट काँग्रेसची स्थापना करण्याचा कार्यकर्त्यांचा निर्धार.

: ७ सप्टेंबर रोजी स्थापनेपूर्वीच स्टेट काँग्रेसवर बंदी हुकूम.

: २७ ऑक्टोबर रोजी हैदराबादेत पुतली बावडीजवळ स्टेट काँग्रेसवरील बंदीहुकुमाविरुद्ध सत्याग्रह. १८ महिने सक्तमजुरी व ५० रु. दंडाची शिक्षा.

: १९ नोव्हेंबरपासून हैदराबाद संस्थानात 'वंदे मातरम्' चळवळीस प्रारंभ.

: २४ डिसेंबर रोजी गांधीजींच्या आदेशानुसार सत्याग्रह चळवळ स्थगित.

१९३९ : १० एप्रिल रोजी कारावासातून सुटका. कार्यकर्त्यांसह सेवाग्राम येथे गांधीजींची भेट. वैयक्तिक सत्याग्रह करण्यासाठी गांधीजींची अनुमती.

१९४० : ११ सप्टेंबर रोजी सुलतान बाजार येथील निवासस्थानी अटक. निजामाबादच्या तुरुंगात रवानगी.

१९४१ : १६ डिसेंबर रोजी कारावासातून सुटका.

१९४२ : ७ ते ९ ऑगस्ट रोजी मुंबई येथील अ. भा. काँग्रेस महासमिती अधिवेशनात उपस्थिती.

: ऑगस्ट महिन्यातच नागरी स्वातंत्र्याची मागणी करणारे आणि स्टेट

काँग्रेसवरील बंदी उठवण्याबाबतचे पत्र निजामाला देण्यासाठी हैदराबादला येताच नामपल्ली स्टेशनवर अटक. १६ महिने कारावासाची शिक्षा.

१९४३ : डिसेंबर महिन्यात कारागृहातून सुटका.

१९४४ : १६ ते ३० मार्च कालावधीत तरुण कार्यकर्त्यांसाठी प्रशिक्षण शिबीराचे स्टेट काँग्रेस तर्फे हैदराबाद येथे आयोजन.

१९४५ : ऑगस्टमध्ये श्रीनगर येथील अ. भा. संस्थानी प्रजा परिषदेच्या स्थायी समितीच्या बैठकीस व सोपोर येथील राष्ट्रीय परिषदेच्या अधिवेशनास उपस्थिती.

१९४६ : स्टेट काँग्रेसवरील संस्थानातील बंदीहुकूम उठवला. १९ जुलै रोजी पहिल्या जाहीर सभेचे हैदराबादेत आयोजन.

१९४७ : ११ जून रोजी निजामाची आपण भारतात सामील होणार नाही. स्वतंत्रच राहू अशी घोषणा.

: १६ ते १९ जून कालावधीत हैदराबादच्या चिक्कडपल्ली भागात झालेल्या स्टेट काँग्रेसच्या पहिल्या अधिवेशनाचे अध्यक्षपद.

: ७ ऑगस्ट रोजी 'सामिलीकरण दिवस' साजरा करून हैदराबाद स्वातंत्र्यलढ्याची सुरुवात.

: १५ ऑगस्ट रोजी भारताला स्वातंत्र्य-स्वामीजींना अटक.

: २९ नोव्हेंबर रोजी निजामाचा भारत सरकारशी 'जैसे थे' करार.

: ३० नोव्हेंबर रोजी चंचलगुडा तुरुंगातून सुटका. निजामाला पत्र लिहिले.

१९४८ : २६ जानेवारी रोजी अटक. संगारेड्डीच्या तुरुंगात रवानगी. नंतर गुलबर्गा-हैदराबाद येथील तुरुंगात हलवले.

: १३ सप्टेंबर रोजी 'ऑपरेशन पोलो'स प्रारंभ.

: १७ सप्टेंबर रोजी निजामाची शरणागती. हैदराबाद संस्थान स्वतंत्र. स्वामीजींची कारागृहातून मुक्तता.

: १२ नोव्हेंबर रोजी स्वामीजींच्या पुढाकाराने पैठणचे नाथमंदिर हरिजनांसाठी खुले.

१९४९ : २४ नोव्हेबर रोजी भारतीय राज्यघटनेची अंमलबजावणी हैदराबाद संस्थानात सुरू.

१९५० : २६ जून रोजी नांदेड येथे पीपल्स कॉलेजची स्थापना.

: डिसेंबर-फेब्रुवारी कालावधीत कम्युनिस्ट आणि पोलीस यांच्या अत्याचाराने भयग्रस्त झालेल्या तेलंगणातील १६० गावांना कोणत्याही संरक्षणाविना भेट व आदिवासींना भयमुक्त करण्याचे प्रयत्न.

१९५१ : १५ एप्रिल रोजी 'हैदराबाद खादी समितीचे अध्यक्षपद.

१९५२ : देशातील पहिली लोकसभा अस्तित्वात, गुलबर्गा मतदार संघातून स्वामीजींची लोकसभेवर खासदार म्हणून निवड.

: ११ मे रोजी प्रदेश काँग्रेसच्या अध्यक्षपदी निवड.

१९५३ : १६ ते १८ जानेवारी या कालावधीत हैदराबादेत झालेल्या अ. भा. काँग्रेसच्या ५८व्या अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष. स्वागताध्यक्षीय भाषणातून हैदराबादच्या त्रिभाजनाची व भाषावार प्रांतरचनेची मागणी.

: २९ जून रोजी स्वामीजींच्या प्रेरणेने लातूर येथे पुरणमल लाहोटी तंत्रशिक्षण विद्यालय सुरू.

१९५४ : स्टेट काँग्रेसचे नेतृत्व कायमचे सोडले.

१९५६ : २९ जून रोजी अंबाजोगाई येथे योगेश्वरी महाविद्यालयाची स्थापना.

: २९ जुलै रोजी मराठवाड्यासाठी स्वतंत्र विद्यापीठाची मागणी करण्यासाठी मुख्यमंत्र्यांना भेटलेल्या शिष्टमंडळाचे नेतृत्व.

१९५७ : औरंगाबाद मतदार संघातून लोकसभेवर निवड.

१९५८ : स्वामीजींच्या प्रयत्नाने मराठवाडा विद्यापीठाची स्थापना.

१९६० : १४ एप्रिल रोजी राज्य पुनर्रचना दुरुस्ती विधेयक लोकसभेत संमत.

: १ मे रोजी संयुक्त महाराष्ट्राची निर्मिती - स्वामीजींची स्वप्नपूर्ती.

१९६२ : राजकारण संन्यास.

१९६३ : जुलै महिन्यात हैदराबाद लढ्याच्या नेतृत्वाबद्दल स्वामीजींची कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी सत्कार समितीची स्थापना. हैदराबाद-औरंगाबाद-गुलबर्गा येथे स्वामीजींचे सत्कार.

१९६४ : आंध्र प्रदेशच्या पूर्वगोदावरी जिल्ह्यातील पीठापूरम येथील शांति-आश्रमात प्रयाण. रामतीर्थ शांतिमहाविद्यालयाची स्थापना.

१९७० : १० फेब्रुवारी रोजी मराठवाडा विद्यापीठाच्या 'डॉक्टर ऑफ लॉज' पदवीने सन्मानित.

१९७१ : शांती आश्रमात हृदय विकाराने आजारी.

१९७२ : २२ जानेवारी रोजी हैदराबाद येथे देहावसान. ✿

# संदर्भ ग्रंथ

१. स्वामी रामानंद तीर्थ : हैदराबाद स्वातंत्र्य संग्रामाच्या आठवणी
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. १९७६

२. प्रा. वि. पां. देऊळगावकर (संपा.) : स्वामी रामानंद तीर्थ यांची रोजनिशी
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई. २००१

३. अनंत भालेराव : स्वामी रामानंद तीर्थ
नॅशनल बुक ट्रस्ट, नवी दिल्ली. १९८९

४. नरेंद्र चपळगावकर : कर्मयोगी संन्यासी
मौज प्रकाशन, मुंबई. १९९९

५. अनंत भालेराव : हैदराबाद स्वातंत्र्य संग्राम आणि मराठवाडा
स्वामी रामानंद तीर्थ संशोधन संस्था, औरंगाबाद. १९८७

६. स. मा. गर्गे (संपा.) : संघर्ष खंड १ व २ (कै. आ. कृ. वाघमारे लेखसंग्रह)
आ. कृ. वाघमारे स्मृति. समिती, औरंगाबाद १९८१

७. नरेंद्र चपळगावकर : कहाणी हैदराबाद लढ्याची
देशमुख आणि कं. पब्लिशर्स, पुणे. १९९९

८. व्ही. के. बावा : द लास्ट निजाम, द लाईफ अँड टाईम्स ऑफ मीर उस्मान अलीखान
पेग्विन बुक्स, दिल्ली. १९९३

✿

# महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

## महाराष्ट्राचे शिल्पकार योजनअंतर्गत चरित्रग्रंथ

## मालिकेतील चरित्रग्रंथ

| | | |
|---|---|---|
| १) एस. एम. जोशी | श्री. ग. प्र. प्रधान | रु. ४०/- |
| २) साने गुरुजी | श्री. राजा मंगळवेढेकर | रु. ४०/- |
| ३) दादा धर्माधिकारी | श्रीमती तारा धर्माधिकारी | रु. ४०/- |
| ४) क्रांतिसिंह नाना पाटील | श्री. भारत पाटणकर | रु. ४०/- |
| ५) डॉ. विठ्ठलराव विखेपाटील | श्री. शिवाजी सावंत | रु. ३५/- |
| ६) शंकरराव किर्लोस्कर | श्रीमती शांता किर्लोस्कर | रु. ४०/- |
| ७) मामासाहेब जगदाळे | श्री. व. न. इंगळे | रु. ४५/- |
| ८) तंट्या भिल्ल | श्री. बाबा भांड | रु. ४५/- |
| ९) यशवंतराव चव्हाण | श्री. विठ्ठलराव पाटील | रु. ४०/- |
| १०) दादासाहेब फाळके | श्री. बापू वाटवे | रु. ३५/- |
| ११) ताराबाई शिंदे | श्री. इंद्रजित भालेराव | रु. २५/- |
| १२) तेजस्विनी अहिल्याबाई होळकर | सौ. विजया जहागीरदार | रु. ४५/- |
| १३) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | डॉ. अरुंधती खंडकर | रु. ४०/- |
| १४) स्वातंत्र्यवीर सावरकर | श्री. सुधाकर देशपांडे | रु. ४०/- |

*मंडळाची प्रकाशने मिळण्याची ठिकाणे*

सर्व शासकीय ग्रंथ भांडार
मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद व
महाराष्ट्रातील प्रमुख ग्रंथविक्रेते

*अधिक माहिती/चौकशीसाठी*

सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत,
तिसरा मजला, दादर (पूर्व),
मुंबई-४०० ०१४
दूरध्वनी - २४१४४०२१, २४१४६००५



**डॉ. प्रकाश मेदककर**

डॉ. प्रकाश मेदककर गेली तीस वर्षे मराठवाड्यातील परभणी जिल्ह्यातील मानवत येथील कत्रुवार कला, रतनलाल काबरा विज्ञान व बी. आर. मंत्री वाणिज्य महाविद्यालयात मराठीचे विभागप्रमुख म्हणून काम पाहतात.

'नोरिया' ही कादंबरी, 'सामाजिक नाटक : स्वरूप विचार', 'मायबोलीचे मानकरी', 'नाटक : लोक आणि लौकिक' हे समीक्षाविषयक ग्रंथ यांचे लेखन त्यांनी केले आहे. 'नाटक : लोक आणि लौकिक' या ग्रंथास महाराष्ट्र शासनाच्या कुसमावती देशपांडे पुरस्कार मिळाला आहे. उल्लेखनीय समीक्षालेखनाबद्दल त्यांना भालचंद्र महाराज कहाळेकर स्मृती मराठी साहित्य समीक्षा गौरव पुरस्कार मिळाला आहे.

'अक्षर प्रतिष्ठा" या वार्षिकांकाचे चार वर्षे त्यांनी संपादन केले असून स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ नांदेड, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ नांदेड, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ औरंगाबाद या विद्यापीठांच्या क्रमिक पुस्तकांचे लेखन व संपादन त्यांनी केले आहे.

अ. भा. मराठी साहित्य संमेलने, मराठवाडा साहित्य परिषदांची संमेलने यांच्या अनेक परिसंवादात सहभाग घेतला आहे. विद्यापीठ स्तरावरील आणि साहित्य अकादमीच्या चर्चासत्रांमध्ये डॉ. मेदककर यांनी अनेक शोध निबंध सादर केले आहेत.